# काळांतील निवडक निबंध

## भाग नववा



शिवराम महादेव परांजपे



प्रस्तावना-लेखक

प्रा. रा. श्री. जोग, पुणें



पुनर्मुद्रण : २७ सप्टेंबर १९४६



किंमत

कागदी बांधणी ३॥ रुपये ]    [ कापडी बांधणी ४ रुपये

# अनुक्रमणिका


| | | पृष्ठ |
|---|---|---|
| १ | विश्वेश्वरापाशीं विनंति ... ... | १ |
| २ | उडदाच्या राशींत आणखी एक उडीद स्वतंत्र ... | ८ |
| ३ | अर्जुनाचा वेडेपणा ... ... | १४ |
| ४ | एक चमत्कारिक खेडेगांव ... ... | २४ |
| ५ | इंग्लंडांतील पक्षभेद आणि आपल्या हक्कांची प्राप्ति ... | ३४ |
| ६ | स्वित्झर्लंडची स्वतंत्रता नं. १ ... ... | ३७ |
| ७ | ,, ,, नं. २ ... ... | ४५ |
| ८ | ,, ,, नं. ३ ... ... | ५९ |
| ९ | सांपडलेलें संपुष्ट ... ... | ६४ |
| १० | हिंदुस्थान मात्र अजून आहे तसेंच आहे! ... ... | ६९ |
| ११ | काँग्रेसच्या उमेदवाराला उपदेश ... ... | ७६ |
| १२ | स्वतंत्रतेसाठीं आत्मयज्ञ ... ... | ८२ |
| १३ | सह्याद्रीचे तावडींत सांपडलेली कल्पनाशक्ति ... ... | ८६ |
| १४ | कांही लष्करी गोष्टी ... ... | ९३ |
| १५ | सातारच्या महाराजांचा जाहिरनामा ... ... | ९७ |
| १६ | एका सनईनें सुचविलेले विचार ... ... | १०४ |
| १७ | डोळ्यांत फेंकावयाच्या धुळीचे कण ... ... | ११४ |
| १८ | औट घटकेची राज्यक्रांति ... ... | १२३ |
| १९ | एक कल्पित गोष्ट ... ... | १३२ |
| २० | नेपोलियन बोनापार्ट आणि पोप पायस धि सेव्हन्थ ... | १४२ |
| २१ | मिशनरी बावा आणि त्याचा लुच्चेगिरीचा कावा ... | १५५ |
| २२ | हिंदुस्थानकरतां एक भाषा पाहिजे ... ... | १६२ |
| २३ | इंग्लिश लोक खरें कधींपासून बोलूं लागणार? ... | १७२ |

एकंदर चालू महर्गतेमुळे

**काळांतलि निवडक निबंधांचीं पुस्तकें**

जितक्या कमी किंमतींत द्यावयाची माझी इच्छा होती तितक्या कमी किमतींत देतां आलीं नाहींत. याकरितां काळांतील निवडक निबंधांचे पहिले भागांत एक सवलतीचें कुपन टाकलें आहे. सवलतीची समग्र माहितीही त्याच खंडांत दिली आहे. ग्राहकांनीं अवश्य वाटल्यास त्याचा फायदा घ्यावा.

व्यवस्थापक :

**य. गो. जोशी-प्रकाशन, सदाशिव, पुणें २.**

# प्रस्तावना



जवळजवळ तीन तपांनीं कै. शि. म. परांजपे यांचें काळांतील वाङ्मय पुनः उपलब्ध होत आहे. 'भासाची भवितव्यता' हा आपला लेख लिहीत असताना परांजपे हे भासाशीं जे इतके समरस झाले, याचें कारण त्यांचें स्वतःचें वाङ्मय भासाच्या वाङ्मयाप्रमाणेंच नष्टप्राय झालेलें होतें. भासाचीं नाटकें जशीं पुनः उपलब्ध झालीं, तसेंच परांजपे याचे लेखहि आतां पुनः उपलब्ध झाले आहेत. आपल्या भासावरील लेखाच्या शेवटीं भासाच्या आत्म्यास उद्देशून त्यांनीं म्हटलें होतें, 'तूं असा निराश होऊं नको. परमेश्वर या जगांत जोंपर्यंत हयात आहे, तोंपर्यंत दुष्ट लोकांनीं कितीहि अपकार केले तरी कोणालाहि निराश होण्याचें कारण नाहीं. ज्यानें बुडणारी श्रुति मत्स्यरूपानें तारिली, आणि ज्यानें तुकारामाच्या अभंगांची गाथा श्रीपाडुरंगाच्या रूपानें इंद्रायणीच्या डोहांतून कोरडीच्या कोरडी वर काढून आणली तोच परमेश्वर तुझ्याहि कवितेच्या पाठीमागें उभा आहे.' परमेश्वरावरील या श्रद्धेचा स्वतः कै. परांजपे यांना आपल्या हयातींत काय उपयोग झाला असेल तो असो, तुकारामाच्या अभंगांच्या गाथेप्रमाणें आज त्यांचेंहि जप्त वाङ्मय पुनरुज्जीवित होत आहे. भासाचीं नाटकें पुनः उपलब्ध झाल्यानंतरच्या स्थितीचें वर्णन म्हणून परांजपे यांनीं लिहिलें होतें—'तुझीं नाटकें पुनरुज्जीवित झालीं आहेत. तीं पाहून सर्व रसिकांना कितीं आनंद होत आहे पाहा. त्यांच्या चर्या बदलल्या आहेत, त्यांचे नेत्र प्रफुल्लित झाले आहेत, आणि त्यांचीं मनें प्रसन्न झालीं आहेत. हे भासाच्या आत्म्या, आतां तूं शांत हो आणि ब्रह्मलोकांत आनंदामध्यें ऐस.' कै. परांजपे यांचे हे शब्द स्वतः त्यांच्या आत्म्यास उद्देशून योजावयाचे झाल्यास एका 'नाटकें' या शब्दाऐवजीं 'निबंध' हा शब्द घालण्याखेरीज दुसरा कोणताहि फरक करण्याचें कारण आहे असें वाटत नाहीं.

सुदैवानें भासाच्या वाङ्मयाप्रमाणें परांजपे यांचें सारेंच वाङ्मय नष्ट किंवा नष्टप्राय झालेलें नव्हतें. बरेंचसें उरलेलें वाचावयास मिळे. त्यावरून त्यांच्या वाङ्मयाविषयीं कांहीं कल्पना कोणाहि वाचकास आपल्या मनाशीं बांधतां येते.

त्या कल्पना आतां उपलब्ध झालेल्या 'काळांतील निवडक लेखां'नीं दृढच होण्यासारख्या आहेत. परांजपे यांचें लेखन म्हटलें कीं त्यांत स्वातंत्र्याची गाढ स्पृहा आणि प्रीति व्यक्त झाल्यावांचून रहावयाचीच नाहीं. त्या स्वातंत्र्य-प्रीतीचाच प्रतियोगी भाग म्हणून पारतंत्र्याविषयीं वाटणारें दुःख, व त्यामुळें आपल्यास पारतंत्र्यांतच ठेवूं पाहणारांविषयींचा द्वेष आणि तिरस्कार यांचेंहि दर्शन त्यांच्या लेखनांत व्हावयाचें हें ठरलेलें असे. या द्वेषाचें आणि तिर-स्काराचें आविष्करण क्वचित् सरळपणें होत असलें, तरी त्याला बहुधा उप-रोधाचें स्वरूप प्राप्त होत असे. स्वातंत्र्याचा सतत पुरस्कार करणाऱ्या आणि पारतंत्र्याचा तिरस्कार करणाऱ्या या साहित्यिकाचें मन रसिक, सौंदर्यान्वेषी, विदग्ध सहृदयाचें होतें ही गोष्टहि वाचकाच्या तेव्हांच लक्षांत येई. या रसिक-तेला संस्कृत वाङ्मयाच्या खोल अभ्यासामुळें व्युत्पत्तीचें, विद्वत्तेचें, किंबहुना पांडित्याचेंहि सहकार्य लाभून ती डोळस, चोखंदळ आणि विचक्षण बनली असावी असेंहि अनुमान त्या वाचकाला सहज करितां येई. या सर्व विशेषांना आणि एकंदरींत त्यांच्या सर्वच लेखनाला स्वधर्मप्रीति आणि स्वसंस्कृतीचा अभिमान यांची बैठक मिळालेली असे, व त्यामुळें इंग्रजी वाङ्मयाची किंवा पाश्चात्य संस्कृतीची छाप त्यावर मुळींच पडलेली नसे. या सर्व विशेषांचा पुनः-प्रत्यय नव्यानेंच वाचावयास मिळालेल्या 'काळांतील निवडक निबंधां'च्या या नवव्या खंडामुळें येतो असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं.

कै० परांजपे यांच्या लेखनाचा पहिला आणि व्यापक असा विशेष म्हणून स्वातंत्र्यप्रीतीचा उल्लेख वर केला आहे. युरोपमधील स्वित्झर्लंड हें स्वतंत्रता-देवीचें माहेरघर मानलें जातें. तेथें स्वतंत्रतादेवीनें आपलें निवासस्थान कसें केलें याचा इतिहास खरोखर रोमांचकारी आणि स्फूर्तिदायक आहे. परांजप्यांची प्रतिभा या इतिहासानें आकृष्ट झाली हें अगदीं स्वाभाविक असेंच झालें. पण हा इतिहास वाचकांसहि स्फूर्तिदायक वाटेल म्हणून परांजपे यांनीं तो तीन लेखांकांमधून जरा विस्ताराचा दोष पत्करूनहि सांगितला आहे. ही सारी हकीगत सांगतांना परांजपे अगदीं तल्लीन झालेले दिसतात. स्वातंत्र्यप्राप्तीच्या या इतिहासाचें कथन करतांना त्यांच्या नेहमींच्या उपरोधाचा आश्रय करण्याचें कारण त्यांना दिसलें नाहीं. स्वित्झर्लंडवर जुलूम करणारे ऑस्ट्रियन् अधिकारी जेसलर व लँडेन्बर्ग, आणि त्या जुलुमांतून त्या देशाला मुक्त करणारे वुइल्यम

टेल, स्टाफाचर इत्यादि वीर, आणि स्वातंत्र्यप्राप्तीकरितां त्यांनीं केलेले पराक्रम व घडलेले रोमहर्षक प्रसंग या सर्वांचीं वर्णनें करताना त्यांच्या लेखणीला स्फुरण चढल्यासारखें दिसतें. शिलरच्या वीररसप्रधान नाटकांमधील कांहीं रस या गद्य निबंधांतूनहि उतरलेला दिसतो. स्वित्झर्लंड्च्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या इतिहासांतील आणखी एक प्रसंग त्यांनीं तितक्याच जिव्हाळ्यानें ‘ स्वतंत्रतेसाठीं आत्मयज्ञ ’ या निबंधांत वर्णिलेला आहे. झूरिच् शहराचा लोकपक्षाचा पुढारी रोडाल्फ ब्राऊन याला फसवून मारण्याचा कट कांहीं सरदारांनीं कसा केला होता, व त्यांतून त्याला वांचविण्याची कल्पना त्याच्या एका नोकराला कशी सुचली, व एकमेकांचे वेष बदलून घराबाहेर पडलेल्या त्या दोघांपैकीं रोडाल्फ ब्राऊन हा सुटून गेला व त्याचा वेष घेतलेला त्याचा नोकर मात्र मारला गेला याचें वर्णन मोठ्या आदरानें करून, व अशाच एका प्रसंगाचें मराठेशाहींतील उदाहरण उल्लेखून ते उद्वेगानें लिहितात, “ असे स्वातंत्र्यप्रिय लोक महाराष्ट्रांत होते तोंपर्यंत महाराष्ट्रहि स्वतंत्र होतें. परंतु आतां त्याचें काय ? जेथें निमकहराम लोक उत्पन्न होऊं लागले, तेथें गुलामगिरीच नांदली पाहिजे. ” कोणत्या समकालीन घटनेला उद्देशून हें म्हटलें असावें बरें ?

स्वातंत्र्यप्रीतीबरोबर साहजिकपणेंच ते स्वातंत्र्य मिळवून देणाऱ्या वीरपुरुषांविषयींची भक्ति येतेच. या भक्तींतूनच ‘ नेपोलियन बोनापार्ट आणि पोप पायस दि सेव्हन्थ ’ या निबंधाची निर्मिति झाली आहे. फ्रान्सला आधींच्या राज्यकर्त्यांच्या जुलमी राजवटींतून सोडविणाऱ्या या वीरपुरुषाद्दल कै० परांजपे यांना नितान्त आदर वाटत असल्याविना पोपबरोबर झालेलें नेपोलियनचें वर्तन व भाषण हीं कोणालाहि कौतुकानें वर्णितां आलीं असतीं असें वाटत नाहीं. नेपोलियनचें भाषण ही एक विचारांची विस्कळित कंथा आहे. वैयक्तिक स्वार्थाकरितांच तें केलें गेलें होतें. तो स्वार्थ साधण्याकरितां पोपला तो धमक्या देतो. त्या धमक्यांनींहि कार्यसिद्धि होत नाहीं असें पाहून कांहीं जीवनविषयक तात्त्विक विचार तो बोलून दाखवितो. ‘ हे बादशाही झगे, हा बादशाही मुकुट, यांत काय आहे ! नाटकांतील नट आपल्याला जें सोंग घ्यावयाचें आहे त्याचे जसे पोषाख घालतो, तसा हा माझा निव्वळ पोषाख आहे.……या जगामध्यें दोन प्रकारचे लोक असतात; ज्यांच्यापाशीं कांहीं आहे तो एक वर्ग, आणि ज्यांच्यापाशीं कांहीं नसून नवीन मिळवण्याबद्दल जे सदोदित प्रयत्न

करतात तो दुसरा वर्ग. पहिल्या वर्गांतील लोक स्वस्थ झोंपा घेत पडतात, परंतु दुसऱ्या वर्गांतील माणसें सदोदित जागीं राहून प्रयत्न करीत असतात,' इत्यादि शहाणपणाच्या गोष्टींबरोबर फ्रान्सच्या बादशाही सिंहासनावर बसण्याच्या गोष्टी तो बोलत आहेच. हें सारें मोकळेपणानें तो बोलतो आहे हाच त्यांतील गुण होय; बाकी त्यामधील स्वार्थ अगदीं उघडा आहे. पण वीरपुरुष नेपोलियन याविषयीं परांजपे यांना आदर वाटत होता. त्याचें कौतुक करण्याकरितां तो कृतिकवि असून त्याचीं काव्यें रणांगणावर रचिलीं जात असत एवढेंच सांगून ते थांबत नाहींत, तर शेक्सपियरसारखीं उत्कृष्ट शोकपर्यवसायी नाटकेंहि त्यानें लिहिलीं असतीं या कार्लाइल्च्या विधानाचा उल्लेख करून आपल्या मतानें उत्तम काव्याचा नमुना म्हणून प्रस्तुत संवाद, कीं, जो 'वाचीत असतांना प्राणवायूची खळबळ आपल्या बरगड्यांतून भावेनाशी होऊन आपल्या बरगड्या फोडून तो बाहेर येतो कीं काय असा भास होतो,' त्यांनीं सविस्तर दिला आहे. जीवनाच्या एका अंगामधील वीरपुरुष ते सर्वत्रच वीरपुरुष ठरतात या कार्लाइल्च्या आवडत्या अतिशयोक्तिमूलक सिद्धान्ताचेंहि कांहींसें विस्तारानें उपपादन त्यांनीं याकरितां केलें आहे. स्वातंत्र्यप्राप्ति करून देणाऱ्या नेपोलियनला ज्याप्रमाणें अनेक प्रमाद माफ होते त्याप्रमाणें अशा वीरपुरुषावर भक्ति करणाऱ्यांनाहि हें भक्तिमूलक अनौचित्य माफ म्हणावें लागेल.

वीरपुरुषांच्या प्रेमाइतक्याच त्यांच्या शौर्याच्या गोष्टीहि परांजपे यांना साहजिकच प्रिय होत्या. 'कांहीं लष्करी गोष्टी' या निबंधांत त्यांनीं शौर्याचे दोन प्रसंग सांगितले आहेत. पहिल्या प्रसंगांत चित्रळच्या वेढ्यांत इंग्रजांनीं किती शर्थीनें व चिकाटीनें लढाई दिली याचें वर्णन त्यांनीं केलें आहे. इंग्रजांविषयीं या खंडांत इतरत्र जें कांहीं त्यानीं लिहिलें आहे तें त्यांना फारसें अनुकूल नाहीं. तथापि परकीयांचा का होईना गुण असेल तेथें त्याचें ग्रहण करणें उचित होय या विचारानें ही हकीकत देऊन ते शेवटीं म्हणतात, 'लढाई हा एक बुद्धिबळाचा खेळ आहे. ज्याच्यापाशीं बुद्धि व बळ, विशेषतः बुद्धीचें बळ आहे त्याच्यापासून विजय फारसा दूर नाहीं.' अशाच प्रकारचें गुणग्रहण दुसऱ्या प्रसंगाच्या वर्णनांत आलें आहे. नेपाळच्या लढाईंत जखमी झालेल्या एका गुरख्याला तो शत्रुपक्षाकडील असूनहि इंग्रजांनीं औषधपाणी केलें.

बरा झाल्यावर तो गुरखा शिपाई पुनः आपल्या देशातर्फे लढण्याकरितां परत जाण्याची परवानगी मागूं लागला. ही परवानगी मागतांना तो म्हणतो, ‘ खासगी रीतीनें मी तुमचा मित्र आहें, पण माझ्या नेपाळच्या राष्ट्राच्या दृष्टीनें तुम्ही माझे शत्रु आहात. एखाद्या व्यक्तीवर तुम्ही जितके उपकार करतां त्याच्यापेक्षां त्या व्यक्तीच्या अत्यंत प्रियकर देशाच्या स्वतंत्रतेवर शतपटीनें जास्त अपकार करतां. याकरितां मला आपल्या देशाच्या स्वतंत्रतेसाठी तुमच्याविरुद्ध लढलेंच पाहिजे. ’ हें त्याचें म्हणणें इंग्लिशांनाहि मान्य झालें व त्यांनीं त्याला आपल्याविरुद्ध लढण्याकरितां जाण्याला मोठ्या आनंदानें रजा दिली. या प्रसंगाचें वर्णन परांजपे यांनीं इंग्लिशांच्या औदार्याकरितां केलें असें समजणें मात्र चुकीचें होईल. त्या गुरख्यानें वैयक्तिक संबंधांपेक्षां राष्ट्र-दृष्टीला अधिक महत्त्व कसें दिलें हें सांगण्यावरच भर अधिक आहे हें स्पष्ट दिसतें.

इंग्रजांविषयीं अनुकूल लिहिण्याचे प्रसंग अर्थात् परांजपे यांना फारसे लाभले नाहींत. प्रत्यक्षपणें सरळ, उघड शब्दांनीं किंवा अप्रत्यक्षपणें उपरोधानें त्यांच्या-विरुद्धच परांजप्यांनीं लिहिलें. त्यांत उपरोधानें लिहिलेले निबंध विशेष परिणाम-कारक उतरत असें दिसतें. त्याकरितां ते अनेक वेळा एखाद्या कल्पित कथेचा आश्रय करीत. प्रस्तुत खंडांत ‘ एक चमत्कारिक खेडें ’ ‘ एक कल्पित गोष्ट, ’ ‘ हिंदुस्थान मात्र अजून तसाच आहे, ’ इत्यादि निबंध हे असे आहेत. यांपैकीं पहिल्या निबंधांत आपल्या जुन्या तत्त्वज्ञानांतील वेदान्ताचा आणि त्यांतील इहामुत्रफलभोगविरागाचा आधार घेऊन दारिद्र्य, मरण व निर्वेद यांचें स्वागत करणारे लोक असलेल्या एका खेड्याची कल्पना परांजपे यांनीं केली आहे, व इंग्रजी राज्यांत आर्थिकदृष्ट्या हिंदुस्थानची स्थिति किती खालावली आहे या गोष्टीवर लक्ष ठेवून वैराग्यनिर्मितीचें एक लक्षण जें संपत्तीचा त्याग किंवा अभाव तें साधण्यास हें राज्य कसें उपकारक ठरलें याचें उपरोधानें वर्णन केलें आहे. त्यांत त्यांना अतिशयोक्तीचा साहजिकच आश्रय करावा लागला आहे. या चमत्कारिक खेड्यांत मरण हा सणाचा प्रसंग मानला जाऊं लागला. मरणें हें वैराग्याचें व राजनिष्ठेचेंहि द्योतक ठरलें. या खेड्यांतील वेदांती लोकांनीं इतर सण बंद ठेवून रामनवमी, कृष्णाष्टमी, महाशिवरात्र, आषाढी व कार्तिकी एका-दशी एवढे उपवासाचे सण तेवढे चालू ठेवले. तेथें लग्न करण्याची चाल बंद

पडली होती, नवीन मूल जन्माला आल्यास लोक त्याच्या बापाकडे जाऊन रडून सहानुभूति दाखवीत, गर्भपाताला बक्षीस मिळे, इत्यादि अतिशयोक्त विधानें त्यांत आहेत. परंतु या अतिशयोक्तीनें मूळांतील उपरोध अधिकच बोचक आणि परिणामकारक होई. हें असें खेंडेगांव आज अर्थात् अस्तित्वात नाहीं; कारण, त्यांतील लोकांच्या ध्येयाप्रमाणें त्यांत कोणी जिवंत शिल्लक उरला नाहीं व तें खेडें बेचिराख होऊन गेलें. हा सारा वेदान्ताचा परिणाम खरा, पण इंग्रजी राज्यांतच त्या वेदान्ताला खरोखर पाठिंबा मिळाला. पूर्वीच्या वेदान्त्यांनीं आणि शंकराचार्यांनीं समकालीन राजे लोकांना प्रजेपाशीं शक्य तों कमी पैसा राहील असें करण्याची विनंती केली होती, पण कांहीं थोड्या राजे लोकां-खेरीज इतरांनीं ती विनंती एकंदरींत मानली नाहीं. परंतु इंग्रजांनीं संस्कृत शिकून आमच्या वेदान्ताचा अभ्यास केला व वेदान्त्यांच्या विनंतीला अपरोक्ष सहानु-भूति दाखवून येथील प्रजेला दारिद्र्याची अपरोक्षानुभूति करविली. याकरितां त्यांना पगार, पेन्शनें, व्याजें, एक्स्चेंज कॉंपेन्सेशनें, व्यापाऱ्यांचीं बिलें इत्यादि युक्त्या योजाव्या लागल्या. कधीं कधीं बिचाऱ्यांना न्यायबुद्धि व सदसद्विवेक-बुद्धीहि सोडावी लागली. या कामांत दुष्काळाला मदतीस घेण्याचा सपाटा त्यानीं चालविला, व अशा प्रकारें हिंदुस्थानांतील लोकांस चौऱ्यांयशीच्या फेऱ्यांतून मुक्त होण्यास मदत केली. गरीब लोकांची संख्या आपोआपच कमी झाली. या प्रकारच्या उपरोधपूर्ण लेखनानें प्रत्यक्ष राजद्रोहापेक्षां राज्यकर्त्यांची टर अधिक होत असल्यानें तें फार बोंचक ठरे. सरळ विरुद्ध लिहिल्यानेंहि जेवढा राग येणें शक्य असतें, त्यापेक्षां अधिक चीड उपरोधानें उडविलेल्या कोरड्यांनीं येई.

उपरोधाचा उपयोग इतरहि चारपांच निबंधांतून केलेला आहे. त्यांत 'अर्जुनाचा वेडेपणा' हा निबंध विशेष झोंबणारा ठरेल. पूर्वी कौरवपांडव युद्धामध्यें अर्जुनानें युद्धाच्या वेळीं शस्त्रसंन्यास केला तो राज्य, सुख, भोग हीं नकोत म्हणून केला. आपल्याच बांधवांचा नाश करणें हें त्याला मान्य नव्हतें. अधर्म, अनीति, वर्णसंकर माजतील, इत्यादि कारणें त्यानें त्या वेळीं सांगितलीं. परांजपे म्हणतात, 'कोणताहि पाश्चिमात्य अर्जुन असा वेडेपणा करता ना. धर्म हा मूळ देवानें अशक्त बायकामुलें, आणि अज्ञानी भटभिक्षुकांकरितां केलेला आहे. तो बलाढ्य लोकांनीं आचरावयाचा नाहीं. त्यांचें काम अशक्तांना

लुटणें, व त्याच्या द्रव्याचें अपहरण करणें. तें त्यांनीं केलें नाहीं तरच वर्ण-व्यवस्था बिघडेल. धर्मतत्त्वें व राज्यहरणतत्त्वें यांचा संबंध नाहीं. अर्जुन वेडाच्या भरात कांहीं धर्मतत्त्वें बरळला. त्याच्या विचारसरणीला भगवंतांनीं क्लैब्य म्हटलें तें अगदीं बरोबर होतें. अर्जुन जें म्हणाला कीं, यःकश्चित् पृथ्वीसाठीं मी मनुष्यवध करणार नाहीं, त्यामुळें या अतिशय सन्माननीय पृथ्वीचा अपमान झाला आहे. भोग हे युद्धामुळें रुधिरप्रदिग्ध होतील असें जें तो म्हणाला त्यांतहि अर्थ नाहीं. रक्ताचे डाग पाण्यानें, व फार झालें तर साबण लावून धुतले जातात. अर्वाचीन धर्मशास्त्राप्रमाणें एकच मनुष्य मारला तर खून होईल, पण लढाईमध्यें अनेक मारले तरी दोष नाहीं. साम्राज्य हा देव, कोणताहि न्याय किंवा अन्याय करून त्या साम्राज्याचा प्रसार करणें हें पुण्य आणि इतरांनीं स्वदेशभक्तीनें प्रेरित होऊन स्वदेशाच्या संरक्षणासाठीं त्याच्या आड येणें हें पाप अशी आजकालची स्थिति आहे. या सुरामध्यें अथपासून इति-पर्यंत लिहिलेला हा लेख मराठीमधील उपरोध–वाङ्मयाचा एक उत्तम नमुना ठरण्याजोगा आहे.

हिंदुस्थानचें दारिद्र्य हा उपरोधानें लिहिलेल्या आणखी एका निबंधाचा विषय झाला आहे. इ. स. १८३५ सालीं सातारच्या महाराजांनीं एक जाहीर-नामा काढून आपलीं शरीरें तालमीनें तयार राखण्याची विनंति केली होती, व ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादि साऱ्याच लोकांनीं हें लक्षांत धरावें असें म्हटलें होतें. हा जाहीरनामा परांजपे यांच्या उपरोधप्रियतेस चालना मिळण्यास पुरेसा झाला. त्यांनीं अशक्तपणापासून होणाऱ्या फायद्यांचें वर्णन केलें व इंग्रज लोक आप-ल्यास अशक्त होण्यास उपाशींपोटीं राहण्यास कसें साहाय्य करीत आहेत तें सांगितलें. जगांत कांहीं लोक गरीब राहिल्याखेरीज दयेला आणि दानाला अवसरच नाहीं. हिंदुस्थानाला इंग्रजांनीं गरीब करून सोडलें आहे. श्रीमंत लोकांसही गरीब बनवून भिक्षा मागण्याचा हक्क मिळवून दिला आहे, व दर-वर्षी ते एक सभा भरवून आपला भिक्षा मागण्याचा हक्क शाबीत करीत अस-तात. आरंभ सरळपणें करून शेवट उपरोधांत करण्यांत आलेला हा निबंधहि या खंडांतील उपरोधिक लेखनांतच समाविष्ट होण्याजोगा आहे.

आणखी दोन निबंधांतहि परांजपे यांचें लेखन उपरोधाचें आहे. ‘ हिंदुस्थान मात्र अजून तसाच आहे ’ या निबंधांत माळी व बाग यांचें रूपक घेऊन

येथील राजकीय हक्कांची वाढ आस्ते झाली पाहिजे असें म्हणणाऱ्यांच्या मतावर कडक टीका केली आहे. फळाबद्दल उतावीळपणा करूं नये, या बाबतींत अगदीं नेमस्तपणानें वाट पाहत बसलें पाहिजे, टिकाऊ फळें पाहिजे असतील तर तीं दीर्घ काळानें प्राप्त होणार, जहालपणानें घाई करूं नये, इत्यादि मतांचा समाचार घेतला आहे. 'एका कल्पित गोष्टीं'त सर्वत्र राजद्रोह दिसणाऱ्या इंग्रजी राज्यकर्त्यांची रेवडी उडविली आहे. कांहीं विद्यार्थी मिळून एका पाश्चिमात्य वीररसात्मक नाटकाचा खेळ करण्याचें त्यांनीं ठरविलें होतें. त्यांपैकीं एका विद्यार्थ्यानें मोठ्यानें म्हटलेली नक्कल ऐकून सी. आय्. डी. नें कोण कडेकोट बंदोबस्त केला व शेवटीं कशी फजिती झाली हें त्यांत सांगितलें आहे. 'औट घटकेच्या राज्यक्रान्ती' मध्येंहि हिंदी बंडाच्या अकल्पित भीतीनें अकारण घाबरून गेलेल्या सरकारपक्षीय वर्तमानपत्रांची थट्टा आली आहे. परांजप्यांच्या उपरोधाचा मोर्चा स्वजनांवरहि वळविलेला 'कॉंग्रेसच्या उमेदवारास उपदेश' या निबंधांत दिसतो. त्या वेळीं कॉंग्रेसमध्यें चाललेलें काम पोषाखी व दिखाऊ स्वरूपाचें होतें असें परांजपे यांना वाटे. म्हणून कॉंग्रेसला अगदीं प्रथम हजर राहूं पाहणाराला एक त्यांत मुरलेला मनुष्य उपदेश करीत आहे, अशी भूमिका स्वीकारून हा निबंध लिहिला होता. कॉंग्रेसमध्यें जाण्याकरितां करावी लागणारी केशभूषा आणि वेषभूषा, तेथील मिरवणुकी, तीं लांबलचक कंटाळवाणीं व झोंप आणणारीं भाषणें, ठराविक ठराव व टाळ्या या सर्वांची परांजप्यांनीं केलेली थट्टा तत्कालीन राजकारण चालविणाऱ्यांच्या कार्यपद्धतीविषयीं त्यांना काय वाटे याची कल्पना देते. या निबंधांत उपरोधाच्या जोडीला बराचसा विनोदहि आहे. तथापि परांजप्यांना शुद्ध विनोद करणें अशक्य असल्यानें त्याला बोचक उपरोधाची झांक कांहीं प्रमाणांत का होईना आल्याविना राहत नाहीं.

इंग्रज राजकर्त्यांविरुद्ध उपरोधानें न लिहितां सरळच प्रतिपादन ज्यांत केलें आहे असेहि कांहीं निबंध या खंडांत आले आहेत. 'उडदाच्या राशीत आणखी एक उडीद' हा निबंध या स्वरूपाचा आहे. या निबंधांत कॅप्टन् बर्न्स यानें पंजाबच्या रणजितसिंहास घोडे नजर करावयास जाण्याच्या सबबीवर सिंधमधून सिंधु नदींतून प्रवास करण्याची परवानगी कशी काढली, आणि आपल्या प्रवासाचा उपयोग सिंधची पाहणी लष्करी स्वारीच्या दृष्टीनें करून

कसा करून घेतला हें सांगून इंग्रजांच्या हिकमती स्वभावाचें वर्णन केलें आहे. जी गोष्ट आपल्यामधील एखाद्या माणसानें केली असती तर कदाचित् पराजपे यांच्याच कौतुकाचा विषय झाली असती, तीच आपल्या विरोधी पक्षांतील माणसानें केली असतां चीड आणण्यास कारण व्हावी हा अर्थात् मनुष्य-स्वभावच आहे. हिंदुस्थानांतील मिशनरी साहेबलोकहि याच प्रकारानें इंग्रजी राज्यकर्त्यांस उपयोगी पडत असल्याचें त्यांनीं 'मिशनरी बाबा आणि त्याचा लुच्चेगिरीचा कावा' या निबधांत थोडाफार उपरोधाचा आश्रय करून सांगितलें आहे. मिशनरी लोक हिंदु धर्मावर करीत असलेल्या आघातापेक्षां ते राजकारणांत परकी राज्यकर्त्यांना करीत असलेल्या साहाय्याबद्दलच परांजपे यांना अधिक चीड येत होती असें दिसतें. धर्महानीपेक्षां स्वातंत्र्यहानि त्यांना आधिक दुःखद वाटत असावी,; किंवा हिंदु धर्माला इतर धर्मांकडून फारशी भीति नसण्याइतका तो समर्थ आहे असें त्यांना वाटत असावें व राजकीयदृष्ट्याच आपण दुर्बल असल्याची जाणीव त्यांना अधिक असल्यानें खरी भीति तिकडूनच आहे अशी त्यांची भावना असावी. या दोन निबंधांपेक्षां अधिक रागाचें व सडेतोड लेखन 'इंग्लिश लोक खरें कधींपासून बोलूं लागणार?' या निबंधांत झालें आहे. श्री. दादाभाई नौरोजी यांच्या कॉंग्रेसच्या अध्यक्षपदावरून झालेल्या भाषणावर टीका करितांना 'टाइम्स' पत्राच्या संपादकांनीं हिंदी पुढाऱ्यांवर विसंगतीचा म्हणजे पर्यायानें खोटेपणाचा आरोप केला होता. दादाभाईचें अध्यक्षीय भाषण सौम्य असलें तरी, त्यांनीं इंग्लंडमध्यें व नेदर्लंडमध्यें केलेलीं भाषणें जहाल होतीं, गोखले हे स्टेट् सेक्रेटरीपाशीं नेमस्त भाषा बोलून ऑक्सफर्डच्या इंडियन् विद्यार्थ्यांना जहाल उपदेश करण्याची लबाडी करतात, अशी तक्रार 'टाइम्स'नें केली होती. हिंदी पुढाऱ्यांवर केलेल्या या खोटेपणाच्या प्रच्छन्न आरोपामुळें रागाची उसळी येऊन परांजपे यांनीं तोच हल्ला इंग्रजी राज्यकर्त्यांवर उलटवून इंग्रज लोकच खरें कधींपासून बोलूं लागणार, असा उलट सवाल केला आहे. क्लाइव्हसाहेबांच्या खोट्या दस्तऐवजापासून तों कर्झनसाहेबांच्या तिबेटमधील थंड्या मिशनपर्यंतच्या ऐतिहासिक उदाहरणांचा केवळ उल्लेख करून १८५८ सालीं काढलेल्या राणीच्या जाहीरनाम्यांत दिलेलीं वचनें तरी इंग्रजानीं कितीशीं पाळलीं आहेत असा प्रश्न केला आहे. त्यांतील वचनांवर विश्वास ठेवावा असें 'टाइम्स'चें म्हणणें असल्यास 'टाइम्स'च्याच

शब्दांत The request is impossible असें रोखठोक उत्तर परांजपे यांनीं दिलें आहे.

कै. परांजपे यांच्या निबंधांतून तर्कबुद्धीपेक्षा भावनेलाच आवाहन विशेष असे. कोणत्याहि विषयाचा पूर्वपक्ष करून, त्याचा साधकबाधक विचार करून, उत्तरपक्ष करण्याची आवश्यकता त्यांना क्वचितच वाटे. म्हणून टिळकांची तर्ककर्कशता त्यांच्या लेखनांत आली नाहीं. आगरकरांच्या इतकीहि तात्त्विक स्वरूपाची चर्चा करण्याची जरूरी त्यांना वाटत नसे असें दिसतें. पण यामुळें सामान्य वाचकाच्या दृष्टीनें त्यांचें लेखन अधिक सुगम व परिणामकारक ठरे. शिवाय त्यांनीं निबंधाकरितां घेतलेल्या विषयांसंबंधीं पूर्वपक्षउत्तरपक्षाची जरूरीच नसे. स्वातंत्र्य ही एक अत्यंत स्पृहणीय अशी गोष्ट आहे ही कांहीं सिद्ध व्हावयाच्या अवस्थेमधील बाब नव्हती. हिंदुस्थानदेश अत्यंत दरिद्री झाला आहे हें सांगावयास कोणताहि पूर्वपक्षउत्तरपक्ष नको होता, किंबहुना हें नव्यानें सांगण्याचेंहि कारण नव्हतें. या गोष्टी स्वतःसिद्ध असल्यासारख्या होत्या. अशा गोष्टी पुनः सिद्ध करण्यापेक्षां उपरोध व कल्पितकथा यांनी त्या रंगवून जनतेमध्ये जागृति करणें हेंच त्यांचें कार्य होतें. त्याकरितां रूक्ष, तार्किक विचारसरणीचा अवलंब त्यांना करावा लागत नसे. पण क्वचित् त्यांनाहि तत्त्वविवेचनाची आवश्यकता वाटे. त्या वेळीं उपरोधाचा फारसा आश्रय न करितां ( अगदीं उपरोधशून्य असें लेखन परांजप्यांच्याबाबत अशक्यप्रायच होतें. ) सरळ विवेचनाचा मार्गच त्यांना पत्करावा लागे. 'डोळ्यांत फेकावयाच्या धुळीचे कण' या निबंधांत त्यांना हें करावें लागलें आहे. सरकारनें, आणि हक्क देणें, या दोन गोष्टी तत्त्वतःच विरोधी आहेत असा त्या निबंधाचा रोख आहे. सरकार म्हणजे सामान्यतः लोकांनींच ( तें परकीय नसलें तर ) आपले अधिकार मर्यादित करून घेऊन निर्माण केलेली संस्था होय. लोकांनीं त्याला अधिकार व हक्क दिलेले असतात, व तेवढेच खरोखर त्याच्या हातांत असतात. प्रबल सरकारसंस्था असणें म्हणजे त्या प्रमाणांत निर्बल लोकसंस्था असणें होय. सरकारला लोकांनीं हक्क दिल्यानें जेथें जेथें राज्यसंस्था अस्तित्वांत येते, तेथें सरकारनें लोकांना हक्क देण्याची भाषाच बरोबर होत नाहीं. लोकांचे हक्क वस्तुतः लोकांजवळच असतात. वेदान्ता-प्रमाणें राजकारणांतहि सर्व कांहीं आपलें आपल्यापाशींच आहे. तें शोधायला

दूर जावयास नको. रज्जूवर सर्पाचा भास झाल्यामुळें लोक भयग्रस्त होतात, परंतु हें मिथ्याज्ञानजन्य भय एकदां नष्ट झालें म्हणजे सर्वत्र मोक्ष आणि ब्रह्मानंद भरून राहिला आहे अशा अर्थाचें तत्त्वविवेचन परांजप्यांनीं या निबंधांत केलें आहे. तथापि असें तात्त्विक विवेचन परांजप्यांच्या या निबंधांतून अपवादभूतच म्हणावें लागेल.

असे आणखी एक-दोन अपवाद या खंडांत आहेत. इंग्लंडांतील पक्षभेदांचा फायदा घेऊन, म्हणजे तेथील सरकारविरोधी पक्षास पाठिंबा देऊन, आपलें राजकरण रंगवूं नये असें म्हणणारा एक पक्ष त्यावेळींहि हिंदुस्थानांत होता. त्यासंबंधानें परांजपे यांचें स्पष्ट मत असें कीं, परकीय राज्यकर्त्यांची आपल्याविषयींची नीति 'फोडा व झोडा' अशी असतांना आपण मात्र तटस्थ राहून त्यांच्यामधील पक्षभेदांचा फायदा घेऊं नये यासारखा दुधखुळेपणा दुसरा कोणताहि नसेल. हिंदुस्थानांतून इंग्लंडांत जाणाऱ्या मुत्सद्यांत जर कोणी खरा मुत्सद्दी, कारस्थानी, कार्यदक्ष, देशाभिमानी पुरुष असता, तर त्यानें हे इंग्लंडांतील आयते असलेले पक्षभेद एकमेकांच्या विरुद्ध लढवून हिंदुस्थानचें अगणित कल्याण करून घेतलें असतें. हिंदुस्थानचा प्रश्न निघाला कीं आपसांतील पक्षभेद विसरण्याची इंग्रजांची वृत्ति पाहिल्यास या धोरणाचा उपयोग किती झाला असता ही शंका बाजूस ठेवल्यास परांजपे यांचें म्हणणें तत्वतः बरोबरच होतें असें म्हणावें लागेल. 'हिंदुस्थानाकरितां एक भाषा पाहिजे' या वरवर भाषाविषयक वाटणाऱ्या निबंधांतहि असेंच कांहीं राजनीतीचें तात्त्विक विवेचन परांजप्यांना करावें लागलें आहे. ही भाषा म्हणजे राजकारणाची भाषा होय. कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. दादाभाई नौरोजी यांनीं अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणासंबंधीं हिंदी लोकांचेच अभिप्राय भिन्न भिन्न पडले व कांहीं एतद्देशीय पत्रकारांनाहि तें थोडें मवाळपणाचें वाटलें. टाइम्सनें तर त्यांच्यावर विसंगतीचा आरोप केला असल्याचें वर उल्लेखिले आहेच. त्यावर दादाभाईंच्या समर्थनार्थ परांजपे यांनीं राजनीतीमध्यें भाषेचा उपयोग कसा करावयाचा असतो याविषयीं कांहीं तात्त्विक विवेचन केलें आहे. 'पूर्वीच्या सारखे धोपटमार्गी राजे जेव्हां राज्य करीत असत, तेव्हां बोलण्याचालण्याचेहि धोपटमार्ग पुरे पडत होते. पण परिस्थित्यनुरूप फेरफार केल्यावांचून गत्यंतर नाहीं. जेथें खरें बोलण्याची बंदी असेल, तेथें बाह्यात्कारी खोटेंच बोलले

पाहिजे. परंतु तें समजणारांनी मात्र यथाश्रुतच समजून उपयोगी नाहीं. आपल्या राष्ट्राला काय प्राप्त झालें पाहिजे हा आपल्यापुढें प्रश्न आहे. दादाभाईसारख्या एखाद्या व्यक्तीनें उघड उघड काय बोलावें हा आपल्या राष्ट्रापुढें प्रश्न नाहीं. सरकारच्या डोळ्यांत जोंपर्यंत तेल घातलेलें आहे, आणि सरकारच्या निर्बंधांचा उघड रीतीनें निषेध करण्याची ताकद जोंपर्यंत राष्ट्रांत आलेली नाहीं, तोंपर्यंत वक्ता आणि श्रोते यांनीं कांहीं तरी सांकेतिक युक्त्या करून एकमेकांची भाषा समजून घेतली पाहिजे. आपल्याला अजून राजकीय व्यवहारांतील मीमांसा-शास्त्र माहीत नाहीं, आणि त्या शास्त्राच्या नियमाप्रमाणें बलाबलाचा विचार करून सर्व वाक्यांचा समन्वय आपल्याला मुख्य हेतूशी करितां येत नाहीं. अमुक शब्दाचा अमुक अर्थ समजावयाचा, अमुक शब्द उच्चारले असले तरी ते उच्चारले नाहींत असे समजावयाचें, अमुक शब्द अमक्याच्या समाधानासाठीं आहेत आणि अमुक शब्द आपल्या स्वतःच्या अंतःकरणासाठीं आहेत इकडे लक्ष ठेवावयाचें वगैरे पारिभाषिक रीतीनें वक्ता आणि श्रोता यांच्याकरितां सर्व हिंदुस्थानांत एक भाषा झाली पाहिजे असा या विवेचनाचा इत्यर्थ आहे.

ज्या लेखांत राजकारणाचा तादृश संबंध आलेला नाहीं असेही दोन तीन लेख या खंडांत आले आहेत. त्या सर्वांना परांजपे यांनी थोड्याबहुत प्रमाणांत कल्पित कथेचें स्वरूप दिलें आहे. 'एका सनईनें सुचविलेले विचार' ही एक कथा अशी आहे. हे विचार कुस्ती जिंकणाऱ्या एका मल्लाच्या मनांत आल्याचें सांगितलें आहे. पण त्या विचारांचें एकंदर स्वरूप साधारणपणें कुस्तीगीर मल्लाच्या बौद्धिक तयारीला झेंपण्याजोगें नसल्यानें परांजप्यांनीं त्या मल्लाला ब्राह्मणवर्णाचा ठरवून वेदशास्त्रादिकांचा त्याच्या मनावर थोडासा संस्कार झाल्याचेंहि कल्पून 'हल्लीं चोहोंकडे प्रचलित झालेल्या स्वदेशभक्तीच्या कल्पनाहि त्याच्या कानापर्यंत पोहोंचल्या असल्याचेंहि सांगितलें आहे. तो मल्ल विचारप्रवण व्हावा आणि ते विचार विरक्तीचे असावेत ही गोष्टहि विसंगत वाटली म्हणूनच कीं काय हें त्याचें परिवर्तन आकस्मिक, अकारण, अनपेक्षितपणें, पण झालें होतें खरें, असेंहि लेखकानें आधींच सांगून ठेवलें, व मग हे सुचलेले विचार काय होते तें सविस्तर वर्णिलें आहे. ही सनई लबाड आणि खोटी स्तुति करणारी आहे. सनई म्हणजे ईश्वरानें मनुष्याच्या शरीरांत बनविलेल्या नैसर्गिक सनईची भिकारडी अनुकृति आहे. तिला मन आणि हृदय

नाहीं. वाटेल त्याची स्तुति करावयास वारांगनेंप्रमाणें ही तयार असते. कोणीहि विजयी होवो, तिला सुखदुःख सारखें असूनहि ही मंजुळ सूर काढण्यास तयारच. भगवान् कृष्णांनीं जिला एक वेळ आपल्या अधरचुंबनाचा लाभ दिला, ती आज एखाद्या कसबिणीप्रमाणें पाहिजे त्याची स्तुति करून त्याच्या मनांत नसत्या मोठेपणाचा खोट्या कल्पना उत्पन्न करून त्याला फसविण्याच्या धंद्याला लागली असून तिचा केवढा अधःपात झाला होता. बिचाऱ्या सनईवर लादलेलें हें सारें कल्पनाकलित काव्य तिच्या अंगच्या दोषामुळें उत्पन्न व्हावयाच्या ऐवजीं परांजपे यांच्या प्रतिभेनें तिच्यावर लादलें गेलें होतें. या निबंधाला विचाराची कठिण कसोटी लावणें शक्य आणि इष्टहि नाहीं. या कथेंतील कृत्रिम, ओढून ताणून आणलेल्या काव्यापेक्षां 'सांपडलेलें संपुष्ट' या निबंधांत आलेलें काव्यमय वर्णन अधिक रम्य आहे आणि त्यांतील विचारहि अधिक उदात्त आणि उद्बोधक आहेत. आगबोटीनें प्रवास करणाऱ्या एका भटजींचें गांठोडें बोटींतून उतरतांना पाण्यांत पडून हरवलें. त्या गांठोड्यांत असलेलें त्या भटजीचें देवाचें संपुष्टहि अर्थात् नष्ट झालें. भटजी सूर्योपासक होते व त्या संपुष्टांत त्यांनीं इतर देवांबरोबर एक सूर्यकांतहि ठेवला होता. ते मोठें भाविक होते, व त्या संपुष्टांतील देवांवर त्यांची अतिशय श्रद्धा असे. ते संपुष्ट हरवल्यानें त्यांना साहाजिकच अत्यंत दुःख झालें, व त्याच्या भरांत दोन गुडघ्यांच्यामध्यें आपलें डोकें घालून ते रात्रभर बसले. उषःकालाच्या रमणीय वेळीं भटजीमहाराज गुडघ्यांतून डोकें काढून पाहतात तों काय! त्यांना निराळेंच दिसलें व ते उद्गारले, "हें खरें संपुष्ट! भूतळ हें या संपुष्टाचें खालचें पुड, आणि आकाश हें त्याचें वरचें झांकण! परमेश्वरानें स्वतः आपल्या हातानें निर्माण करून मनुष्याच्या हवालीं केलेलें हें संपुष्ट मला आजवर दिसलें नाहीं. तें संपुष्ट हरवल्यावर माझे देवहि हरवले. परंतु देवा! तूं कधीं तरी हरवतोस काय? पण ही गोष्ट मूढ जनाच्या लक्षांत येत नाहीं. आजवर अज्ञानामुळें माझें कांहीं तरी हरवलें होतें खास. आज तुझ्या कृपेनें तें सर्व मला सांपडलें." यांतील तात्पर्य स्पष्ट करून सांगावयास नको. पण या उदात्त तात्पर्याइतकेंच परांजपे यांनीं येथें केलेलें उपःकालाचें वर्णन रमणीय आहे, तें मूळांतच अवश्य पाहण्याजोगें आहे.

नेहमीं प्रत्यक्षाप्रत्यक्षपणें राजकारणाविषयींच लेखन करणारी परांजप्यांची

प्रतिभा निसर्ग-सौंदर्यानें कशी लुब्ध होई याचा प्रत्यय आपल्यास यांच्या 'सह्याद्रीच्या तावडींत सांपडलेली कल्पनाशक्ति' या कथात्मक निबंधांत येतो. प्रस्तुत खंडामध्यें असणारा हा एकच एक निसर्गविषयक लेख होय. त्या निबंधामधील शंकराच्या विशाल महापूजेची कल्पना लेखकाच्या विशाल कल्पनाशक्तीची द्योतक समजावयास हरकत नाहीं. आकाशांतील पोकळीच्या विस्तीर्ण अभिषेकपात्रांतून शिखरशंकरावर सहस्रधारांनीं होणारें तें अभिषिंचन, आपापल्या पर्णासनांवर बसलेल्या निरनिराळ्या शाखांमधील द्विजगणांनीं शंकरास आपल्या मधुर व उंच सुरानें म्हटलेले रुद्राच्या आवर्तनांतील चमक आणि नमक, गंधवती पृथ्वीच्या पोटांत सांठविलेला व पर्जन्यकाळाच्या प्रारंभीं बाहेर पडणारा मातीचा सुगंध व त्याचें त्या पर्वतरूपी शंकरास झालेलें विलेपन, वनलतांनीं अर्पण केलेलीं परम सुवासिक व अत्यंत नेत्राल्हादक पुष्पें, दऱ्यांतून हळूहळूं हवेच्या मऊ अंथरुणावरून लोळत येणाऱ्या धुक्याच्या लोटांचें धूपदान, आकाशांतून जमिनीवर आणि फिरून जमिनीवरून आकाशांत असा खालींवर इकडे तिकडे, चहूंकडे सारखा संचार करणाऱ्या विजेची पंचारती, अतिशय वारा सुटल्यामुळें पातळ ढगाच्या आड धरलेला सूर्याचा नंदादीप, आकशमंडपांत झडणारे मेघगर्जनेचे चौघडे, आणि पक्ष्यांच्या किलबिलाटाच्या सुस्वर सनया अशा थाटाची ही निसर्गाची महापूजा ज्या कल्पनेंतून निघाली ती कल्पनाहि त्या पूजेइतकीच विशाल नाहीं काय? निसर्गांतील उदात्त आणि भव्य अशा सौंदर्याचें परांजपे यांना वाटणारें आकर्षण सह्याद्रीच्या या वर्णनांत चांगलेंच कळून येतें. अशा या रम्योदात्त प्रदेशांत जो जाईल तो कवि होऊन माघारा येईल असें जें त्यानीं म्हटलें आहे तें त्यांच्या बाबतींत तरी खरें झालें असें म्हटलें पाहिजे. नुसत्या कल्पनेनें तेथें जाऊनहि त्यांची प्रतिभा काव्यमय झालेली येथें दिसते. वर वर्णिलेल्या महापूजेच्या वर्णनांतच त्यांनीं योजिलेल्या रूपकें, उपमा, उत्प्रेक्षा व श्लेष पाहिले तर हा निबंध एक गद्यकाव्यच आहे असें वाटूं लागतें. निसर्गावरील परांजपे यांची प्रीति पुढील वाक्यानीं अधिकच स्पष्ट होते. "निसर्गसुंदर स्थलें हीं कवितेच्या वास्तव्याचीं ठिकाणें होत. या ठिकाणीं परमेश्वरानें आपल्या हातानें मोठमोठ्या अक्षरांनीं सुंदर सुंदर काव्यें लिहून ठेवलेलीं असतात. कवीच्या काव्यांतील कठिण स्थळे या ठिकाणीं बसून विचार केल्यास सहज उकलतात, आणि तत्त्वज्ञानाच्या पुस्तकांतील गूढ तत्त्वें या. ठिकाणीं सुलभ होतात. येथें

नेहमीं राहणारे लोक खरोखर धन्य होत." प्रस्तुत निबंध या संग्रहांतील सर्वांत अधिक काव्यमय म्हणावयास हवा.

यासारख्या निबंधांतून व्यक्त होणारी परांजपे यांची रसिकता विद्वत्तेला पारखी नव्हती याचा प्रत्यय तर सबंध संग्रहांतच येतो. वेदान्त, तर्क, मीमांसा या संस्कृतामधील शास्त्रांशीं त्यांचा असलेला परिचय मधून मधून येणाऱ्या शब्दांच्या योजनेनें व्यक्त होतो. आब्रह्मस्तंबपर्यंत, अपरोक्षअनुभूति, असदेवेद-मग्र आसीत्, इहामुत्रफलभोगविराग, मिथ्याज्ञानजन्य भय इत्यादि शब्दप्रयोग त्यांचा वेदान्ताशीं असणारा परिचय स्पष्ट करितात. पण त्यांच्या विद्वत्तेचे अधिक पुरावे येथें देत बसण्याचें कारण नाहीं. ती सर्वमान्यच होती. या विद्वत्तेमुळें त्यांच्या भाषेला प्रौढ असें स्वरूप प्राप्त झाल्यानें तीमधील खाचा-खोचा सहज वाचन करणाऱ्याच्या लक्षांत येणें कठिण आहे. प्रौढतेबरोबर त्यांच्या लेखनांत कांहींसा पाल्हाळ शिरलेला दिसतो. हा दोष अर्थात् त्या काळाचा होता. त्या वेळच्या सर्वच लेखनाची पद्धति प्रौढमन्थर अशी असे. अगदीं घरगुती आणि खेळकर अशी भाषा क्वचितच दिसे. निबंधाकरितां कल्पित कथांचा आश्रय परांजपे करीत, पण कथेची मांडणी कलात्मक करण्या-कडे त्यांचें लक्ष नसे. कथेचा वेष उघड उघड विषयांवर नीट बसत नसे. असें असूनहि त्या कथा चित्तवेधक ठरत. त्या त्यांच्या विषयामुळें व त्याविषयीं लेखकास वाटणाऱ्या जिव्हाळ्यांतून निर्माण झालेल्या उपरोधामुळें होय. त्या उपरोधाचा आणि जिव्हाळ्याचा उपयोग परांजपे यांनीं स्वदेशसेवेसाठीं केला हीच त्यांची थोरवी होय.

अखेरीस एक विचार मनांत आल्यावांचून राहत नाहीं. राजकीय परिस्थिती-मुळें का होईना, या प्रतिभावन्ताची प्रतिभा एकारली होती. प्रचलित राजकारण हा एकच एक विषय तिचा विषय झाला होता. जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत करावयास मिळणारा अनिर्बंध असा जो स्वैरसंचार त्याला ती मुकली होती. स्वातंत्र्य–पारतंत्र्य याच परिभाषेमध्यें ती विचार करूं शकत होती. पारतंत्र्य हा तिचा एक मनोगंड होऊन तिचें सारें कार्य, तिचा विलास, तिचा खेळ या मनोगंडानें आपल्या छायेनें काळवंडून टाकला होता. सह्याद्रीचें रमणीय सौंदर्य मोठ्या उल्हासानें चित्रित करणारी परांजप्यांची प्रतिभा लगोलग येणाऱ्या पारतंत्र्याच्या विचारानें कशी पांगुळल्यासारखी होते. हा

दोष त्यांचा नव्हे, तो परिस्थितीचा आहे. ज्या देशांतील प्रतिभावंतां
आपल्या प्रतिमेचा आणि पांडित्याचा व्यय लोकांमधील स्वातंत्र्यभावने
ज्योत तेवत ठेवण्याकरितां, आणि प्रचलित राज्यव्यवस्थेविषयीं असंत
वाढण्याकरितांच करावा लागतो, त्याच्यासारखा अभागी देश कोणता ? ज
पांडित्यानें नवनवीन ज्ञानाचें दर्शन घेऊन मानवजातीच्या हिताकरितां
व्यवस्थित रीतीनें लोकांपुढें मांडून दाखवून पुढील कित्येक शतकें जगाच
विचाराला वळण लावावयाचें, त्या पांडित्याचा व्यय ' आमचे राज्य
कधींच खरें बोलत नाहींत ' यासारख्या गोष्टीचें प्रतिपादन करण्यांत व्हावा
त्या व्यक्तीचें, समाजाचें, देशाचें आणि एकंदरींत मानवजातीचें दुर्दैव न
काय ? ज्या प्रतिभेनें आपल्या रमणीय विलासानें मानवजीवनांतील आ
निसर्गांतील सौंदर्याचें दर्शन घडविणाऱ्या अलौकिक कलाकृति निर्माण करू
केवळ आपल्या कालांतील आणि देशांतील नव्हे तर आपल्या मागून येणाऱ्
आणि इतर देशांतील लोकांनाहि आनंदाचा आस्वाद द्यावयाचा त
प्रतिभेला ' एक चमत्कारिक खेडेगाव ' किंवा ' एक कल्पित गोष्ट ' य
सारख्या तात्कालिक महत्त्वाच्या अचिरजीवी कथा लिहूनच आपलें कार्य करा
लागावें यासारखा दुसरा दुर्विलास कोणता ? देश स्वतंत्र असता तर परां
प्यांना आपली प्रतिभा आणि आपलें पांडित्य हीं तात्कालिकापेक्षां चिरंतनाच्य
कार्याकारणें खर्च करितां आलीं असतीं, व जागतिक आणि अक्षर अ
वाङ्मयामध्यें स्वतःस आणि स्वतःच्या देशास मानाचें स्थान मिळवितां आ
असतें. अशा वाङ्मयाच्या चढाओढींत परांजपे यांच्या आजच्या वाङ्मया
स्थान कोणतें आहे असा प्रश्न कोणीं केल्यास त्याला निःशंकपणें उत्तर को
निःपक्षपाती टीकाकारास देतां येईल काय ? परांजप्यांच्या वाङ्मयांतील तात्क
लिक महत्त्वाचें वाङ्मय किती, आणि सार्वकालीन आणि सार्वजनीन महत्त्वा
किती ठरण्याजोगें आहे ? पण कालोदरांतून नुकत्याच पुनः बाहेर पडलेल्या 
प्रस्तुत वाङ्मयाविषयीं आपण आजच मत देण्यापेक्षां त्या कालालाच तें दे
द्यावें हेंच अधिक योग्य होईल.

पुणें,
तारीख १०-९-१९४६

रा. श्री. जोग

# विश्वेश्वरापाशीं विनंति : : : १

काळ : अग्रलेख, ता. ६-४-१९०६

● वर्षारंभींची प्रार्थना

नवीन वर्षाचा आरंभ म्हणजे आनंदाचा दिवस, ही समजूत आजपर्यंत कशी तरी टिकली. परंतु याच्यापुढें ती टिकणें दुरापास्त दिसत आहे. कारण, हिंदुस्थानांतील लोकांना नवीन वर्ष येतें, पण तें आपल्याबरोबर आनंद घेऊन येत नाहीं. विक्रम आणि शालिवाहन यांनीं एकेकदां मोठे पराक्रम करून आपलें शक स्थापिले आणि आपल्या देशांतील सर्व लोकांना सुखी करून सोडलें. त्या दिवसाचें स्मरण म्हणून हल्लींच्या पाडव्याचे सण साजरे करण्यांत येतात. हे सण म्हणून हल्लीं यांत कांहीं आनंद आहे असें नाहीं. त्यांत केवळ मागच्या आनंदाची आठवण सांठविलेली आहे. आणि जर मागच्या आठवणींबद्दल आपण इतका उत्सव करतों, तर हल्लींच्या आनंदाच्या प्रत्यक्ष अनुभवाबद्दल आपण किती तरी जास्त उत्सव केले असते! पण तसे अनुभव आपल्याला अनुभवावयाला सांपडत आहेत कोठें? इंग्लिशांच्या नवीन वर्षाचा नवीन दिवस आला म्हणजे लोकांमध्यें आनंदाचें भूत संचारून देण्याकरतां ते कांहीं छांछू करीत असतात. पण ती मंत्रविद्या हिंदुस्थानांतील नेटिव लोकांच्या मनावर आनंदाचा यत्किंचितही परिणाम उत्पन्न करीत नाहीं. इंग्लिश लोक आपल्याकडून जानेवारीच्या पहिल्या तारखेला बरीच धामधूम करितात. सकाळीं तोफांचा गडगडाट उडवून देतात, आणि जेथें सैन्य असेल तेथें एखाद्या मैदानावर ह्या सैन्याची परेड करून घेतात.

पण ह्यानें लोकांना काय आनंद वाटणार ? ह्या कोणाच्यां तोफा आहेत, त्या तोफा आपल्या येथें कां उडत आहेत, आणि आपल्या चैत्र शुद्ध प्रतिपदेचा हा दिवस नसून आज ह्या आनंदाच्या मेघगर्जना कां होत आहेत, हे प्रश्न लोक आपल्या मनाला विचारूं लागले, आणि त्यांचीं त्यांना बरोबर उत्तरें कळूं लागलीं, म्हणजे आनंदाचा प्रतिस्पर्धी असा जो विकार तो त्यांच्या मनामध्यें उद्भवूं लागतो. इंग्रज लोक जानेवारींतील वर्षप्रतिपदेच्या दिवशीं आपल्या गॅझिटमध्यें सन्मानाच्या पदव्या देऊन लोकांना आनंदित करण्याविषयीं खटपट करीत असतात. पण नेटिवांच्या वांटणीला येणाऱ्या पदव्यांची संख्या फार तर दहापांच आणि नेटिव लोकांची संख्या तीस कोटि ! अशा स्थितींत दहापांच बिनमोलाच्या पदव्यांनीं तीस कोटींपैकीं कोण कोण म्हणून आनंदित होणार ? खुद्द ज्यांना ह्या निरुपयोगी पदव्या मिळतात त्या दहापांच माणसांखेरीज बाकी कोणीही संतुष्ट होत नाहींत. विक्रम व शालिवाहन ह्यांची गोष्ट याहून अगदीं भिन्न आहे. विक्रम आणि शालिवाहन आपल्या देशांतील व आपल्या धर्माचे राजे आहेत, असें हिंदुस्थानांतील प्रत्येक मनुष्याला वाटत आहे. आणि त्यामुळें त्यांच्या शकाच्या प्रारंभाच्या वर्षसणाबद्दल हिंदुस्थानांतील प्रत्येक मनुष्याला साहजिकपणेंच आनंद वाटतो. ते आतां कधीं आपल्या तोफा उडवीत नाहींत, तरी त्यांच्या विजयदुंदुभींचे आवाज चैत्र शुद्ध प्रतिपदा आणि कार्तिक शुद्ध प्रतिपदा या दिवशीं हिंदुस्थानांतील प्रत्येक मनुष्याच्या कानाला अद्यापिही ऐकूं येत असतात ! आणि ते जरी आतां आपल्या नवीन वर्षाच्या पहिल्या दिवशीं कोणाला कांहीं पदव्या देत नाहींत, तरी हल्लींच्या शुष्क पदव्यांपेक्षां शतपटींनीं जास्त अशी जी स्वतंत्रता ती यांनीं आपल्याला एकदां दिली, हें स्मरून सर्व लोक त्या स्वतंत्रतेचा उत्सव अद्यापिही प्रतिवर्षीं करीत असतात. शककर्ते विक्रम आणि शालिवाहन यांच्या शकवर्षाचा पहिला दिवस म्हणजे आपल्या देशाच्या स्वतंत्रतेचाच वाढदिवस होय. त्या दिवशीं आपण आपल्या गुलामगिरीच्या शृंखळा तोडून टाकून आपल्या देशानें स्वतंत्रतेची गुढी उभारली, हा पूर्वेतिहास लक्षांत येऊन आर्यावर्तांतील सर्व अंतःकरणें विशेष प्रेमानें या स्वतंत्रतेच्या वाढदिवसाकडे ओढ घेऊं लागतात. पण जानेवारीच्या पहिल्या तारखेसंबंधानें भारतवर्षांतील लोकांच्या मनांत तसें कांहींच उद्बोधित होत नाहीं. जानेवारीच्या पहिल्या तारखेला

आपण काय केलें आहे ? त्या दिवशीं काय आपण गुलामगिरीच्या तोरड्या तोडून टाकिल्या आहेत ? किंवा आपल्या स्वतंत्रतेचे विजयध्वज त्या दिवशीं उभारले आहेत ? त्या दिवशीं आपल्या विक्रमांनीं काय पराक्रम केले आहेत ? किंवा शालिवाहनांनीं कोणतीं मातीचीं सैन्यें शत्रूवर चढाई करून चालवून नेलीं आहेत ? जानेवारीच्या पहिल्या तारखेला असें जर कांहीं झालें नाहीं, तर त्या दिवसाबद्दल लोकांच्या मनांत खरा आनंद उत्पन्न होणें कसें शक्य होईल ? ज्यांनीं आपला देश जिंकला, ज्यांनीं आपलीं राज्यें घेतलीं, ज्यांनीं आपली स्वतंत्रता लयाला नेली, आणि ज्यांनीं आपल्या नांवावर भिक्षा मागण्याची यावच्चंद्रदिवाकरौ चालणारी जहागीर चढवून दिली, त्यांच्या वर्षाचा हा पहिला दिवस आहे असें समजून आल्यानंतर हा दिवस म्हणजे आपल्या गुलामगिरीचा वाढदिवस असें प्रत्येकाला वाटूं लागतें. ज्या दिवशीं वाढवीस असतो, त्या दिवशीं आया अतिशय आनंदानें आपलीं मुलें धारणापाशीं उभीं करतात, त्या प्रमाणभूत स्तंभावर मागची खूण असते तिच्यापेक्षां आतां मूल किती जास्त वाढले हें पाहण्यांत येतें आणि मग त्या धारणाची दूर्वा, कापूस इत्यादि द्रव्यांनीं पूजा करून हें मूल धारणासारखें उंच होऊं दे, दूर्वेसारखा याचा वेल वाढूं दे, आणि कापसासारखें हें म्हातारें होऊं दे, अशी देवापाशीं प्रार्थना करण्यांत येते. हा वाढदिवसाच्या दिवशींचा प्रयोग सर्वांना माहीतच आहे. हाच प्रयोग हिंदुस्थानच्या गुलामगिरीच्या व वाढदिवसाच्या दिवशीं ज्या आईनें या गुलामगिरीला हिंदुस्थानामध्यें जन्म दिला आहे ती करीत असते! "माझी ही छचकडी गुलामगिरीरूपी कन्या या देशांत गुरस्तापेक्षां यंदां इतकी जास्त वाढली हें फार चांगलें झालें; ही एखाद्या धारणाप्रमाणें या देशांत अशीच उंच वाढो! दूर्वेप्रमाणें ह्या गुलामगिरीचे वेल या देशांत चोहोंकडे पसरोत! आणि कापसाप्रमाणें ही गुलामगिरी या देशामध्यें पिकून ती येथें चिरकाल टिको!" अशी मनोभावानें न्यायी आणि दयाळु परमेश्वरापाशीं परोपकारबुद्धीनें प्रार्थना करण्यांत येते. असले हे जे गुलामगिरीचे वाढदिवस हिंदुस्थानमध्यें गाजविले जातात, यांच्याकडे फारच थोड्या लोकांचें लक्ष जातें. वास्तविक पाहिलें असतां इंग्लिश लोक हे आपले राजे आहेत. तेव्हां ते जे जे महोत्सव करतील त्या त्या महोत्सवांबद्दल आपण राजनिष्ठा दाखविली पाहिजे! त्यांची जी प्रत्येक तोफ उडेल ती किती मोठ्यानें

आणि मंजेनें वाजली, असें म्हणून आपण आनंदानें उडी मारली पाहिजे! आणि त्यांनीं दिलेल्या शब्दप्रचुर व अर्थशून्य पदव्या ऐकल्याबरोबर 'काय हा उदारपणा' असें आश्चर्य आपण प्रकट केलें पाहिजे! ह्या सर्व गोष्टी खऱ्या आहेत. परंतु पोटाच्या मदतीवांचून मनाला आनंद मानतां येत नाहीं, ही एक इंग्रजांच्या वाटेंत देवानें मोठी अडचण घालून ठेविली आहे! आणि पोटाला भरपूर अन्न मिळालें नाहीं म्हणजे तें जानेवारीच्या पहिल्या तारखेला मनाला आनंदित होऊं देत नाहीं, उड्या मारूं देत नाहीं, किंवा इंग्लिशांच्या औदार्याची तारीफ करूं देत नाहीं. या पोटाच्या अडचणीमुळें हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचे व दिग्विजयाचे जे चैत्र शुद्ध प्रतिपदेचे खरे वाढदिवस, त्यांबद्दल-सुद्धां हिंदुस्थानांतील लोकांना आनंद होईनासा झाला आहे; मग त्यांच्या गुलामगिरीच्या आणि परराज्याच्या वाढदिवसाबद्दल त्यांना आनंद कोठून होणार? इसवी सनाचा प्रतिवार्षिक पहिला दिवस, एम्पायर डे, अमक्याची श्राद्धतिथि, तमक्याचा जन्मदिवस आणि तिसऱ्या एखाद्या अजून जन्मास यावयाच्या भाग्यवान् महापुरुषाच्या गर्भसंधारणेचा क्षण, या सगळयांबद्दलचे सण एकाच वर्गांत मोडणारे आहेत. हे दिवस म्हणजे आपल्या गुलामगिरीच्या वर्धापनमहोत्सवाचे सण होत. या सणांबद्दलही आपल्याला राजनिष्ठा जरूर पाहिजे. पण राजनिष्ठा हा मनोविकार पोटांत पोटभर अन्न असेल त्या वेळीं उत्पन्न होतो. परंतु दुर्दैवानें तशी स्थिति नसल्यामुळें आमच्या स्वातंत्र्याच्या वाढदिवसाचेही सण आम्हांला नीरस आणि निःसत्व वाटूं लागले आहेत.

वर्षप्रतिपदा आली म्हणजे आपण गुढ्या उभारतों. पण कांहीं महत्कृत्य केल्यावांचून आपण या गुढया उभारीत आहों असें आपल्या मनाला खात असतें. गुढया हें दिग्विजयाचें चिन्ह आहे. तसा कांहीं तरी दिग्विजय केल्यावांचून नुसत्या गुढया उभारणें म्हणजे स्तंभ आणि ध्वजांचीं फडकीं यांना विनाकारण श्रम देण्यासारखें आहे. हल्लींच्या गुलामगिरीच्या स्थितीमध्यें पूर्वींच्या स्वातंत्र्याच्या वाढदिवसाचे सोहळे करणें काय उपयोगी आहे? आणि म्हणूनच लोकांचीं मनें याहि लौकिक आचारांवरून अगदीं उडून चाललीं आहेत. हे सण म्हणजे मागच्या सुखाचें स्मरण होय. पण जर नवीन सुखें कांहींच प्राप्त होत नसतील, तर नुसतें जुन्या सुखांचें स्मरण देखील महत्त्वाकांक्षी व स्वाभिमानी अशा मनाला कांहीं दिवसांनीं अगदीं कंटाळवाणें होऊन जातें. प्रत्येक

वर्षाबद्दल कांहीं तरी आशा वाटत असते; परंतु त्या सगळ्या आशांची निराशा करून तें वर्ष जसें आलें तसें निघून जातें. या वर्षी आपल्या देशाचा कांहीं तरी फायदा होईल, या वर्षी आपला देश राष्ट्रीय प्रगतीमध्यें कांहीं तरी चार पावलें पुढें सरसावेल, असें प्रत्येक वर्षी वाटावें, आणि तें सगळें अखेरीस उन्हाळ्यांतील बर्फाप्रमाणें वितळून जावें, अशी स्थिति आज कित्येक वर्षेपर्यंत नियमानें चालू असल्यामुळें नवीन प्राप्त होणाऱ्या वर्षावरील लोकांचा भरंवसा उडून जातो, व नवीन वर्षाच्या गर्भाशयामध्यें आपल्या हिंदुस्थान देशा-संबंधानें कांहीं अद्भुत भावी गोष्टी असतील असें कोणालाही वाटत नाहीं. प्रत्येक तीनशेंपासष्ट दिवसांनीं वर्ष बदलतें. परंतु हिंदुस्थानची दुःस्थिति मात्र जशी आहे तशी कायम आहे. प्रत्येक वर्षांत तीनशेंपासष्ट वेळां सूर्य उगवतो आणि मावळतो, पण तो एकदांही अद्यापि असा उगवला नाहीं कीं, ज्या दिवशीं त्यानें हिंदुस्थानाला फिरून वैभवाच्या शिखरावर पाहिलें आहे! नवीन वर्ष सुरू झालें म्हणजे वसंतऋतु येतो, आणि प्रत्येक झाडाला पालवी उत्पन्न करतो. परंतु या आपल्या हिंदुस्थान देशाचें झाड इतकें वठून गेलें आहे कीं, कोणताहि वसंतऋतु त्या झाडाला पालवी उत्पन्न करूं शकत नाहीं. असा वसंतऋतु केव्हां येईल कीं, ज्याच्या योगानें हा भरतवर्षाचा वृक्ष पल्लवांनीं, पुष्पांनीं व फलांनीं ओथंबून जाईल! नवीन वर्षाच्या सुरुवातीस मागील सालच्या गोष्टीचें सिंहावलोकन करण्याची एक वहिवाट आहे. पण तसें अवलोकन केलें तरी मागें काय दिसत आहे? दुःख, निराशा, अंधकार, व आहे तेथेंच असलेलें पाऊल, यांच्याशिवाय मागें पाहिलें तर दुसरें काय दिसत आहे? वर्षाच्या अखेरीस आढावा काढण्याची व्यापारी लोकांची चाल आहे. पण हिंदुस्थानच्या हिशेबाचा आढावा काढला तर त्यांत दुसरें काय दिसून येणार आहे? आपल्या हिंदुस्थानांतून इंग्लिशांनीं इतके रुपये गोळा केले, त्यांपैकीं इतके येथें उधळले आणि बाकीचे विलायतेस नेऊन ठेविले, याच्यापलीकडे कोणत्याही सालच्या आढाव्यामध्यें दुसरें काय दिसून येणार आहे? अशा दुःसह स्थितीमध्यें जो देश येऊन पडला आहे, त्याला हे विश्वेश्वरा, तुझ्यावांचून कोण वर काढील?

देवा, तुझ्यापाशीं लोक नाना तऱ्हेचीं मागणीं मागतात; कोणी पुत्र मागतात, कोणी पौत्र मागतात, कोणी धन मागतात, कोणी धान्य

मागतात, कोणी घर मागतात, कोणी दार मागतात, कोणी लग्न होऊं द्या म्हणून म्हणतात, आणि कोणी सांडलेल्या वस्तु परत मिळवूं इच्छितात ; पण आपल्या देशाचें उत्कृष्ट राजकीय हित तुझ्यापाशीं कोणीच मागत नाहींत ! आपला देश सुस्थितींत असल्यावांचून पुत्रपौत्र, धनधान्य, किंवा घरदार हीं मिळवून काय करावयाचीं आहेत ? ज्याच्यावर ह्या सगळ्या गोष्टी अवलंबून आहेत तो देशच जर ठिकाणावर नाही, तर ह्या गौण गोष्टी मागून काय करावयाचें आहे ? देवकी कंसाच्या कारागृहांत होती तेव्हां ती आपल्याला पुत्र न होवोत अशी इच्छा करीत होती. कारण, बंदिशाळेंत मुलांस जन्म देऊन जास्त बंदिवान् गुलाम, आणि दास निर्माण करून ठेवण्यांत किंवा वध्य शिळेवर आपटण्या-करितां पाठविण्यांत काय मतलब आहे, असे देवकीचे विचार होते. रामजन्माच्या आधीचे लोक धनधान्यासाठीं देवांना कधींही नवस करीत नव्हते. कारण, जें धनधान्य आपल्यापाशीं राहण्याची शाश्वती नाहीं, तें उगीच आपल्यापाशीं जमवून ठेवण्याचे श्रम घेण्यांत कांहीं फायदा नाहीं, असें त्यांना वाटत होतें. तसेंच भगवंतांनीं वराह अवतार धारण करण्यापूर्वी व डळमळ-णारी पृथ्वी आपल्या दाढेच्या टोंकावर दृढ करण्यापूर्वी ' आम्हांला घरदार द्या ' अशी देवापाशीं कोणीही याचना करीत नसत. कारण, आधारभूत पृथ्वीच जोंपर्यंत डळमळत आहे, तोंपर्यंत तिच्यावर आपण मोठ्या सात मजली हवेल्या बांधल्या म्हणून त्या एखाद्या वेळीं घडघडल्यावांचून काय राहणार आहेत, असें त्या लोकांना निश्चयानें वाटत होतें. सारांश, देशस्थिति चांगली असल्या-वांचून इतर ऐहिक कामनांसाठीं, हे देवा, तुजवर भार घालणें म्हणजे तुला व्यर्थ शिणविण्यासारखें आहे. याच्यापेक्षां या सगळ्यांना आधारभूत अशी जी स्थिति तीच तुजपाशीं मागितली असतां काय वाईट ? ती आम्ही तुजपाशीं मागतों. आमच्या देशावर तूं कृपादृष्टीनें पाहा. आमच्या देशहिताच्या प्रयत्नांना तूं यश दे. आमच्या धर्माचें तूं संरक्षण कर. आणि आम्हांला झोंप लागली असतां आमच्या चोरीस जाणाऱ्या वस्तु तूं आमच्याकरतां जागृत राहून संभाळ. तूं न्यायी आहेस. इतर न्यायी म्हणविणाऱ्या राजांच्या अमलांत न्यायाच्या नांवाखालीं वाटतील तसे अन्याय होवोत; पण तो कलंक तुझ्याही राज्यपद्धतीला लागू व्हावा, हें तुझ्या औदार्यवळीला उचित नाहीं. तूं या देशाकडे

आज शंभर वर्षें पाठ फिरविली आहेस. त्या अवधींत इकडे काय चाललें आहे, याची तुला दाद तरी आहे काय? तूं एक सर्वसाक्षी तरी नसला पाहिजेस किंवा पक्षपाती तरी असला पाहिजेस. आम्ही इतके हालांत असतां तूं आमच्या संरक्षणासाठीं कांहीं करीत नाहींस हें मोठें आश्चर्य आहे. परंतु तुला दोष देण्यांत अर्थ नाहीं. तूं नेहमीं मनुष्यांच्या प्रयत्नांची अपेक्षा करीत असतोस. परंतु हल्लीं हिंदुस्थानांतील लोकांचे स्वदेशसेवेसाठीं प्रयत्न सुरू झाले आहेत. लहान मुलांच्या मनांत त्यांच्या जन्माबरोबरच आपण स्वदेशसेवा करावी ही बुद्धि जन्म पावत आहे आणि मरणोन्मुख झालेल्या वृद्ध लोकांच्या मनाला आपण स्वदेशसेवेसाठीं झटतां झटतां मरावें असें वाटूं लागलें आहे. स्वदेशसेवा हेंच आपलें सौभाग्य, असें स्त्रियांना भासूं लागलें आहे. शाळांतून सरकारी बंदीला टाळूनही स्वदेशसेवेचे धडे शिकविले जात आहेत. आणि हल्लींचा व्यवहार वयोवृद्ध माणसांना पावलोपावलीं स्वदेशसेवेची आवश्यकता सुचवीत आहे. पक्षी स्वदेशसेवेचीं गाणीं गात आहेत. हिंदुस्थानांतील नद्यांमधून स्वदेशसेवेचे तुषार उडत आहेत; आणि अग्नीमधून स्वदेशसेवेच्या ठिणग्या बाहेर पडत आहेत. पर्वतांमधून स्वदेशसेवेच्या आरोळ्यांचे प्रतिध्वनि दुमदुमत आहेत, आणि सोसाट्याच्या वाऱ्यामध्यें स्वदेशसेवेचीं तत्त्वें घोंघावत आहेत. भ्रमर स्वदेशसेवेचा गुंजारव करीत आहेत आणि झाडें 'स्वदेशसेवा' 'स्वदेशसेवा' असे शब्द गुणगुणत आहेत. हिंदुस्थानच्या पृष्ठभागावर पाऊस स्वदेशसेवेचा वर्षाव करीत आहे, व सूर्य लोकांच्या मनांत स्वदेशसेवेचा प्रकाश पाडीत आहे. आणि रात्रीच्या निवांतपणामध्यें आकाशांतील तारे आणि ग्रह हिंदुस्थान देशाला उन्नत अवस्था कशी प्राप्त होईल व तेथील लोकांच्या निस्सीम स्वदेशसेवेला योग्य फळ कसें मिळेल, याबद्दल खलबतें करीत आहेत! याप्रमाणें जिकडे तिकडे स्वदेशसेवेचें तत्त्व भरून राहिलें आहे. याला अंकुर फुटण्याला, हे विश्वेश्वरा, तुझ्या कृपामृताच्या फक्त एका बिंदूची अपेक्षा आहे. आणि याचा बार उडण्याला, हे विश्वेश्वरा, तुझ्या अपरिमित तेजांतील एका ठिणगीचा अवकाश आहे. तूं इतर देशांकडे पुष्कळ दिवस पाहिलेंस. आतां तूं आमच्या देशाकडे पाहा!

---

## उडदाच्या राशींत आणखी एक उडीद स्वतंत्र : २

काळ : अग्रलेख, ता. ६-४-१९०६

● ता. १-८-१९०५ च्या केसरींत पोलिस सुपरिंटेंडंट हेन्री ब्रुइन यांच्या मृत्यूनंतर लो. टिळकांनीं अग्रलेख लिहिला ही गोष्ट लोकांच्या अदमासाबाहेर गेली. हा मृत्युलेख लिहितांना लो. टिळकांच्या मनांत पोलिस खात्याविषयींच्या नेहमींच्या भावनेवर व्यक्तिगत किंवा सार्व-जनिक कृतज्ञतेचा पगडा बसला हा आक्षेप आणला गेला. आपण केवळ ' उडदांतला गोरा उडीद निवडून वेगळा करीत आहों ' असें त्यांनीं प्रथमच सांगितलें. हेंच पालुपद काळकर्त्यांनीं या लेखाला घेतलें आहे.

इंग्लिशांनीं हिंदुस्थानचें राज्य जिंकतांना युक्त्या आणि लुच्चेगिऱ्या केल्या आहेत ही गोष्ट आज कांहीं नव्यानें सांगितली पाहिजे असें नाहीं. तसेंच कोळशाचा रंग कसा आहे हें दाखवण्याला तो आज कांहीं नव्यानें उगाळून दाखविला पाहिजे असें नाहीं. तरी पण उडदाच्या मोठया राशींत इतिहास-ज्ञांच्या परिचयासाठीं आम्हांला आढळलेल्या आणखी एका उडदाच्या काळ्या दाण्याची आम्ही अत्यंत नम्रपणानें एक अतिशय अल्प भर टाकीत आहों. तिकडे अवधान असावें.

कथाभाग गेल्या शतकाच्या पूर्वार्धातील आहे. सिंधच्या अमिरांचा मुलूख आणि रणजितसिंगाचा पंजाब, हे प्रांत अजून स्वतंत्र होते. परंतु पापग्रहांची त्यांच्याकडे दृष्टि वळलेली होती. ते प्रांत इंग्लिशांना जिंकावयाचे होते. परंतु त्या प्रांतांत कसा शिरकाव करावा, रस्ते कोणते, लोक कसे आहेत, तटबंदीचीं ठिकाणें कोठेंकोठें आहेत, सिंधु नदाच्या पात्रांतून इंग्लिशांच्या सन्यै भरलेल्या आगबोटी वर जातील किंवा नाहीं, गेल्या तर त्या कोठपर्यंत जातील, नदीच्या पात्रांत आणि सिंधी व पंजाबी लोकांच्या अंतःकरणांत कोठें किती पाणी आहे, याबद्दल इंग्लिश लोकांना कांहींच माहिती नव्हती! अशा स्थितींत दुसऱ्या ठिकाणाहून आलेल्या परस्थ आणि गैरमाहीतगार अशा मूठभर लोकांनीं काय बरें करावें? देवासारखा निष्ठुर आणि निर्दय मनुष्य या जगांत दुसरा कोणीही आढळणार नाहीं! त्यानें एके दिवशीं रात्रीं येऊन इंग्लिशांच्या कानांत हुकूम केला कीं, तुम्हीं सिंधु, सरस्वती, शतद्रु, विपाशा, वगैरे नद्यांच्या कांठच्या लोकांना तुमच्या उत्तम राज्यपद्धतीच्या साम्राज्याच्या सुखांत आणून लोटलें पाहिजे! देव नुसते हुकूम करण्याला मात्र पुढें पुढें, पण त्याबद्दलचीं साधनें देण्याला मागें मागें, हा देवाचा तोंडघशीं पाडणारा स्वभाव इंग्लिशांना माहीत! परंतु देवाची आज्ञा तर मोडतां कामा नये! तेव्हां इंग्लिशांनीं लेफ्टेनंट बर्न्स या नांवाचा एक गुप्त हेर तयार केला. तो आपल्या लष्करी खात्यांतील एक गुप्त हेर आहे असें कळून, देवाचा हेतु निष्फळ होऊं नये म्हणून त्याला प्रवासाचें सोंग देण्यांत आलें, व पुढील बतावणी त्याप्रमाणें सुरू झाली.

बर्न्ससाहेब आणि रणजितसिंग यांचा कांहीं स्नेह होता असें नाहीं. तरी पण मुंबईस असतांना बर्न्ससाहेबांना एके दिवशीं असें वाटलें कीं, आपण कांहीं गाडीचे घोडे रणजितसिंगाला नजर करण्यासाठीं प्रवासाला निघावें! पण इंग्लिशांना एका दगडानें दोन पांखरें मारावयाचीं होतीं. त्यांना जशी पंजाबांतील माहिती पाहिजे होती, तशी सिंधमधीलही पाहिजे होती. तेव्हां या प्रवासाबरोबर सिंधच्या अमिरांनाही कांहीं नजराणे देण्यांत आले. परंतु सिंधु नदाच्या मुखांतून कोणत्याहि ब्रिटिश गलबतानें वर येऊं नये, असा त्या वेळीं अमीर आणि इंग्लिश यांच्यामध्यें तह झालेला होता. त्यामुळें बर्न्ससाहेबांना नदींतून वर जाण्याला परवानगी मिळेना. तेव्हां

केवळ देवाच्या आज्ञेसाठीं बर्न्ससाहेबांनीं खोटें बोलून अशी बतावणी केली कीं, 'तुम्हांला इंग्लिशांबद्दल संशय येत आहे, ही तुमची चूक आहे. तुमच्या आमच्यामधील स्नेहसंबंध जास्त दृढ व्हावे म्हणून मी आलों आहें!' सिंध प्रांताचा आणि इंग्लिशांचा संबंध दृढ करण्याकरितां बर्न्ससाहेब गेले होते, तो संबंध दृढ झाला आहे खरा! पण ज्या अमिरांशीं स्नेहसंबंध जुळविण्याकरितां ते गेले होते, ते अमीर आणि त्यांचें तें राज्य हीं आज कोठें आहेत? इंग्लिश लोक असला स्नेहसंबंध करण्याकरतां येत असतात!

बर्न्ससाहेबांची बोट अशा लुच्चेगिरीनें सिंधु नदाच्या तोंडांतून सुटून सिंध प्रांताच्या पोटांत घुसली! ही बोट वर चालली असतां कित्येक मूर्ख लोक इंग्लिशांबद्दल कौतुक करीत होते. परंतु कोणी एक धूर्त आणि शहाणा सय्यद नदीच्या कांठीं उभा होता. त्याच्या तोंडून असे उद्‌गार निघाले कीं, 'अरेरे, आज आपला सिंध देश गेला! आपला देश जिंकण्याची जी मुख्य वाट ती इंग्लिशांना पाहावयाला मिळाली.' बर्न्ससाहेब अशा रीतीनें हैदराबाद येथें येऊन पोहोंचले. हे व्यापारी प्रवासी असल्यामुळें तेथें आल्याबरोबर त्यांनीं आपल्या व्यापाराला सुरवात केली. त्यांनीं तेथील किल्ला, माऱ्याच्या जागा, सांपत्तिक स्थिति, वगैरेबद्दलचीं गुप्त टिपणें येणेंप्रमाणें लिहिलीं आहेत: "येथील किल्ला अगदीं भिकार आहे. खंदक दहा फूट रुंद व आठ फूट खोल आहे. किल्ल्याच्या भिंती २५ फूट उंच आहेत. पण त्या पडत चालल्या आहेत. किल्ल्याच्या मध्यभागीं एक मोठा विस्तीर्ण मनोरा आहे, पण तो किल्ल्याशीं जोडलेला नाहीं. या मध्य ठिकाणच्या इमारतींत सिंध प्रांताचा सगळा खजिना सांठवलेला आहे, व तो सुमारें वीस कोटि रुपये किंमतीचा असावा." पुढें हैदराबादच्या किल्ल्यावर हल्ला करण्याकरतां येणाऱ्या सैन्याच्या माहितीकरतां या प्रवासी गुप्त हेरानें या गोष्टी नोंदून घेतल्या होत्या. हल्लीं इंग्लिशांच्या ताब्यांत जे किल्ले आहेत, तेथील फोटोसुद्धां घेण्याची बंदी आहे. मग इतकी माहिती मिळविण्याची गोष्ट तर लांबच राहिली! असा बंदोबस्त सिंधच्या अमिरांनीं आपल्या किल्ल्यावर ठेविला असतां तर फार बरें झालें असतें! पण जो पाहुणा म्हणून घरांत येऊन असा दगलबाजपणा करतो, त्याचा कसा बंदोबस्त करावा, हें सरळ मनाच्या प्रामाणिक माणसांना

नेहमींच समजत नाहीं. पण अशावर जाऊन उपयोगी नाहीं. जगांत चोर आणि हरामखोर लोक असतात हें प्रत्येकानें लक्षांत बाळगिलें पाहिजे.

बर्न्ससाहेबांच्या बोटी पोहत पोहत हैदराबादेवरून खैरपूरला आल्या. येथें खैरपूरच्या अमिरांकडून दररोज दीडशें माणसांचा कोरडा शिधा आणि पाऊणशें माणसांचें शिजविलेलें अन्न त्यांच्या खुशामतीसाठीं येऊं लागलें. आणि बर्न्ससाहेब व त्यांची मंडळी हें चमचमीत जेवण रोज तेथें असतांना रुप्याच्या ताटांमधून जेवीत होते! पण कृतघ्न मनुष्य जेथें जेवतात तेथेंच देह-धर्म करतात. खैरपूरच्या अमिरानंतर त्याच्या वरच्या प्रांतांतील दुसऱ्या एका अमिराची आणि बर्न्ससाहेबांची गांठ पडली. हा खान इतका श्रीमंत होता कीं, तो रस्त्यानें जातांना पैसे उधळीत असे, व त्यानें बर्न्ससाहेबांना दोन हजार रुपयांचा नजराणा पाठविला. इतकी संपत्ति पाहून—एका इमारतींत वीस कोटि रुपये, शेकडों माणसांना जेवण्याला चांदीचीं ताटें, आणि अमीरसाहेब बाहेर निघाले म्हणजे रुपये उधळीत बाहेर निघावयाचे—अशी बापजन्मीं कधींही न पाहिलेली संपत्ति पाहून कोणाच्या मनाला बरें आशा सुटणार नाहीं? आणि कोण बरें पापपुण्याची भीति कायमची गुंडाळून ठेवणार नाहीं?

अशा रीतीनें सिंधु नदाच्या कांठची माहिती काढीत काढीत बर्न्ससाहेब शीख लोकांच्या सरहद्दीवर येऊन दाखल झाले. शीख लोक भोळे! त्या बिचाऱ्यांना यांचा कावा काय माहीत! त्यांना वाटलें कीं, हे कोणी तरी खरोखरच प्रवासी आहेत. आणि नुकतेच विलायतेहून इकडे प्रवासाकरितां आले आहेत! म्हणून 'तुम्हांला विलायत सोडून किती दिवस झाले?' आणि 'तुमच्या इंग्लंडच्या राजाची प्रकृति बरी आहेना?' असे औपचारिक कुशल प्रश्न त्यांनीं त्यांना केले. इंग्लंडच्या राजांना झालें होतें काय! त्यांच्या प्रकृत्या ठीक होत्या! हिंदुस्थानच्या राजांचींच डोकीं बिघडलीं होतीं. तीं जर ताळ्यावर असतीं तर किती तरी कल्याण झालें असतें! इंग्लंडच्या राजांच्या प्रकृती! हिंदुस्थानचे राजे इंग्लंडच्या राजांच्या प्रकृत्यांबद्दल जितकी काळजी वाहत होते, त्यांच्या एक लक्षांश प्रामाणिक काळजी जरी इंग्लंडच्या राजांनीं हिंदुस्थानांतील राजांच्या व लोकांच्या स्वास्थ्याकरितां बाळगिली असती, तर आज हिंदुस्थानचें इतकें वाटोळें खात्रीनें झालें

नसतें! बर्न्ससाहेबांनीं जसें सोंग आणलें होतें, तशी त्यांनीं त्याची बतावणी केली. ते लिहितात कीं, 'I replied *as circumstances required*'. तेथून खुद्द लाहोर येथें गेल्यानंतर तर बर्न्ससाहेबांचे डोळे तेथलि संपत्तीच्या अलोट तेजानें अगदींच आंधळे होऊन गेले. बर्न्ससाहेब म्हणतात कीं, त्या वेळच्या लाहोरांत जिकडे पाहावें तिकडे संपत्तीच भरलेली दिसत होती. साखळदंड चांदीचे, छप्परपलंग सोन्याचे, दागिने हिरेमाणकांचे, व सतरंज्या रेशमाच्या, अशी अद्भुत लक्ष्मी त्या वेळीं तेथें भरलेली होती. अहाहा! त्या वेळच्या त्या भिकार मानानें हल्लींचें लाहोर शहर कितीतरी सुंदर दिसत आहे! असो. रणजितसिंगाची गाडी ज्या घोड्यांवांचून अटकून राहिली होती, ते घोडे बर्न्ससाहेबांनीं महाराजांना नजर केले! पण हें कृत्य करीत असतांना एकीकडे महाराजांची संपत्ति, किल्ले, बंदोबस्तींचीं ठिकाणें वगैरे सर्व गोष्टींवर त्यांनीं आपली चांगली नजर ठेविली होती, व त्या सगळ्या गोष्टींची नोंद करून घेऊन त्या प्रवासाचा रिपोर्ट या गुप्त हेरांनीं मुंबई सरकारच्या पुढें आणून हजर केला.

फिरून एकदां आणखी बातमी काढण्याकरितां कोणी गुप्त हेर पाठविणें सरकारला जरूर पडलें. त्या वेळींही त्या कामगिरीवर बर्न्ससाहेबांचीच योजना झाली. या वेळीं त्यांना दुसरेंच सोंग देण्यांत आलें होतें. त्यांना एक अविश्वसनीय पासपोर्ट तयार करून देण्यांत आला होता. हें एक ब्रिटिश लष्करी खात्यांतील कॅप्टन असून ते यूरोपला परत जात आहेत, असें त्यांच्या दाखल्यांत लिहून देण्यांत आलें होतें. या पासपोर्टवर पंजाब, काबूल, बुखारा या प्रांतांतील माहिती गोळा करण्याकरितां हे गुप्त हेर निघाले. यांना वास्तविक युरोपांत जावयाचें होतें असें नाहीं; परंतु हिंदुस्थानांतील रानटी लोकाना फसवण्याकरतां कांहीं तरी सबब पाहिजे होती. म्हणून हा खोटा पासपोर्ट पुढें करण्यांत आला. एरव्हीं समुद्रावरची सरळ वाट सोडून या डोंगराळ मुलखांतून इंग्लंडला जाण्याला वास्तविक कोण सिद्ध झाला असता? पण देवाच्या आज्ञेप्रमाणें हिंदुस्थानांतील लोकांना सुखी करण्याच्या कामांत कोणतेंही पातक हें महत्पुण्य आहे, अशी त्या वेळीं इंग्लिश लोकांची प्रामाणिक समजूत होऊन गेलेली असावी असें दिसतें. या खोट्या पासपोर्टवर बर्न्ससाहेबांनीं पंजाब व काबूलमधील फक्त राजकीय माहितीच मिळविली नसून

तेथील नेटिव व्यापार बुडवून इंग्रजी मालाचा खप कसा वाढवितां येईल हेंही त्यांनीं शोधून आपल्या सरकारला कळविलें. या प्रसंगीं त्या गुप्त हेरांनीं व्यापारी प्रवाशाच्याही सोंगाची फार चांगली बतावणी केली. ठठ्ठा, मुलतान वगैरे ठिकाणच्याप्रमाणें कापड इंग्लंडमध्यें कसें करतां येईल, मुलतानचीं चिटें युरोपियन स्वस्त चिटांनीं कशीं हाणून पाडतां येतील, आणि पंजाबी लोकांना पाणी मिसळलेल्या विलायती दारूची चटक कशी लावतां येईल, याबद्दल त्यांनीं कित्येक सूचना केल्या. पण ह्या उपयुक्त गुप्त हेराला अखेरीस काबूलच्या लोकांनीं योग्य बक्षीस दिलें. इंग्लिशांनीं काबूलवर पहिली स्वारी केली त्या वेळीं अकबरखानाच्या शिपायांकडून हा गुप्त हेर गुप्त रीतीनें बातमी मिळविण्याच्या दगदगीपासून मुक्त केला गेला !

---

# अर्जुनाचा वेडेपणा : : : ३

काळ : अग्रलेख, ता. १३-४-१९०६

● परमेश्वर स्वमूलोच्छेदनाच्या सत्कृत्याला हातभार लावो !

कौरवपांडवांचा इतिहास सर्वांना माहीतच आहे. पांडवांचें राज्य कौरवांनीं घेतलें होतें तें परत मिळविण्याचे सर्व सामोपचाराचे उपाय व्यर्थ झाले, आणि अखेरीस लढाईवर पाळी आली. दोन्ही बाजूंचीं सैन्यें कुरुक्षेत्राच्या मैदानावर येऊन उभीं राहिलीं. भीष्माचार्यांनीं सिंहनाद केला. इकडे भीमानें आपला पौंड्रनामक महाशंख वाजविला. त्याच्या मागोमाग सर्व योद्धयांनीं आपले भयंकर शंख वाजवले. नगारे आणि नौबदी यांच्या कर्णभैरव गर्जना होऊं लागल्या. जिकडे तिकडे तुमुल रणवाद्यांची एकच गर्दी उसळून गेली. भयंकर प्रतिध्वनि उठूं लागले. त्या भयंकर निनादामुळें समुद्राचें पाणी वर उसळलें, मेरु डळमळूं लागला, आणि झाडांवरील फुलांप्रमाणें आकाशांतील नक्षत्रें खालीं गळून पडलीं. इतक्या रंगाला रणसंग्रामाची तयारी येऊन पोहोंचली, तेव्हां अर्जुनाच्या आज्ञेप्रमाणें अर्जुनाच्या रथाचे घोडे श्रीकृष्णांनीं कौरवांच्या सेनेकडे वळविले. अर्जुनाचा रथ दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं येऊन उभा राहिला. अर्जुनानें आपली दृष्टि कौरवसैन्याकडे फेंकली आणि त्या क्षणापासून अर्जुनाच्या वेडेपणाला सुरुवात झाली.

कोणताही पाश्चिमात्य अर्जुन अशा स्थितींत उभा राहिला तर तो अर्जुना-सारखें धर्मशास्त्र कधींही बरळत सुटणार नाहीं. अर्जुन एवढा शूर आणि मुत्सद्दी म्हणून म्हणतात, पण त्याचें शौर्य आणि राजकारस्थान हल्लींच्या कसोटीच्या दगडांना लावून पाहिलें तर तें अगदीं फिक्कें पडतें. ज्याच्या अंगांत शौर्य आहे त्यानें धर्माची चिकित्सा करीत बसायचें ? ही केवढी चूक! ज्यांच्या अंगांत देवानें दुसऱ्यांना ठोकून त्यांच्यापासून त्यांचें घरदार, धनधान्य, वतन व राज्य लुटून घेण्याचें सामर्थ्य ठेविलें आहे, ते जर धर्मशास्त्राचा कीस काढीत बसले तर मग बायकापोरांनीं आणि भटाभिक्षुकांनीं काय करावें ? धर्म हा मूळ देवानें अशक्त बायकामुलें आणि अज्ञानी भटभिक्षुक यांचा वेळ जाण्याकरितां केलेला आहे. तें त्यांचें खेळणें, तो त्यांचा करमणुकीचा जिन्नस, बलाढ्य लोकांनीं आपल्या हातांत हिसकावून घेतला तर दुसऱ्याचे खून कोण करील ? दुसऱ्यांना लुटील कोण ? आणि दुसऱ्यांचीं राज्ये हरण करील कोण ? जे फक्त दुसऱ्यांना आपल्या जुलमाखालीं तुडविण्याकरितां देवानें निर्माण केलेले आहेत ते जर आपलें काम सोडून दुसऱ्याच्या कामांत ढवळाढवळ करूं लागतील, तर मग या जगांतील वर्णव्यवस्था बिघडून जाऊन एकंदर अव्यवस्था होईल; धर्म कोणीं पाळावा, आणि कत्तली कोणीं कराव्या, याच्याबद्दलच्या श्रमविभागाच्या सर्व योजना अनवस्थेप्रत जाऊन पोहोंचतील; आणि येथून तेथून सर्व एकच संकर माजून राहील. परंतु हें अर्जुनाच्या मुळींच लक्षांत आलें नाहीं. पण सुदैवाची गोष्ट ही आहे कीं, अर्जुनाप्रमाणें त्याच्या पाठीमागून येणारे सर्वच योद्धे अशी चूक करण्याला प्रवृत्त झाले नाहींत. अशी चूक होण्याची चुकूनसुद्धां भीति करूं नये यासाठीं धर्मतत्त्वें आणि राज्यहरणतत्त्वें यांच्यामध्यें अलीकडे मोठी थोरली अतिशय उंच अशी भिंत बांधून टाकण्यांत आलेली आहे. त्यामुळें आपल्या कृत्यांचा आणि धर्माचा अर्थाअर्थीं कांहीं संबंध आहे असें आतां कोणाच्या स्वप्नांतही येत नाहीं. हल्लींच्या युगांतील प्रत्येक लबाड मनुष्याकडून धर्म हा शब्द बरोबर शंभर वेळां घोकून घेण्यांत येतो, व प्रत्येक लबाडीचें काम करीत असतांना मी हें धर्मासाठीं, न्यायासाठीं, सुधारणेसाठीं, लोककल्याणासाठीं आणि खुद्द परमेश्वरासाठीं करीत आहें, असें त्यानें म्हटलेंच पाहिजे, असे सक्त हुकूम सोडण्यांत आलेले आहेत. त्यामुळें धर्माच्या

आणि लबाडीच्या दरम्यान घातलेल्या उंच भिंतीकडे कोणाचेंही लक्ष न जातां सर्व जगाची राहटी पूर्वीप्रमाणें हल्लींही धर्माच्याच पायावर चालली आहे, असा सर्वांचा समज कायम राहून बलाढ्य लबाडांना गरीब माणसांना लुबाडण्याची फारच निर्वेध संधि सांपडूं लागली आहे. हा अर्वाचीन सुधारणेच्या कल्पकतेपासून जगाचा किती मोठा फायदा झाला आहे इकडे अद्यापि कोणाचें जितकें जावें तितकें लक्ष गेलें नाहीं, ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे.

"न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च। किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥" हे जे नेभळटपणाचे उद्गार अर्जुनाच्या तोंडून निघाले आहेत, तसे हल्लीच्या कोणत्याही योद्धयाच्या तोंडून निघावयाचे नाहींत. "आम्हांला राज्य घेऊन काय करावयाचें आहे? (किं नो राज्येन)" अशा शब्दांनीं आपली जीभ विटाळून टाकण्याइतका एक तरी मूर्ख योद्धा आज पृथ्वीच्या पाठीवर आढळेल काय? राज्य घेऊन करावयाचें काय म्हणजे! राज्य घेऊन तेथील लोकांना लुटावयाचें! तेथील संपत्ति आपल्या घरीं न्याव-याची! आणि तेथील लोकांना उपासमारीच्या विस्तवावर भाजून यमाच्या घरीं पाठवावयाचें! राज्य घेऊन त्याचा उपयोग काय करावयाचा हें माहीत नसल्यामुळेंच अर्जुनाच्या तोंडून असे उद्गार निघाले. नारळाच्या आंतील खोबरें पोखरून पोखरून खावयाचें आणि ज्याचा नारळ असेल त्याच्या हातांत प्रामाणिकपणानें त्याच्या करवंट्या द्यावयाच्या, हा नारळाचा उपयोग ज्या मनुष्याला ठाऊक नाहीं तो स्वाभाविकपणेंच असें म्हणणार कीं, देवा, हा नारळ घेऊन मी काय करूं? तशी बहुतकरून अर्जुनाच्या मनाची स्थिति झालेली असावी.

वेडाच्या भरामध्यें अर्जुन जीं कित्येक धर्माचीं तत्त्वें बरळला आहे, तीं फार विलक्षण आहेत. कोणताही समंजस मनुष्य इतका धर्मवेडा होणार नाहीं. आणि ज्याला राज्य मिळवावयाचें आहे तो लबाड मनुष्य तर धर्माची इतकी पर्वा कधींच ठेवणार नाहीं. लबाड मनुष्यास जुनें धर्मशास्त्र जर सोईचें वाटत नसलें, तर तो आपल्याकरितां नवें धर्मशास्त्र बनवील. कारण, पहिलें धर्मशास्त्र-सुद्धां कोणीतरी असेच कांहीं तरी हेतु मनांत धरून बनविलेलें असलें पाहिजे कीं नाहीं? मग लबाड बलाढ्यांच्या मनांतून जर दुसऱ्यांना मारून त्यांची

संपत्ति लुटावयाची असेल तर त्याकरतां त्यांनीं आपलें धर्मशास्त्र कां बनवूं नये? “एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोपि मधुसूदन। अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥” हें अर्जुनाच्या वेळचें नेभळटपणाचें धर्मशास्त्र कांहीं एक कामाचें नाहीं. भगवंतांनीं अर्जुनाच्या असल्या विचारसरणीला क्लैब्य हें अगदीं यथार्थ नांव दिलें आहे. जर कोणीं कोणाला मारावयाचेंच नाहीं व दुसऱ्यापासून कोणीं कांहीं लुबाडून घ्यावयाचेंच नाहीं असें ठरलें, तर मग या जगांत लोक श्रीमंत होणार कसे, आणि श्रीमंतांचे राजे होणार कसे? कोणी राजे झाले नाहींत, तर मग अनाथ प्रजेपासून कर कोण घेईल? त्यांना पावलोपावलीं फायद्यावांचूनही प्रतिबंध कोण करील? आणि त्यांना अपराधावांचून तुरुंगांत कोण घालील? सर्व पृथ्वीवर हाहाःकार उडून जाईल! दुसऱ्याला मारण्याची आणि त्याला लुबाडण्याची जर बंदी झाली, तर राजा होण्याचीच बंदी झाली असें म्हणावयाचें! मग राज्याभिषेकाचे मंत्र, राजधर्म, राजांनीं करावयाची यज्ञादिक कर्में, या गोष्टी धर्मशास्त्रानें सांगितल्या असत्या कशाला? पण त्या तर सांगितल्या आहेत. तेव्हां यावरून लोकांस मारणें, लुटणें, वगैरे जे राज्य मिळविण्याचे राजमान्य उपाय आहेत ते धर्मशास्त्राला पसंत आहेत, असें सिद्ध होत नाहीं काय? अशीं अनुमानें हल्लींचे धर्मशास्त्रकार काढतात. परंतु यावरून हल्लींच्या धर्मशास्त्रांना अनवस्था दोष माहीत नाहीं, असें मात्र कोणाला म्हणता यावयाचें नाहीं. अर्वाचीन उपयुक्त धर्मशास्त्रांत खून हा गुन्हाच नाहीं असें नाहीं. पण तो केव्हां होतो याबद्दल मात्र फार सूक्ष्म विचार केला पाहिजे. फक्त एकच मनुष्य मारला, तर तो खून होतो! राजरोसपणा न पत्करतां किंवा जाहीरनामे छापून ती गोष्ट प्रसिद्ध न करतां एखाद्याला चोरून मारलें तर तो खून होतो. अतिशय सुधारलेल्या साधनांचा आणि हत्यारांचा उपयोग न करतां कोयती, पहार, कुऱ्हाड, सोटे, दगड वगैरे रानटी उपायांनीं जर एखाद्याचा प्राण घेतला गेला, तर तो खून होतो! खून ओळखण्याचे असे हे बारीकसारीक भेद आहेत. थोड्या पैशांसाठीं किंवा एखाद्या लहानशा इस्टेटीसाठीं एखाद्याला मारलें, तर तोही खून होतो! हीं ठिकाणें वर्ज्य करून बाकीच्या ठिकाणीं अलीकडच्या उपयुक्त धर्मशास्त्रानें खुनाची पूर्ण संमति दिली असल्याचें हल्लींच्या प्रतिष्ठित लोकांच्या

कृतीवरून दिसत आहे. 'त्रैलोक्याचें राज्य मिळविण्यासाठींदेखील मी कोणाचा वध करावयाचा नाहीं, मग यःकश्चित् पृथ्वीसाठीं मी मनुष्यवध करूं?' असें बोलून अर्जुनानें या अतिशय सन्माननीय अशा पृथ्वीचा अपमान केला आहे. ही बहुमान्य पृथ्वी इतकी तुच्छ आहे काय? आणि हिच्यापेक्षां त्या कवडीमोल आणि केवळ राजांच्या खेळण्यासाठीं निर्माण केलेल्या भिकारड्या माणसांची किंमत अधिक आहे काय? यःकश्चित् पृथ्वीसाठीं मी मनुष्यवध करूं? असें अर्जुन विचारतो. अरे, या पृथ्वीच्या एक वीतभर तुकड्यासाठींदेखील लाखों माणसांचे खून झाले तरी केले पाहिजेत; मग सबंध पृथ्वीची गोष्ट कशाला विचारतोस? हल्लींचे जे लोक आपापलीं साम्राज्यें वाढवूं इच्छीत आहेत, त्यांना जर कोणी त्रैलोक्याचें राज्य देऊं लागेल, तर त्रैलोक्यांत स्वतःखेरीज जितकीं माणसें आहेत तितक्यांचेही पाहिजे असल्यास ते खून करण्याला तयार होतील. मग अर्जुनालाच कांहीं पांचपन्नास लाख माणसांचे खून करण्याला एवढी दहशत काय म्हणून वाटत होती? "भुंजीय भोगान् रुधिरप्रदिग्धान्" या वचनावरून रुधिरप्रदिग्ध भोग आपण कसे भोगावे, अशी अर्जुनाला शंका वाटत असावी असें मात्र एक दिसतें.

पण हा केवढा खुळचटपणा आहे? रक्ताचे डाग कायम राहतात काय? रक्ताचे डाग पाण्यानें, फार झालें तर साबण लावून धुतले म्हणजे जातात, एवढी साधी रसायनशास्त्रांतील गोष्ट अर्जुनाला माहीत नसावी हें अतिशय लज्जास्पद आहे. खून केलेल्या मनुष्याचें रक्त सांडणार कुरुक्षेत्रांतील जमिनी-वर, आणि अर्जुन नाना प्रकारच्या चैनीच्या भोगांचा उपभोग घेणार हस्तिना-पुरांतील सिंहासनावर! आणि कुरुक्षेत्रांतून हस्तिनापुराला चालत येण्याला माणसासारखे माणसाच्या रक्ताला कांहीं पाय नाहींत! मग अर्जुनाचे भोग रुधिरप्रदिग्ध कसे झाले असते! रक्तामध्यें अशी चालण्याची शक्ति असती तर राजांना लबाडीनें मिळविलेल्या आपल्या स्वतःच्या राज्यांचा कधीं उप-भोगच घेतां आला नसता. पण असें कोठें झालें आहे? शेंकडों लबाड राजांनीं कोट्यवधि अनाथ लोकांचे आतांपर्यंत खून केले आहेत. पण म्हणून त्यांचे भोग कधीं रुधिरप्रदिग्ध झाले आहेत? त्यांनीं मेजवानीकरतां एखादें पांढरेंशुभ्र पक्वान्न तयार केलें, तर त्यांनीं मारलेल्या माणसांच्या रक्तानें तें सगळें लालभडक होऊन गेलें, असें कधीं झालें आहे काय? किंवा परस्त्रियांचा

जेथें बलात्कारानें संभोग करावयाचा, अशा त्यांच्या शय्येवर जर पांढरेंशुभ्र वस्त्र पसरलेलें असलें तर तें वस्त्र त्यांनीं मारलेल्या लोकांच्या रक्तानें भिजून ओलें होऊन गेलें, असें तरी कधीं झालें आहे काय ? हॅम्लेट आणि मॅक्बेथ या नाटकांच्या संविधानकांतील मूळच्या गोष्टी जेव्हां घडून आल्या त्या वेळीं राज्यलोभानें मारलीं गेलेलीं माणसें भुतें होऊन आपले खून करणाऱ्यांना भेवडावण्याकरतां येत असत. पण त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं असें पाहून कंटाळून मारल्या गेलेल्या लोकांनीं तीही पद्धत टाकून दिलेली आहे. म्हणून आतां तीही भीति नको. सारांश, हा सगळा मनाचा वेडेपणा आहे. वास्तविक, मारलेल्या माणसांचें रक्त चालत नाहीं, किंवा उपभोगाचे विषय त्यांच्या रक्ताच्या डागांनीं बिघडून जाऊं शकत नाहींत, किंवा मारलेलीं माणसें भुतें होऊन फिरून या जगांत येत नाहींत. असें जर असतें तर अर्जुनाच्या पाठीमागून येणाऱ्या लबाड बलाढ्यांना या जगांत जिवंत राहण्याचीही सोय नव्हती. कारण अर्जुनानें पाहिलीं नसतील इतकीं माणसें या राजांनीं नुसतीं मारलीं आहेत. तेव्हां जर या मारलेल्या माणसांच्या रक्तांत आपला सूड उगविण्याचें सामर्थ्य असतें, तर या राजांच्या राज्यावर बारा महिने एकसारखा रक्ताचा पाऊस पडून राहिला असता. पांढरा रंग त्यांच्या राज्यांत पाहावयालाही मिळाला नसता, चित्रकला त्यांच्या राज्यांत लोप पावली असती, आणि त्यांच्या राज्यांतील कोरड्या अन्नाला लागणाऱ्या कालवणाची गरजच उरली नसती! तसेंच त्यांनीं मारलेल्या असंख्य लोकांनीं जर भुतें होऊन त्यांच्या मानेस बसण्याचें मनांत आणलें असतें, तर एकेकाच्या मानेभोंवतीं इतकीं भुतें जमलीं असतीं कीं, तीं सूक्ष्म देहानें आलीं असतांही त्यांना त्यांच्या मानेवर बसण्याला सगळ्यांना जागा न मिळाल्यामुळें त्रासून तीं माघारीं गेलीं असतीं! असे भोग जर रुधिरप्रदिग्ध होऊं लागले असते, तर अर्जुनाच्या पाठीमागून आलेल्या राजांना या जगांत राहवलें नसतें. पण असें कोठें आहे? मागचें राहूं द्या; पण अलीकडचीच गोष्ट घेतली तरी असें कोठें दिसून येत आहे? हल्लीं कांहीं कमी लोक मारले गेले आहेत असें नाहीं. अर्जुनालाच मोठी घमेंड नको. अगदीं अलीकडच्या दिवसांतसुद्धां किती तरी लोक मारले गेलेले आहेत! नीग्रो, क्यूबन, फिलिपिनो, दरवेशी, हिरोरो, सोमाली, काफीर, बोअर, आफ्रिडी, तिबेटी, ब्रह्मी, चिनी, जपानी, रशियन, ज्यू, आर्मेनिअन

वगैरे किती तरी लोक या यादींत येतात ! सुधारणादेवीच्या प्रसाराच्या चरणतळीं बळी म्हणून पशूंप्रमाणें कापून काढलेल्या या असंख्य मुंडक्यांची गणना कोण करूं शकणार आहे ? पण इतके लोक ही मर्त्यभूमि सोडून स्वर्गलोकांतील नंदनवनामध्यें राहण्याकरितां गेले म्हणून पाठीमागें त्यांच्या रक्तानें कोणाच्या कपड्यांना डाग पडले आहेत ? जगातील प्रत्येक मनुष्याचा हात पाहावा तो बर्फासारखा पांढराशुभ्र दिसत आहे ! राजांकडे पाहावें, तर त्यांचे पोषाख धुऊन काढण्याला आपल्याला अतिशय त्रास पडतो अशी कोणत्याही राजाच्या परटाची तक्रार नाहीं ! सगळ्या राजांना रात्रीच्या स्वस्थ झोंपा लागतात ! लेडी मॅक्बेथप्रमाणें आपण केलेल्या खुनांची आठवण होऊन कोणी राजे किंवा त्यांच्या राण्या आपल्या अंथरुणांतून उठतात आणि दिवसां केलेलीं पापकर्मे रात्रीच्या झोंपेंत बडबडतात, असा कोणत्याही राजवैद्याकडून बोभाटा बाहेर आलेला नाहीं ! सर्व राजे खुशाल खातात, पितात, घोड्यावर बसतात, गाड्यांतून फिरतात, नाच नाचतात, मेजवान्या रगडतात, आणि फिरून लोकांना नीतीचा आणि न्यायाचा उपदेश करतात ! अशी अव्याहत चैन प्रत्यक्ष चालली असतां अर्जुनाला भोगांच्या रुधिरप्रदिग्धत्वाची एवढी भीति वाटावी हें मोठें आश्चर्य आहे !

" यांना मारलें तर पाप लागेल ( पापमेवाश्रयेदस्मान् ) ", " राज्यलोभासाठीं आम्ही मोठें पाप करण्याला प्रयुक्त झालों आहों ( अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् )", " या पातकासाठीं आपल्याला नरकांत राहावें लागेल ( नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम। )" इत्यादि श्लोकांतून उक्त आणि अनुक्त अशीं जीं भयें अर्जुनाला वाटत होतीं तींही अगदीं निराधार आहेत. जगांत पाप म्हणून कांहीं पदार्थ आहे आणि तें केलें म्हणजे स्वर्गांत देव म्हणून दुसरा कोणी एक पदार्थ आहे तो आपल्याला शासन करतो, अनेक साधनांनीं आपला नाश करतो, आणि आपल्याला नरकांत टाकतो, या कल्पना अगदीं पोरकटपणाच्या आणि वेडगळपणाच्या आहेत. पाप आणि पुण्य, देव आणि शासन, व स्वर्ग आणि नरक या वस्तु जर कौरवपांडवांच्या वेळीं खरोखर अस्तित्वांत होत्या असें मानलें, तर त्या अलीकडेच एकाएकीं कशा नाहींशा व्हाव्यात ? अलीकडेसुद्धां लाखों लोकांचे प्रतिवर्षी खून चालले आहेत, याबद्दलचीं ठळक

ठळक उदाहरणें वर दिलेलींच आहेत. आतां यांत जर पाप असतें आणि आकाशांत जर देव असता, तर असंख्य माणसांचे प्राण घेणाऱ्या या लोकांना देवानें त्यांच्या पापाबद्दल कांहींच भयंकर शासन केलें नसतें काय ? पण तसें कोणाला होत आहे ? हल्लींचे खंडोगणती राजे जमिनीवर चालत असतात, पण त्यांच्या पायांखालीं धरणीकंप होत नाहींत ! ते पाण्यावर नावांतून तरंगत असतात, पण त्या नावा आपल्या प्रचंड पोटांत गट्ट करून टाकण्याविषयीं देव समुद्राला कधींही चुणकावीत नाहीं ! ते पर्वतांच्या शिखरांवर जाऊन राहतात, पण ते पर्वत शासन करणाऱ्या परमेश्वराच्या हुकमानें कधींही ज्वालामुखी पर्वत बनत नाहींत ! ते माणसांच्या रक्तानें तृप्त न होऊन फुरसतीच्या वेळीं करमणुकीसाठीं पर्वतांच्या जंगलांमधील वाघांना मारण्याकरतां जातात; पण मनुष्यवध आणि व्याघ्रवध हीं जर पातकें असतीं आणि तीं देवाला दुःसह झालीं असतीं, तर तीं पातकें करणारांचें पारिपत्य करण्याला देवाला काय अडचण होती ? जो वाघ मरणारा तोच मारणारा करण्याला देवाला कांहीं अवकाश असतो काय ? पण नाहीं. असें नाहीं. असा कांहीं एक अपघात न होतां फक्त वाघच मरतात, यावरून पातक आणि देव हेच नसले पाहिजेत, असें सिद्ध होतें. हत्तीचें गंडस्थळ आणि हत्तीचें पदतळ यांच्यामध्यें तीनचार हातांपेक्षां काय जास्त अंतर असतें ? लाखों लोकांच्या खुनानें धुंद झालेला आणि रक्तानें लाल झालेला प्राणी मारलेल्या माणसांच्या पांठीच्या तक्त्यांचे जिने करून त्यावरून हत्तीच्या गंडस्थळावर चढून मोठ्या डौलानें बसतो. आतां यांत जर देवाला– आंधळ्या देवाला– कांहीं गुन्हा दिसता, तर हत्तीच्या गंडस्थळापासून हत्तीचा पाय दूर असतो काय ? पण तसें होत नाहीं. यावरूनसुद्धां देवाच्या अस्तित्वाला मोठा धक्का बसतो. अशा स्थितींत देव आहे असें म्हणण्याचें धाडस कोण समंजस मनुष्य करूं शकेल ? नास्तिकांनीं देव नाहीं म्हणून ठरविलें आहे, हा त्यांच्यावर वृथा आक्षेप आहे. नास्तिकांच्या वितंडवादापेक्षां देवानें आपल्या स्वतःच्या कृतीनेंच आपल्यावरील लोकांची श्रद्धा जास्त उडवून घेतली आहे. तसेंच नरक तरी कोठें आहे ? मागील युगांतील मनुष्याचें मन रानटी अवस्थेमध्यें होतें त्या वेळीं त्यानें स्वर्ग वर असतो आणि नरक खालीं असतो, अशी आपली कल्पना करून घेतली आहे. पण वर कांहीं नाहीं आणि खालींही कांहीं नाहीं ! अर्जुनाच्या

वेळीं लोकांना पृथ्वीचा फारच थोडा भाग माहीत होता, व पृथ्वीच्या पोटांत काय आहे, याबद्दल तर बिलकूलच कल्पना नव्हती. तेव्हां नरक खालीं आहे ही कल्पना खून करणाऱ्या राजांना दबकावण्याला बरी होती. पण आतां आपल्याखालीं म्हणजे अमेरिका घेतली, तर अमेरिकेंत काय आहे, हें हल्लींच्या राजांना माहीत झालेलें आहे. तेथें अमेरिकेंतील स्वतंत्र संस्थानें आहेत, हें त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें आहे, व तेथें नरक नाहीं अशी त्यांची पक्की खात्री झालेली आहे. आतां खालीं म्हणजे या पृथ्वीच्या पोटांत नरक आहे अशी कोणाला शंका असेल, तर भूगर्भशास्त्रवेत्त्यांनीं त्याही शंकेला जागा ठेविली नाहीं. एकंदर पृथ्वीच्या मध्यभागापर्यंत काय काय भरलेलें आहे ह्या सगळ्याबद्दलची इत्थंभूत माहिती अर्वाचीन राजांपाशीं आहे. तेव्हां जर देव, पाप, नरक वगैरे वस्तु वास्तविक अस्तित्वांतच नाहींत, तर मग त्यांच्याबद्दल भीति कोण बाळगणार आहे?

सारांश, भोग जर खरोखरच रुधिरप्रदिग्घ होत असते, मारलेल्या माणसांमध्यें भुतें होऊन सूड उगविण्याचें जर खरोखर सामर्थ्य असतें, पाप आणि देव ह्या जर खरोखरच अस्तित्वांत असणाऱ्या वस्तु असून, पापाबद्दल देव शासन करता, धरणीकंप, खवळलेला समुद्र, ज्वालामुखी पर्वताचा स्फोट, चवताळलेल्या वाघाची उडी, आणि मदोन्मत्त झालेल्या हत्तीचा पाय, हीं जर पातकाच्या पारिपत्याचीं प्रचीतिदायक साधनें असतीं, आणि प्रवाशांना अमेरिकेंत व भूगर्भशास्त्रवेत्त्यांना पृथ्वीच्या पोटांत जर कोठें खरोखरच नरक आढळला असता, तर आजकाल जे योद्धे जास्त खुनाबद्दल जास्त छाती वर काढून चालत आहेत, त्यांचीही दुसऱ्यांचे निष्कारण खून करण्यापूर्वी अर्जुनाप्रमाणें स्थिति झाली असती, पातकाच्या भीतीमुळें त्यांचींही गात्रें खिन्न झालीं असतीं, मुख परिम्लान झालें असतें, शरीराला कंप सुटला असता, सर्व अंगावर रोमांच उभे राहिले असते, हातांतून शस्त्रें गळालीं असतीं, मन भ्रमण पावूं लागलें असतें, अपशकुन दिसूं लागले असते, आणि हातांतून आयुधें टाकून डोळ्यांतून पाणी काढीत ते स्तब्ध बसले असते. पण अशी स्थिति कोणाची तरी होत आहे काय? नाहीं. प्रत्येकाला लढाईच्या वेळचे खून करावयाला जातांना आपण अतिशय पवित्र काम करावयाला जात आहों असें वाटतें! देवाची भीति बिलकुल उरलेली नाहीं. मनुष्य

मनुष्यांना वाघाप्रमाणें खाऊं लागले आहेत, तरीही देव असून नसून सारखा झाल्याप्रमाणें झाला आहे. गांजलेल्या मनुष्यांनाही आपलें आपण संरक्षण करून घेण्यावांचून देवाच्या मदतीचा वगैरे दुसरा कांहीं मार्ग उरला नाहीं. या सगळ्या अर्वाचीन स्थितीवरून काय सिद्ध होतें ? पाप, पुण्य, स्वर्ग, नरक, देव, धर्म वगैरे जुन्या गोष्टी नव्या राजांनीं अगदीं थोतांडें ठरवून टाकलीं आहेत. चार्वाकांनीं नास्तिकपणाचा प्रसार केला असें म्हणतात. परंतु असंख्य लोकांचे खून करूनही सर्व सृष्टिनियमांविरुद्ध प्रतिदिवशीं जास्त जास्त भरभराटीस चढणाऱ्या अलीकडच्या लोकांनीं नास्तिकपणाला जास्त उत्तेजन दिलें आहे. साम्राज्य हा देव, कोणताही न्याय किंवा अन्याय करून त्या साम्राज्याचा प्रसार करणें हें पुण्य, आणि इतरांनीं स्वदेशभक्तीनें प्रेरित होऊन अतिशय प्रिय अशा स्वदेशाच्या संरक्षणासाठीं त्या प्रसाराच्या आड येणें हें पाप, अशी आजकालची स्थिति आहे. हीं तत्त्वें लक्षांत बाळगून अर्जुन वागला नाहीं, व भलभलत्याच शंका काढीत बसला, हें अगदीं गैरशिस्त होय. जेथें दुसऱ्यांना मारून बेलाशक त्यांचें राज्य घ्यावयाचें, तेथें ' न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ' अशा शंका काढीत अर्जुनानें बसावें, यावरून त्या वेळचे लोक धार्मिक कल्पनांच्या बाबतींत मागासलेले होते असें म्हणावें लागतें. अर्जुनाचा हा रानटीपणा पाहून कोणालाही हसूं आल्यावांचून राहणार नाहीं. तेव्हांपासून जर ही देवाधर्माची कल्पना गुंडाळून ठेवण्यांत आली असती, तर आजला मनुष्यप्राण्यांची प्रगति फारच वाढली असती ! पण दुर्दैव जगाचें ! परंतु असो. वेडेपणामुळें जीं तत्त्वें त्या वेळच्या अर्जुनाला समजलीं नाहींत तीं हल्लींच्या अर्जुनांना समजून ते त्याप्रमाणें जगाची वाट लावीत आहेत, ही कांहीं थोड्या समाधानाची गोष्ट आहे असें नाहीं. देव असल्यास तो या स्वमूलोच्छेदनाच्या सत्कृत्याला हातभार लावो !

---

# एक चमत्कारिक खेडेगांव : : : ४

काळ : अग्रलेख, ता. २५–५–१९०६

इंग्लिशांच्या अमलाखालील हिंदुस्थान देशामध्यें कोठें काय चमत्कार असतील याची कोणाला कल्पनाही करतां यावयाची नाहीं. हिंदुस्थानांत जुन्या चमत्कारिक चालीरीती थोड्याथोडक्या आहेत असें नाहीं. परंतु इंग्रजी अमलाखालीं त्यांहूनही जास्त चमत्कारिक अशा कित्येक नवीन चालीरीती पडलेल्या आहेत. सती जाणें, केशवपन करणें, बालहत्या करणें, मुंज करणें, शेंडी ठेवणें, लग्नकार्यांतून अतिशय खर्च करणें, इत्यादि जशा जुन्या वेडगळ चाली आहेत, तशी मरणाबद्दल महोत्सव करण्याचीही एक नवीन चमत्कारिक चाल कित्येक खेडेगांवांतील रानटी लोकांमध्यें अलीकडे पडली आहे. कल्पनांमध्यें किती फरक पडतो हें पाहण्याची एक मजा आहे. जन्म हा आनंददायक आणि मरण हें खेदजनक अशी जगाच्या प्रारंभापासून एक समजूत चालत आलेली आहे. परंतु आपल्यांतील अतिशय उत्तम अशा वेदान्तशास्त्राच्या वाढीला ही समजूत अपायकारक आहे. लोकांमध्यें मरणाची अतिशय भीति आणि प्रजोत्पत्तीकडे वासनेची अतिशय ओढ असणें या गोष्टी निर्वेदमूलक वेदांताला फारशा अनुकूल नाहींत. वेदांतांतील मुख्य तत्त्व हें कीं, या जगांतील सर्व स्पृहणीय वस्तूंबद्दल निर्वेद आणि तिटकारा उत्पन्न झाला पाहिजे. परंतु लोकांपाशीं पैसा जमा होतो, पैशापासून चैन सुचते, चैनीसाठीं विषयवासना जागृत होतात, विषयोपभोगापासून आसक्ति निर्माण होते, आणि आसक्तता हा निर्वेदाचा शत्रु होय. त्यामुळें पैशापासून वेदांताचा सर्व पाया ढासळतो. ही वस्तुस्थिति लक्षांत आणून शंकराचार्यांच्या वेळेपासून सर्व वेदांत्यांचें

त्यांच्या त्यांच्या वेळच्या राजांपाशीं असें मागणें होतें कीं, तुम्ही जर खरे धर्मशील असाल, वेदांतशास्त्राचा जर तुम्हांला खरा अभिमान असेल, साधन-चतुष्टयांतील इहामुत्रफलभोगविराग या साधनाच्या सामर्थ्यावर जर तुमचा विश्वास नसेल, आणि हिंदुधर्मांतील हा अतिशय उत्तम असा वेदांताचा पंथ सर्व जगामध्यें सप्रयोग आणि सोदाहरण श्रेष्ठ ठरावा असें जर तुमच्या मनांत असेल, तर तुम्ही लोकांपाशीं पैसा कमी राहील अशी कांहीं तरी तजवीज करा! खरेंखोटें प्राचीन लेख शोधणारांना माहीत ; परंतु असें सांगतात कीं, वेदांताच्या प्रगतीसाठीं आपल्या राज्यांतील लोकांना आपण भिकारी करून दिलें तर आपले धर्मावर फार उपकार होतील, अशा आशयाचे खुद्द आद्य शंकराचार्यांच्या हातचे अर्ज निरनिराळया राजांकडे गेलेले असून, या महत्त्वाच्या दस्तऐवजाची एक अस्सल हस्तलिखित प्रत करवीरच्या मठामध्यें पुष्कळ वर्षें-पर्यंत जपून ठेवण्यांत आलेली होती; पण पटवर्धन घराण्यांतील एका पुरुषानें त्या मठावर हल्ला करून तो लुटला व जाळला त्या वेळीं सुमारें दीडशें वर्षां-पूर्वीं तो कागद जळून गेला! असेंसुद्धां म्हणतात कीं, शंकराचार्यांनीं आधीं "सर्व लोकांच्या जवळील पैसा नाहींसा करून द्या" अशीं सर्व राजांना विनंतिपत्रें लिहिलीं आणि नंतर मग त्यांनीं भाष्य लिहिण्याला सुरवात केली! तेव्हांपासून "लोकांजवळ पैसा उरूं देऊं नका, त्यांना उपाशी मरावयाला लागूं द्या," अशी सर्व वेदांत्यांनीं आपापल्या राजांजवळ सारखी टकळी चालविली होती. त्या वेदांत्यांपैकीं कित्येक श्रेष्ठ लोक राजगुरु म्हणून स्थानापन्नही झालेले होते. ते आपल्या शिष्यांना अतिशय गळ घालीत असत, व तुम्ही आपल्या अमलांतील सर्व लोकांना निर्धन करून सोडाल तर आम्ही तुम्हांला गुरूपदेश देऊं असेंही निक्षून सांगत असत. तरी पण एकाही नेटिव राजाच्या हातून ही वेदांत्यांची मागणी पुरी करण्यांत आली नाहीं. हिंदुस्थानचें हित करणारे स्वदेशी राजे म्हणून अनेकजण नांवाजले गेले, पण वेदांतशास्त्रांत हिंदुस्थान सर्वांच्यापुढें आहे असें दाखवून देण्याची अपूर्व संधि या मूर्खांनीं दवडली, आणि त्या योगानें त्यांनीं हिंदुस्थानचें अतिशय नुकसान केलें! त्यांना लोकांना निर्धन करतां येईना! मग अशा दुधखुळयांनीं राज्यसूत्रें हातांत घ्यावीं तरी कशाला ? प्रजेला निर्धन करून व तिच्या मनांत विरक्तीची आवड उत्पन्न करून तिला मोक्षाकडे लावण्याचें अंगांत सामर्थ्य नसून उलट

लोकांपाशीं पैसे शिल्लक पडूं देऊन त्याच्या जोरावर त्यांना विषयोपभोग घ्यावयाला लावून 'पुनरपि जननं पुनरपि मरणम्' अशा प्रकारच्या भव-चक्राच्या फेऱ्यामध्यें जे राजे आपल्या प्रजेला घालतात, त्यांना काय म्हणावें हें समजणें कठीण आहे! प्रजेला भिकारी करण्याची ही वेदांती लोकांची कल्पना कित्येक स्वदेशी राजांना बिलकुल पसंत पडेना. आणि म्हणून त्यांच्या कारकीर्दींत बहुतेक लोक कोट्याधीश आणि लक्षाधीश होऊन राहत असत. परंतु दुसऱ्या कित्येक स्वदेशी राजांना वेदांताची हौस असे, आणि त्यामुळें ते आपल्या प्रजेला लुटून किंवा मारून त्यांच्यापासून त्यांचा पैसा हिरावून घेत असत. परंतु या त्यांच्या सत्कृत्याला फारसें चांगलें यश येत नसे. कारण, या राजांनीं जरी लोकांपासून द्रव्य लुटून नेलें, तरी तें द्रव्य सांठवून ठेवण्याचें त्या राजांचें भांडें जवळच असल्यामुळे त्या भांड्यांतील पाणी पाझरून फिरून तें लोकांपाशींच येत असे. आणि फिरून लोक जसेच्या तसे विषयासक्त होत. यामुळें वेदांत्यांची बहुतेक निराशा झाल्यासारखीच झाली होती. परंतु इतक्यांत इंग्लिश अधिकाऱ्यांची आणि त्यांची गांठ पडली. आणि तेव्हांपासून वेदांतशास्त्रानें फिरून उलट खाल्ली आहे. इंग्लिश लोक आपल्या वेदांत-शास्त्राचा अभ्यास करूं लागले आहेत व त्यांनीं आपले वेदांताचे संस्कृत ग्रंथ वाचून त्यांचीं इंग्रजीमध्यें भाषांतरें केलीं आहेत. इतकेंच नव्हे, तर या शाब्दिक उत्तेजनापलीकडे जाऊन त्यांनीं हिंदुस्थानांत वेदांताच्या प्रचाराला अपरोक्षसहानुभूतिही दाखविण्याला कित्येक वर्षांपासून सुरवात केली आहे! पूर्वीं नेटिव्ह राजांनीं वेदांताला मदत करण्याचें पुष्कळ मनांत आणलें, तरी हिंदुस्थानचा लुटलेला पैसा पाझरून परत लोकांपाशी न येईल अशा रीतीनें ठेवण्यासारखी त्यांच्यापाशीं कोठें दूरची एखादी जागा नसल्यामुळें त्यांचे प्रयत्न सहजच निष्फळ झाले. पण इंग्लिशांच्या बाबतींत त्यांचा दूरवरचा परकीय देश हा त्यांना आयताच फायद्यावर पडला! त्यांनीं वेदांतशास्त्राला मनापासून मदत करण्याला सुरवात केला. लोकांच्या जवळील पैसा हरण करून त्यांच्या मनांत वेदांतशास्त्रानें शिकविलेला या जगाविषयींचा निर्वेद उत्पन्न कर-ण्याच्या कामीं त्या महात्म्यांनीं यत्किंचितही कृत्रिमपणा केला नाहीं! लहानां-पासून मोठ्यांपर्यंत सर्व इंग्रजी अधिकाऱ्यांनीं हें काम हातीं घेतलें! पैशाचा लोभ फार कठीण आहे! तो पैसा हिंदुस्थानांतील लोकांच्या हातून लवकर

सुटावयाचा नाहीं, व त्यांच्या मनांत मोक्षोपयोगी निर्वेद बाणावयाचा नाहीं, याकरतां सरकारी जबर करांच्या वगैरे एकाच मार्गावर भिस्त न ठेवतां इंग्लिशांनीं पगार, पेन्शनें, व्याजें, एक्स्चेंज कॉंपेन्सेशनें, व्यापाऱ्यांचीं बिलें, वगैरे अनेक प्रकारचीं द्रव्यहरणाचीं सोंगें काढून जेणेंकरून हिंदुस्थानांतील लोक लवकर वेदान्तप्रवीण होतील अशी योजना चालविली ! हिंदुस्थानच्या लोकांना त्यांच्या धर्मांत सांगितलेलें अंतिम निर्वाणपद लवकर प्राप्त व्हावें म्हणून इंग्लिशांनीं यत्किंचितहि कसूर न करतां प्रयत्न चालविले. नेटिवांना विरक्तीचा लाभ लवकर करून देण्याच्या उत्कंठेच्या गर्दींत कधीं कधीं त्या बिचाऱ्यांना आपली न्यायबुद्धि आणि सदसद्विवेकबुद्धिसुद्धां विसरून जावी लागली आहे ! नाहीं तर इजिप्तमधल्या आणि आफ्रिकेमधल्या लढायांच्या खर्चाशीं हिंदुस्थानचा कांहीं एक संबंध नाहीं हे त्यांना कळत नव्हतें काय ? पण एकदा परोपकार करावयाचा आणि दुसऱ्यांना मोक्षाला न्यावयाचें असें म्हटल्यावर मग शेंडी तुटो कीं पारंबी तुटो " प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति । " हिंदुस्थानला भिकारी करून इंग्लिशांनीं आपल्याला श्रीमंत करून घेतलें आहे, असा त्या परोपकारी महानुभावांवर कोणी कुत्सित लोक आक्षेप आणितात. परंतु आपण स्वतः चौऱ्यायशीं लक्ष योनींत घिरट्या घालीत बसण्याची कष्टदायक स्थिति पत्करूनही जे दुसऱ्यांना मोक्षाला पोंहचवीत आहेत ते जर दोषाला पात्र असतील, तर मग या जगांत परोपकारी तरी कोण, असा प्रश्न विचारणें प्राप्त होईल ! अशा निंदकांच्या तोंडा न लागतां हिंदुस्थानांतील लोकांच्या मनांत आपल्या जीविताबद्दलसुद्धां वैराग्य उत्पन्न करण्याचा, इंग्लिशांनीं दुष्काळ आपल्या मदतीला घेऊन सपाटा चालविला. खुद्द परमेश्वराचें निःश्वसित असे जे वेद त्या वेदांच्या शेवटीं आर्यांच्या उपनिषद्भागांत जीं वेदांताचीं उच्चतम तत्त्वें सांगितलीं आहेत, त्यांची आर्य लोकांना अपरोक्षानुभूति आणून देण्याचें काम खिस्ती धर्मातलि राजांच्या हातून व्हावयाचें होतें, आणि तें आपल्या खुद्द हिंदुधर्माचे इतके राजे होऊन गेले असतांही त्यांच्या हातून न होतां या खिस्ती राजांच्या हातून परिपूर्णतेस येत चाललें आहे, हें परमेश्वराच्या घरचें एक कौतुकच आहे ! परंतु ईश्वरी इच्छेनें आतां वेदान्तशास्त्र लुप्त होण्याची भीति उरली नाहीं ! लोकांमध्यें निर्वेद अतिशय बाणला आहे. मोठमोठया साधु-लोकांनाही ज्या गोष्टी अशक्य त्या हिंदुस्थानांतील लोक आज सहज करूं

शकत आहेत. जीविताची आशा सुटणें फार दुर्घट आहे; तरी पण परिस्थिती-प्रमाणें लोकांचीं मनें बदलतात. इंग्लिशांच्या वेदान्तप्रसाराच्या तडाक्यामध्यें अशा रीतीनें सांपडल्यामुळें एका अगदीं दूरच्या खेडेगांवांत फार विलक्षण स्थित्यंतर होऊन गेलेलें होतें. एके वेळीं त्या गांवावर लागोपाठ दहा वर्षांत कधींही पाऊस पडला नाहीं. त्यामुळे तेथें अन्न तर पिकलें नाहींच, पण लोकांना पाणीही प्यावयाला मिळेनासें झालें. परंतु निर्वेद आणि वैराग्य ह्यांची वाढ हिंदुस्थानांतील प्रत्येक खेडयापाडयांतूनसुद्धां अवश्य झाली पाहिजे, या केवळ एका उदात्त हेतूसाठीं डोळयांवर कातडें ओढून, मन दगडासारखें करून, आणि भूतदयेला क्षणभर रजा देऊन इंग्लिशांच्या अधिकाऱ्यांनीं तेथील लोकांपासून कराची बिनसूट बिनतक्रार उगवणी करून त्यांच्यापाशीं कांहीं एक ठेविलें नाहीं! अशीं वैराग्याचीं कारणें उत्पन्न झाल्यापासून तेथील लोक योगाभ्यास शिकले, व वाऱ्यावर उपजीविका करूं लागले! तरी पण त्यांनीं राजनिष्ठा सोडली नाहीं. त्यांनीं आपल्या मांडीवर खेळतां खेळतां भुकेनें पट्कन् प्राण सोडणाऱ्या मुलाबाळांचें प्रेम वेदांतांतील तत्त्वाच्या दृढ अभ्यासानें सोडलें, पण त्यांनीं कधींही न पाहिलेल्या अशा पांच हजार कोसांवरील व्हिक्टोरिया महाराणीसाहेबांवरील आपलें प्रेम अबाधित ठेविलें होतें! त्यांनीं आपल्या स्वतःच्या पोटाला खाण्याचें सोडलें होतें, पण परदेशांतील निरर्थक लढाया लढण्याचें सामर्थ्य इंग्लिशांना येण्यासाठीं त्यांना कर देणें अतिशय जरूरीचें आहे असें त्यांना वाटत होतें! अशा त्यांच्या चमत्कारिक राजनिष्ठ वैराग्यामुळें त्यांच्यामध्यें दुसऱ्याही कित्येक विलक्षण कल्पना प्ररूढ झालेल्या होत्या. इंग्रजी राज्यांत लोकांना खावयाला मिळेनासें झालेलें असल्यामुळें नवीन मुलें उत्पन्न करून आपल्या दयाळु सरकारला अडचणीमध्यें घालणें हें राजद्रोहाचें कृत्य असल्याकारणानें आपल्या गांवांतील लोकांनीं कोणींही नवीन लग्नें करूं नयेत व ज्यांनीं पूर्वीं केलीं असतील त्यांनीं प्रजोत्पत्ति करूं नये असा तेथील गांवच्या पंचायतींत ठराव करण्यांत आला होता. गृहसुतदारा हा सर्व व्यर्थ पसारा आहे हें वेदांताचे तत्त्व या लोकाच्या मनावर ठसलेलें असल्यामुळेंच त्यांना हा ठराव करतां आला. एरवीं स्वतःवर इतकीं संकटें ओढून घेऊन सर्वांभूतीं समप्रीति या न्यायानें इंग्लिशांबद्दल इतकी राजनिष्ठा, कळकळ दुसऱ्या कोणालाही दाखवितां आली नसती. अशाच विचारसरणीनें

त्यांचा असाही एक ग्रह झालेला होता कीं, वेदांताच्या आणि राजनिष्ठेच्या अशा दोन्हीही शास्त्रांच्या दृष्टीनें जगण्यापेक्षां मरणें हेंच जास्त चांगलें होय. फार प्रजा जिवंत राहिली व राज्यामध्यें जिवंत राहणारेच सगळे लोक झाले, तर इतक्यांच्या पोटाला देण्याची सरकारवरील जबाबदारी जास्त वाढते; व इंग्लंडांत पैसा न्यावयाचा असल्याकारणानें इतक्यांच्या पोटाची तजवीज करावयाला सरकारला अवघड जातें; याकरितां जे कोणी लोक मरण पावून सरकारवरील ओझें हलकें करतील ते सरकारवर मोठी मेहेरबानी करतात व त्यांच्यासारखे राजनिष्ठ दुसरे कोणी नाहींत अशी त्या लोकांची कल्पना झालेली होती. विलायतेस द्रव्य गेल्यामुळें दुष्काळ पडले असतां सरकार रिलीफ कामें काढतें आणि अनाथगृहें स्थापन करते हें खरें आहे; तरी पण तेथें किती लोकांनीं जावें हा लोकांनींच आपल्याशीं विचार केला पाहिजे. मऊ लागलें म्हणून कोपरांनीं खणतां कामा नये. सरकार देतें म्हणून सर्व जिवंत माणसांनीं तेथें जाऊन गर्दी करतां कामा नये. सरकारची अब्रू राखिली पाहिजे. सगळींच माणसें जिवंत राहूं लागलीं तर पृथ्वी तरी अन्न कितीकांना पुरवील? यासाठीं ज्यांच्या मनांत कांहीं राजनिष्ठेचा अंश असेल त्यांनीं आपल्या सरकारच्या अब्रूचें संरक्षण करण्याकरितां स्वतः मरणें अवश्य आहे, असें त्यांचें ठाम मत बनलें होतें. शिवाय त्यांनीं असें पाहिले की, गरीब लोकांनीं मेल्यापासून सरकारचा फायदा आहे. कोणत्याहि राजाच्या राज्यांत गरीब लोकांची संख्या जास्त असणें हें त्या राजाच्या राजनीतीला काळिमा लावणारें आहे. याकरतां जर आपण खरे राजनिष्ठ आहों, तर आपण मरून आपल्या सरकारच्या राज्यांतील गरीब लोकांची संख्या कमी करणें हें प्रत्येकाचें कर्तव्यकर्म आहे, असें त्यांच्या मनांत शिरलें होतें. अशा विलक्षण विचारसरणीमुळें त्या खेड्यांतील चालीरीती फारच बदलून गेल्या होत्या. लग्न करण्याची चाल त्या गांवांत बंदच पडली होती. परंतु पूर्वीं ज्यांचीं लग्नें झालेलीं होतीं त्यांपैकीं एखादी बाई गरोदर राहिली असतां तिनें आपखुषीनें गर्भपात केल्यास तिला बक्षीस देण्यांत येत असे; परंतु ही आधींची युक्ति आईला न सुचून जर एखादें मूल गर्भाच्या पिशवींतून बाहेर निघालेंच तर त्याला तसेंच्या तसेंच जी आई या लोकांतून परत पाठवील ती अतिशय राजनिष्ठ आणि साम्राज्यावरील मोठी संकट टाळणारी असें समजून तिचें नांव सार्वजनिक जागेच्या

भिंतीवर खोदून ठेवलें जात असे. परंतु इतक्याही तजविजींतून निसटून अन्न फस्त करणारें एखादें मूल जन्मास आलेंच, तर हा ब्रिटिश साम्राज्याचा शत्रु म्हणून तेथील सर्व लोक त्याचा तिटकारा करीत. नवीन मुलाचा जन्म झाला म्हणजे जिकडे तिकडे आनंदी आनंद होतो. परंतु या गांवांत अशी चाल होती कीं, कोणाला मुलगा झाला आहे आणि तो जगला आहे अशी बातमी कळल्याबरोबर गांवांतील सर्व लोक त्या मुलाच्या बापाच्या घरीं येऊन एक तासभर रडत बसत असत. ह्या गांवची ही गरिबीची स्थिति कळून जर कोणी एखादा उदार मनुष्य तेथील लोकांना पैसा दोन पैसे देऊं लागला अगर चतकोरअर्धी भाकर घालूं लागला, तर त्यांना मोठा राग येत असे. ते असें म्हणत असत कीं, ब्रिटिश साम्राज्यांतील गरीब लोकांची संख्या लवकर कमी करून तें साम्राज्य अतिशय उत्तम आहे असें दाखविण्यासाठीं आम्ही प्रयत्न करीत असतां, हे उदार लोक आणि धर्मशील लोक येऊन आमच्या राजनिष्ठेच्या कामाला मध्येंच हरकत करतात! अशा बदमाष लोकांना सरकारनें आमच्या गांवांत येऊं देऊं नये अशी त्यांची इच्छा होती, व त्यासाठीं त्यांनीं एकदां पोलिसचीही मदत मागितली होती. या गांवांतील लोकांना फसवून जिवंत राखण्याच्या दुष्ट इराद्यानें जर कोणी आपल्या खिशांत पैसे घेऊन येईल अगर आपल्या पदराखालीं शिजवलेलें अन्न अगर कच्चे दाणे आणील, तर त्याला एकदम पकडण्यांत यावें, अशी सक्त ताकीद देऊन गांवांत येणाऱ्या प्रत्येक रस्त्यावर एकेक गेट बसवावें अशी या लोकांची मर्जी होती. त्यामुळें दानशील लोकांनीं आपण होऊनच त्या लोकांना धर्म करण्याचा नाद सोडून दिला. इतकी निष्कामबुद्धि आणि पुत्रादिक अनेक संसारबंधनांबद्दल इतकें वैराग्य कोणत्याही राजांच्या अमदानीमध्यें आजपर्यंत वाढलेलें नव्हतें. हिंदुस्थानांतील लोकांचा पुष्कळ पैसा सणांमध्यें खर्च होतो, अशी जी कित्येक सुधारक लोकांची तक्रार आहे तीहि अगदीं खरी आहे, असें या गांवच्या लोकांना वाटून त्यांनीं आपले सर्व सण बंद केले होते. फक्त रामनवमी, गोकुळअष्टमी, आषाढी आणि कार्तिकी एकादशी, महाशिवरात्र वगैरे कांहीं किरकोळ सण त्यांनीं झुगारून दिले नव्हते. पण ते सण पत्करण्यांत देखील त्यांचा हेतु निराळा होता. हे सण ते सर्वांशीं पत्करीत नसत. त्यांतला उपासाचा अंश तेवढा त्यांना मान्य असे. त्याखेरीज त्या

गांवांत दुसरे कोणतेही सण कबूल केले जात नसत. बाकीचे सगळे सण बंद करून त्यांनीं फक्त एक सण ठेवला होता. आणि तो सण म्हणजे मरणाचा होय. ज्या दिवशीं कोणी मरेल तो त्या गांवांत अतिशय आनंदाचा दिवस म्हणून समजला जात असे. जो मेला तो हिंदुस्थानांत आपल्या आईच्या पोटीं येऊन धन्य झाला, असें ते समजत. हिंदुस्थानांत भिकार लोक अतिशय वाढत आहेत या कलंकापासून आपल्या सरकारला ज्यानें आपल्या एकट्याच्या सामर्थ्याप्रमाणें अंशतः तरी सोडविलें त्यानें आपलीं बेचाळीस कुळें उद्धरलीं, असें त्यांना वाटत असे. त्यामुळें ज्या दिवशीं असा कोणी एखादा परोपकारी राजनिष्ठ मनुष्य पूर्ण विरक्त होऊन व सर्व वासनांचा क्षय करून आपले पंचप्राण बाहेरच्या स्थूल वायूमध्यें योगबलानें मिसळून देऊन धूम्रमार्गानें अगर तेजोमय मार्गानें ब्रह्मपदाप्रत जावयाकरतां निघे, तो दिवस अतिशय महोत्सवाचा म्हणून ते लोक साजरा करीत असत. त्या लोकांनीं ताशे-वाजंत्रीं वाजविणारे लोक आपल्या गांवांतून हांकलून दिलेले होते. परंतु असा कोणी मेला म्हणजे त्या दिवशीं आसपासच्या गांवच्या ताशेवाजंत्रीं-वाल्यांना मुद्दाम बोलावणें पाठवून आणाविण्यांत येत असे.

त्या गांवांत एक म्हातारा मनुष्य राहत असे. त्याला दोन मुलगे होते. त्यांपैकीं धाकटा मुलगा घरीं असे व थोरला मुलगा पुष्कळ वर्षांपासून पलटणींत नोकर असे. त्यानें आपला गांव सोडल्याला बरींच वर्षें झालीं होतीं. तो लहानपणीं गांवांत होता तेव्हां तेथील रीतीभाती इतर ठिकाणच्या-प्रमाणेंच सरळ होत्या. पण तो अठरा वर्षांचा होतांच त्याला पलटणींत चाकरी लागली, तेव्हांपासून तो बारा वर्षांत कधीं या गांवांत आला नव्हता. अखेरीस त्याला एकदां सिक रजा मिळून तो आपल्या घरच्या माणसांना भेटण्याकरितां आपल्या गांवाकडे येण्याला निघाला. आगगाडी, आगबोट, बैलगाडी, पायवाट, इत्यादिकांमधून चालतां चालतां अखेरीस एके दिवशीं तो आपल्या खेड्याजवळ येऊन पोहोंचला. तों त्याला ताशेवाजंत्र्यांचा कड-कडाट ऐकूं आला. आपल्या गांवांत आज कांहीं तरी लग्नकार्य असलें पाहिजे असें वाटून त्याला फार आनंद झाला. पुढें कांहीं वेळानें गांवचे बरेच लोक मोठमोठे उंची पोषाख घालून रस्त्यानें चालत निघालेले त्याच्या दृष्टीस पडले. परंतु त्या सगळ्यांच्या अग्रभागीं त्याचा धाकटा भाऊ अति उंची

पोशाख घालून नटविलेला पाहून त्याच्या मनाची खात्री झाली कीं, बहुतकरून या आपल्या धाकट्या भावाचेंच लग्न आपल्या बापानें आरंभिलें असावें. प्रत्यक्ष आपल्या पाठच्या भावाचें लग्न असून बापानें आपल्याला कसें कळविलें नाहीं याबद्दल विचार करीत तो थोडासा पुढें गेला नाहीं, तोंच त्याच्या भावाच्या हातांत असलेली एक शिंकाळी त्याच्या नजरेस पडली, तेव्हां तो मनांत थोडासा चरकला. नवऱ्यामुलानें हातामध्यें करा धरावयाचा, त्यानें विस्तव पेटवलेल्या मडक्याची शिंकाळी धरली आहे, यावरून आपल्या घरावर हा कांहीं तरी दुःखदायक प्रसंग कोसळला असावा अशी त्याची खात्री झाली. पण या पताका कशाला, ह्या कमानी कशाला, आणि हे सर्व लोकांच्या अंगावर उत्तम पोषाख कशाला, या शंकांचें त्याला समाधान करतां येईना. इतक्यांत गांवांतील एक मनुष्य वाटेनें चालला होता त्याला कोण मेलें म्हणून या शिपायानें विचारलें. तेव्हां त्याच्या बापाचें नांव त्याच्या कानांवर आलें. तें ऐकून त्याचे हातपाय मोडले, कंबर खचली, कंप सुटला, अंगाला घाम आला, बोबडी वळली, डोळ्यांतून खळखळ पाणी वाहूं लागलें. आणि अशा स्थितींत मोठ्यानें आक्रोश करीत व छाती बडवीत तो समारंभ चालला होता. त्याच्यासमोर तो येऊन दाखल झाला. अशा मंगल प्रसंगीं हा मूर्ख रडतो कोण आणि आमच्या आनंदाचा विरस करतो कोण, हें पाहण्याकरतां समारंभांतील सर्व लोक त्याच्या भोंवतीं जमले. तेव्हां त्यांना तो म्हणाला, तुम्हीं हें मांडलें आहे काय ? माझे बाबा मरण पावले असतां त्यांची तुम्हीं ही थट्टा चालविली आहे कीं काय ? आणि तुम्ही सगळेजण त्याला मूठमाती देण्याला जात आहां किंवा एखाद्या लग्नाला चाललां आहां ? यावर कांहीं लोकांनीं त्याला समजून सांगितलें कीं, हा मंगल प्रसंग आहे, हा वैराग्याचा कळस आहे, व हा राजनिष्ठेचा कडेलोट आहे ! अशासारखा शुभयोग कधींही यावयाचा नाहीं. याकरितां तूं येथें रडूं नको. तो म्हणे, प्रत्यक्ष माझा बाप मेला आणि तुम्ही मला रडूं नको म्हणून म्हणतां ! आणि हा मंगल प्रसंग आहे असें तुम्ही मला सांगतां ! अशा रीतीनें दोन्ही पक्षांमध्यें वादविवाद सुरू झाला. एकमेकांची समजूत पडेना. मारामारीवर प्रकरण आलें. तेव्हां त्या समाजांत एक वृद्ध व शहाणा मनुष्य होता त्यानें मरण हा सण कां मानण्यांत येण्याची चाल पडली, हें त्या शिपायाला समजावून सांगितलें.

त्या चालीची ती सविस्तर मीमांसा ऐकून त्या शिपायाच्या मनांत खेडेगांवच्या दारिद्रयावस्थेची कल्पना बरोबर बिंबली. आपले जातभाई, आपले आईबाप, आणि आपले भाऊबंद अशा विपन्न अवस्थेमध्यें दिवस कंठीत असतां आपण त्यांच्या स्थितीकडे कधीं ढुंकूनसुद्धां पाहत नाहीं, याबद्दल त्यांच्या डोळयांतून खळ्कन् पाणी आलें. जो बापाच्या मरणाबद्दल रडत होता तो आपल्या देशांतील सर्व लोकांच्या दुःस्थितीसाठीं रडूं लागला, आणि आपल्या हातून याचा काय प्रतिकार होईल हें आपल्या पलटणींतील आपल्या स्नेह्यांना विचारण्याकरतां बापाच दिवस झाल्यानंतर तो निघून परत गेला.

या गांवांत नवीन मनुष्यें उत्पन्न व्हावयाचीं नसल्यामुळें व जुन्या माणसांचे मरणाचे सण वारंवार पडूं लागल्यामुळें तो गांव थोड्याच दिवसांत ओसाड पडला. माणसें नाहींशीं झालीं. फक्त घरें मात्र उरलीं होतीं. आणि कोल्हीं दिवसांमुद्धां त्या घरांतून येऊन राहत असत. पण तीं घरेंदेखील आज उरलीं नाहींत. हिंदुस्थानांतील पुष्कळ खेडीं नाहींशीं झालेलीं आहेत. कांहीं धरणीकंपानें जमिनींत गडप होतात, कांहीं पाण्याचीं धरणें बांधण्यासाठीं उठविलीं जातात, आणि कांहीं अन्नपाण्याच्या टंचाईमुळें आपण होऊनच दुसरीकडे उठून जातात. अशांपैकींच कोणत्याशा एका कारणानें तें खेडें आज हिंदुस्थानच्या पाठीवर पाहावयालासुद्धा शिल्लक उरलेलें नाहीं!

---

कोणी एक सुंदर स्त्री नोकरीस असे. तिचें या कटवाल्यांपैकीं एका इसमावर प्रेम जडलेलें होतें व त्यामुळें त्या दोघांच्या रोज किल्ल्यांत गांठी पडत असत. ती स्त्री किल्ल्याच्या भिंतीवरून दररोज रात्रीं दोरीची शिडी खालीं सोडीत असे व तिच्यावरून चढून तिचा प्रियकर किल्ल्यांत जात असे. या नेहमींच्या रिवाजाप्रमाणें हा कटवाला हल्ल्याचे दिवशीं रात्रीं वर चढून आला व त्यानें आपल्या पाठीमागून आपल्याबरोबरच्या वीस साथीदारांनाही त्याच रीतीनें वर घेतलें. नंतर ह्या सर्व कटवाल्यांनीं किल्लेदार आणि त्याच्याजवळ असलेले थोडेसे शिपाई यांना कैद केलें व तो किल्ला आपल्या हस्तगत करून घेतला. या रॉसबर्गच्या किल्ल्याप्रमाणें सार्नेन हा दुसरा एक किल्ला ऑस्ट्रियन अधिकाऱ्यांच्या ताब्यांत होता, पण तोहि स्वित्झर्लंडमधील लोकांनीं दुसऱ्या एका युक्तीनें त्याच दिवशीं आपल्या हस्तगत करून घेतला. या किल्ल्यांत या क्रांतीच्या वेळीं लँडेनबर्ग हा अधिकारी राहत असे. वर्षाच्या पहिल्या दिवशीं शेतकरी लोकांनीं कांहीं तरी नजरनजराणे घेऊन आपल्या अधिकाऱ्यांकडे भेटावयाला जाण्याची तिकडे एक चाल होती. तिचा फायदा घेण्याची कल्पना कांहीं कटवाल्या लोकांच्या मनांत आली. त्यांनीं सुमारें पन्नास असामी गोळा केले. सर्वांनीं शेतकऱ्यांचे पोषाख घातले, व हातांत टेकावयाची एक एक काठी आणि डोकीवर फळफळावळ वगैरेच्या नजराण्यांनीं भरलेली एक एक टोपली, अशा तयारीनें ते सर्वजण किल्ल्याकडे गेले. किल्ल्याजवळ जाऊन पोंहोचल्यानंतर त्यांपैकीं तीस असामी जवळच्या झाडींत गुप्त रीतीनें दडून बसले आणि बाकीचे वीस लोक आपले नजराणे घेऊन लँडेनबर्गच्या भेटीसाठीं म्हणून किल्ल्यांत गेले. या युक्तीनें त्यांचा किल्ल्यांत बिनहरकत प्रवेश झाल्यानंतर प्रत्येकानें आपल्याजवळ जें एकेक भाल्याचें पातें दडवून ठेविलें होतें तें बाहेर काढून हातांतील काठीवर बसविलें. इतक्यांत त्यांच्यापैकीं एकानें अतिशय मोठ्यानें शिंग फुंकलें. तो खुणेचा आवाज ऐकल्याबरोबर जवळच्या झाडींत दडून बसलेले लोक किल्ल्यावर धांवून आले, व त्या सर्वांनीं मिळून रखवालदार शिपायांना कैद केलें व तेथील मुख्य अधिकारी लँडेनबर्ग यालाही त्यांनीं पकडलें व आम्ही फिरून तुमच्या देशांत कधींही पाऊल टाकणार नाहीं अशी त्यांनीं त्याच्याकडून शपथ घेवविली. अशा रीतीनें इतर ठिकाणचेहि किल्ले स्विस लोकांनीं कांहीं तरी युक्ति करून काबीज केले व

जिकडे तिकडे स्वतंत्रतेला मोकळी वाट करून देण्यांत आली. स्वतंत्रतेची इशारत सगळीकडे पोंहोचण्याकरितां उंच टेकड्यांवरून लांकडांच्या राशी जाळण्यांत आल्या. सर्व देवळांतून आनंदाच्या घंटा वाजूं लागल्या. लहान मुलें उड्या मारूं लागलीं व मोठीं माणसें परमेश्वराची प्रार्थना करूं लागलीं; आणि आपला देश स्वतंत्र झाला याबद्दल सर्वांना आनंद वाटूं लागला.

परमेश्वराच्या मनांतून एखाद्या देशाला स्वतंत्रता द्यावयाची असली म्हणजे तो सर्वच गोष्टी अनुकूल रीतीनें घडवून आणीत असतो. हें कसें, हें पुढील गोष्टीवरून चांगलें लक्षांत ठसण्यासारखें आहे. स्वित्झर्लंडमधील लोकांनीं आपल्या देशांत जे ऑस्ट्रियाचे लोक आलेले होते त्यांचा पराभव करून त्यांना बाहेर हांकलून दिलें होतें हें खरें, परंतु तेवढ्यानेंच त्यांची स्वतंत्रता पूर्णपणें कायम झाली असती असें नाहीं. अजून ऑस्ट्रियामध्यें आल्बर्ट राजा जिवंत होता; व त्याच्या अंतःकरणांत त्याची महत्त्वाकांक्षाही जिवंत होती. आपण फिरून स्वित्झर्लंड जिंकूं आणि तेथील लोकांवर फिरून आपले जुलूम चालवूं, असें त्याला वाटत होतें. स्विस लोकांनीं जेसलरला मारलें म्हणून काय झालें? जेसलरसारख्या दुष्ट अधिकाऱ्यांचा झरा ऑस्ट्रियामध्यें जिवंतच होता. त्याच्याकडे परमेश्वरानें जर वक्रदृष्टीनें पाहिलें नसतें, तर स्वित्झर्लंडची स्वतंत्रता कायम टिकली असती किंवा नाहीं, याबद्दल शंकाच आहे. स्वित्झर्लंडमधील बंडाची बातमी ऐकल्याबरोबर तेथील लोकांची खोड मोडण्याकरितां निघण्याची आल्बर्टनें तयारी केली. त्यानें अतिशय मोठें सैन्य जमविलें, व स्वित्झर्लंडवर तो चाल करून निघाला. परंतु रूस या नांवाच्या नदीच्या कांठीं त्याचा तळ पडलेला असतां त्याच्या एका जवळच्या आप्तानें त्याचा गुप्त रीतीनें खून केला. आणि अशा रीतीनें स्वित्झर्लंडच्या स्वतंत्रतेचा भयंकर शत्रु पृथ्वीच्या पाठीवरून नाहींसा झाला. परंतु आल्बर्टच्या पाठीमागून लिओपोल्ड ऑस्ट्रियाच्या गादीवर आला, व त्यानें १३१५ मध्यें स्वित्झर्लंडमधील पहाडी लोकांची खोड मोडण्याचा फिरून एक जंगी प्रयत्न केला. लिओपोल्ड यानें सोळा हजार सैन्य जमविलें व त्याचे दोन भाग करून दोघांनीं दोन वाटांनीं स्वित्झर्लंडमध्यें प्रवेश करावा असें ठरवून त्यानें कूच करण्याला सुरवात केली. ही तयारी पाहून आतां स्वित्झर्लंडची स्वतंत्रता टिकत नाहीं, असें पुष्कळ लोकांना वाटूं लागलें. परंतु खुद्द स्विस् लोकांना मात्र अजून तसें वाटत

नव्हतें. आपण मरून जाऊं पण आपली स्वतंत्रता शत्रूच्या हातीं देणार नाहीं, असा त्या लोकांना पीळ होता. या लोकांची संख्याच थोडी होती. त्या मानानें त्यांनीं एकंदर तेराशें लोक जमा केले. सोळा हजार सैन्यापुढें तेराशें लोकांचा वास्तविक काय टिकाव लागणार? केवळ आंकड्यांकडेच पाहिलें तर सोळा हजारांपुढें तेराशेंचा चुराडाच उडाला पाहिजे. परंतु देवाच्या घरीं हा संख्येचा प्रश्न नाहीं. जुलमी राज्यपद्धति आणि स्वतंत्रता यांचा हा प्रश्न आहे. जुलमाचे अन्याय आणि स्वातंत्र्येच्छु लोकांकडून त्याचें पारिपत्य, यांच्या झगडण्यामध्यें स्वातंत्र्याचाच नेहमीं जय झाला पाहिजे, असें परमेश्वराच्या घरचें धोरण इतिहासावरून स्पष्ट होत आहे. स्विस लोक जरी फक्त तेराशेंच होते, तरी त्यांचें शौर्य स्वदेशाभिमानानें अतिशय उद्दीपित झालेलें होतें व त्यांना सर्व डोंगराची आणि खिंडींची माहिती होती. लिओपोल्डचें सैन्य ज्या वाटेनें येणार त्या वाटेंतील एक अवघड खिंड या लोकांनीं रोखून ठेविली होती, व तेथें ते शत्रूंची वाट पाहत स्वस्थ बसले होते. ते जेथें दबा धरून बसले होते त्या डोंगराला मॉरगार्टन असें नांव आहे; व या मॉरगार्टनच्या खिंडींतच लिओपोल्डच्या सैन्याचा पराभव झाल्यामुळें या लढाईला मॉरगार्टनची लढाई असें म्हणतात. स्वित्झर्लंडच्या स्वतंत्रतेच्या इतिहासांत ही लढाई फार प्रख्यात आहे. या ठिकाणीं एका बाजूला भयंकर डोंगर आणि दुसऱ्या बाजूला अतिशय विस्तीर्ण असें एक सरोवर असल्यामुळे तेथील खिंडीची वाट फार धोक्याची होती. तेथें लिओपोल्डचे घोडेस्वार आल्याबरोबर डोंगरावर बसलेल्या स्विस लोकांनीं त्यांच्यावर डोंगरावरील दगड ढकलून देण्याला सुरवात केली. त्यामुळें ते घोडेस्वार अगदीं गोंधळून गेले. आतां काय करावें अशा विवंचनेंत ते आहेत इतक्यांत स्विस लोकांच्या दुसऱ्या एका टोळीनें त्यांच्यावर आपली तलवार चालवून त्याना मागें हटविलें. तेथें जी कत्तल झाली, आणि जे लोक पळतां पळतां पडले, त्यांच्यामुळें तेथील खिंडीचा रस्ता भरून गेला. पुढें आलेले कांहीं घोडेस्वार मागें पळून गेले, त्यामुळें घोडेस्वारांच्या पाठीमागें असलेल्या पायदळामध्येंही फार घोटाळा उडून गेला, आणि जो तो पळत सुटला. त्या सैन्याला थांबविण्याची सोय उरली नाहीं. व इतरांबरोबर खुद्द लिओपोल्डही पळून गेला. सुमारें पंधराशें लोक त्या खिंडींत मरण पावले, आणि तळ्यांत पडून किती मेले याचा तर पत्ताच नाहीं. अशा रीतीनें ही

लढाई सकाळीं नऊ वाजेपर्यंत आटपली. परंतु लिओपोल्डच्या सैन्याची दुसरा तुकडी दुसऱ्या वाटेनें स्वित्झर्लंडमध्यें शिरून नासधूस करीत होती. ही बातमी मॉरगार्टनच्या खिंडींत विजयी झालेल्या देशभक्तांना कळल्याबरोबर ते तिकडे गेले. परंतु लिओपोल्डच्या हाताखालील आपल्या मुख्य सैन्याचा पराभव होऊन खुद्द लिओपोल्डही पळून गेला ही बातमी त्या दुसऱ्या तुकडीला कळतां-क्षणींच त्या सैन्यानेंही पळ काढण्याला सुरवात केली, आणि स्विस लोकांनीं त्यांचा पाठलाग करून त्यांना आपल्या देशाच्या हद्दीबाहेर घालवून दिलें.

हा विजय मिळाल्यानंतर पूर्वी सांगितलेल्या तिन्ही कॅन्टन्समधील लोकांची ब्रूमेन येथें फिरून एक सभा भरली. आणि पूर्वी स्वतंत्रता मिळविण्याकरितां जशा त्यांनीं शपथा घेतल्या होत्या, त्याचप्रमाणें या ठिकाणीं ती स्वतंत्रता कायम राखण्याविषयीं त्यांनीं शपथा घेतल्या. आपल्यापैकीं कोणत्याही प्रांतावर शत्रूनें हल्ला केला तर त्याच्या संरक्षणाला सर्वांनीं जावें, बाकीच्यांच्या सल्ल्या-शिवाय कोणत्याही एका प्रांतानें परकीय लोकांशीं तह वगैरे करतां कामा नये, आणि आपसांत कांहीं तंटा पडल्यास तो पंचांच्या निकालानें तोडावा, असे ठराव त्या वेळीं त्या लोकांनीं केले. येथून स्वित्झर्लंडच्या स्वतंत्रतेला कायमची सुरवात झाली. या तीन प्रांतांची स्वतंत्रता आणि त्यापासून होणारी भरभराट पाहून आपणही त्यांच्या कटांत शिरावें व स्वतंत्रतेचा उपभोग घ्यावा असें बाकीच्या प्रांतांना वाटूं लागून ते एकापाठीमागून एक त्यांच्या कटांत सामील होऊं लागले. ल्यूसर्न आणि झूरिच हे दोन प्रांत लवकरच या कटांत मिळाले. नंतर त्या पांचांच्या कटांत ग्ल्यारिस हा सहावा आणि झग हा सातवा प्रांत मिळाला; व त्यांचेमागून बर्न हा आठवा प्रांत त्या कटांत सामील झाला व अशा रीतीनें ही संख्या तेरापर्यंत वाढत जाऊन एकमेकांच्या मदतीनें सर्व स्वित्झर्लंड देश आपली स्वतंत्रता शेवटपर्यंत कायम राखूं शकला.

---

## सांपडलेलें संपुट : : : ९

स्वतंत्र : अग्रलेख, ता. १६-११-१९०६

आगगाडीचा प्रवास किती तरी चांगला! त्या मानानें आगबोटींत माणसाचे अतिशय हाल होतात! आणि लोकांचीं किती तरी सामानें समुद्रांत पडतात! नुकतेंच थोडे दिवसांपूर्वी एक भटजी एका बंदरांत उतरत असतां त्यांचें मचव्यांत म्हणून टाकलेलें गाठोडें समुद्रांत पडलें! रात्रीची तीनचार वाजण्याची वेळ! पुष्कळ पाहिलें, पण गांठोडें कोठें दिसेना. भटजींनीं नाखव्याला दोन पैसे द्यावयाला केले, पण उपयोग झाला नाहीं. त्यांना मोठी हळहळ लागली. आज पुष्कळ दिवसांपासून चालवलेला नेम टळणार, म्हणून त्यांना वाईट वाटूं लागलें. सूर्योदयाबरोबर आपल्या संपुष्टांतील देवांची पूजा केल्या-वांचून आजपर्यंत ते कधीं राहिले नव्हते. पण काय करणार! मचव्यांत बसून तसेच ते किनाऱ्यावर आले. पण त्यांच्या मनाची तळमळ राहीना. ते कांहीं पैशासाठीं तळमळत नव्हते. कारण, त्या गरीब ब्राह्मणाच्या बोचक्यांतील सगळे पैसे गोळा केले असते, तरी ते दोनचार आण्यांच्यावर भरले असते किंवा नाहीं याची शंकाच आहे. पण भटजी आपल्या देवांच्या संपुष्टासाठींच तळमळत होते. वास्तविक पाहिलें असतां त्या संपुष्टांतही फारसें कांहीं नव्हतें. तें एक जुनें तांब्याचें संपुष्ट होतें. त्याला जीं दोन पुडे होतीं त्यांपैकीं खालच्या पुडांत देव असून वरचें पूड झांकण म्हणून बसविलें जात असे. या संपुष्टाच्या तोंडाचा व्यास सरासरी दीड इंच असावा; आणि त्याच्या कांठाचा घेर चार इंचांहून कांहीं थोडासा अधिक होता. अशा तऱ्हेच्या त्या दोन पुडांपैकीं खालच्या पुडांत देवांना जी गादी म्हणून अंथरली होती, ती बऱ्याच चित्रविचित्र रंगांच्या

कापडांनीं तयार केलेली होती. या गादीची जन्मकथा थोडीशी ऐकण्या-सारखी आहे. आगाऊ पैसे घेतल्यावांचून भटजी सहसा कोणाकडे कोणतेंहि धर्मकृत्य करीत नसत. परंतु एका शिंप्यानें सत्यनारायणाच्या पूजेंत भटजींना चांगलाच गंडा घातला. उद्यां सकाळीं पैसे देतों असें म्हणून शिंप्यानें आदल्या दिवशींच आपला सत्यनारायण उरकून घेतला; पण पुढें तो पैसे देईना. पैसे बुडविणाऱ्या लबाड शिंप्याला सत्यनारायण पावला; पण भटजींना सहा महिने झाले तरी पैसे पावले नाहींत! भटजी रोज त्याच्या दुकानांत संध्याकाळचे पैसे मागण्याकरतां जाऊन बसत. पण कांहीं इलाज चालेना. एक दिवस त्यांच्याकडे एका व्यसनी श्रीमंत मनुष्याची चंची शिवण्याकरितां बनातीचे कांहीं तुकडे आले होते. त्यांची चंची शिवून झाल्यावर त्या तुकडयांचे जे तुकडे राहिले होते, ते पाहून आपल्या संपुष्टात आसन नाहीं याची आठवण होऊन भटजींच्या मनांत आपले पैसे वसूल करून घेण्याची कल्पना आली. शिंप्यानेंही असें पाहिलें कीं, उगीच सत्य-नारायणाच्या पूजेचे पैसे बुडवून असत्यपणा आपल्या पदरीं कशाला यावयाला पाहिजे! असें म्हणून त्यानें त्या चिंध्याच्या गाळामधून भटजींच्या संपुष्टांत बसण्याजोगी एक लहानशी वर्तुळाकृति सुमारें दोनतीन इंच घेराची रंगी-बेरंगी गाधडी शिवून दिली. ती पाहून भटजींना फारच समाधान वाटलें; आणि ती गादी अंथरून त्यावर त्यांनीं आपल्या देवांना बसविलें. तें संपुष्ट जरी बरेच लहान होतें आणि त्यांतील गादी जरी अगदीं आकुंचित होती, तरी त्या गादीवर भटजी गर्दीगर्दीनें बऱ्याच देवांना बसवीत असत. त्यांपैकीं एका देवाचा इतिहास बराच अश्रुतपूर्व आहे. तो पूर्वी एका वैदूच्या पोतडीमध्यें मात्रेची गोळी म्हणून राहत असे. त्या वैदूनें त्याला उगाळून उगाळून अगदीं गरगरीत व गुळगुळीत केलें होतें. कोणाच्याहीं प्रकृतींत अवगुण उत्पन्न करावयाचा नाहीं हा त्या मात्रेंत मोठा गुण असे! एके दिवशीं एका सोनाराच्या घरीं तो वैदू ती मात्रा म्हणून उगाळून देत असतां सोनाराला संशय आला. तेव्हां आतां आपली लबाडी बाहेर पडणार अशा भीतीनें ती मात्रा तेथेंच टाकून तो वैदू पळून गेला. पुढें सोनारानें तो दगड वजन करून पाहिला तों सहा माशाला सुमारें दोन वाल तो कमी

भरला. तेव्हा त्यानें आपलें अर्ध्या तोळ्याचें जें वजन होतें तें मागें टाकून व हेंच अर्ध्या तोळ्याचें बरोबर वजन म्हणून पुढें आणलें. आणि त्या दिवसापासून प्रत्येक तोळ्यावर त्याचा तीन साडेतीन वाल नफा होऊं लागल्याकारणानें ह्या धोंड्यांत कांहीं तरी देवपणा असला पाहिजे, असा त्याच्या मनाचा ग्रह होत चालला. आणि त्यामुळें प्रत्येक सोनें वजन करण्याच्या कामांत तो त्याला वरच्यावर वापरूं लागला. त्यामुळें तो जास्त जास्तच झिजत जाऊन त्या सोनाराचा जास्त जास्तच फायदा होऊं लागला. अशा रीतीनें त्या भावी देवानें त्या सोनाराच्या वाटव्यांत बारा वर्षे आपला देह झिजविला. पुढें फारच बोभाटा होऊन खोटीं वजनें वापरण्याच्या आरोपावरून पोलिसानें त्या सोनाराचा वाटवा जप्त केला, त्या वेळीं त्याचें वजन बरोबर ५ मासे आणि १॥ गुंज भरलें. हा दगड नव्हे, देव आहे, हा परिसाप्रमाणें सोनें देतो असे त्या सोनाराचे शब्द एका भाविक पोलिसानें झाड्याच्या वेळीं ऐकिले होते. त्यामुळें पुढें कांहीं काळानें एके दिवशीं चोरीच्या मुद्देमालाच्या संग्रहामधून हा दगड नाहींसा झाला! परंतु पुढें त्या पोलिसाची नक्कल झाल्यामुळें त्याचे देव जेव्हां ब्राह्मणांना वांटून टाकण्यांत आले तेव्हां हा देव या भटजींच्या वांटणीला आला. आणि तेव्हांपासून तो त्यांच्या संपुष्टामध्यें वास करीत होता. भटजी सूर्योपासक होते व त्यामुळें त्या संपुष्टात त्यांनीं एक सूर्यकांतही ठेविलेला होता. ते मोठे भाविक होते व त्यांची त्या देवांवर अतिशय श्रद्धा असे. त्यामुळें तें संपुष्ट हरवल्याबद्दल त्यांना फार वाईट वाटूं लागलें. पडाव किनाऱ्यापाशीं लागल्यानंतर ते वाळूंतून बरेच लांब चालत गेले. तों इतक्यांत दुसरा कोंबडा आरवला. जवळच एक गोड्या पाण्याची विहीर होती. तेथें त्यांनीं नित्यनियमाप्रमाणें प्रातःस्नान केलें आणि देवाची पूजा करण्याकरतां आसन घालून ते बसले. या सर्व गोष्टी नेहमींच्या संवयीप्रमाणें साहजिक घडून आल्या. परंतु पूजा करण्याला बसल्यानंतर संपुष्ट नाहीं याची आठवण होऊन ते अतिशय खिन्न झाले व आसनमांडी मोडून दोन गुडघ्यांच्या मध्यें डोकें घालून "देवा, तूं इतके दिवस माझे हातून सेवा घेतलीस, आणि आजच तूं मला कंटाळलास!" असें म्हणत ते दीर्घ श्वास सोडीत बसले.

आपल्याला देव कंटाळला असें भटजींना वाटत होतें. पण वस्तुस्थिति तशी नव्हती. जणूं काय आजपर्यंतच्या कर्मनिष्ठत्वानें संतुष्ट होऊनच की काय कोण जाणे, या ब्राह्मणाला ज्ञानदृष्टि द्यावी आणि याच्यावर अनुग्रह करावा अशीच देवाच्या मनांत इच्छा उत्पन्न झाली असावी, यांत संशय नाहीं. ती उषःकाळची रमणीय वेळ होती. पक्षी आपल्या वृक्षावरील अंथरुणावरून उठून मंजुळ शब्द करूं लागले होते. तरी पण सगळींच झाडें अजून जागीं झालीं नव्हतीं. आणि जीं जागीं झालीं होतीं, त्यांच्या योगानें त्या वेळचा शांतपणा भग्न होण्याच्या ऐवजीं जास्त आल्हादकारकच भासत होता. सर्व जग शांत आणि निर्विकार दिसत होतें. मनुष्याचे मनोविकार अद्यापि जागे होऊन त्यांचा गलबला सुरू झाला नव्हता. फुलें प्रफुल्लित झालीं होतीं, पण त्यांचा सुगंध वाहून नेण्याला अद्यापि वारे निजून उठले नव्हते. रात्रभर जळलेल्या दिव्यांतील तेलें संपत आलीं होतीं. माणसांनीं गजबजणाऱ्या वाटा-अगदीं शून्य होत्या. जलाशयांच्या पृष्ठभागावरील तवंग अद्यापि कोणीहि हलवलेले नव्हते. भूतलावर जिकडे तिकडे शांतता पसरलेली होती. पण त्याच्यापेक्षां आकाशामध्यें जास्त शांतता भरलेली दिसत होती. पश्चिमेच्या बाजूकडे वळून चंद्र निजलेल्या सर्व जगावर पहारा करीत होता, आणि नक्षत्रें आकाशसरोवरांतील कल्हारपुष्पाप्रमाणें टवटवीत आणि हृदयाल्हादक दिसत होतीं. पूर्वेस अरुणाचा प्रकाश दिसूं लागला होता. परंतु चंद्राच्या चांदण्याचें तेज अद्यापि कमी झालें नव्हतें. अशी सभोंवतालची परिस्थिति असतां भटजीमहाराजांनीं गुडघ्यांत घातलेलें डोकें बाहेर काढलें, आणि वर आकाशाकडे पाहिलें, तों पूर्वजन्मींचें सुकृत त्या वेळीं उभें राहून त्यांच्या डोळ्यांवरील मोह एकाएकीं गळाला. त्यांचें मन आल्हादित झालें, आणि तो आल्हाद त्यांच्या शरीरांत शिरतांना त्यांचें हृदय धडधड धडधड असें वारंवार कंप पावूं लागलें. सर्व अंग सात्त्विक विकारांनीं युक्त झालें. प्रेमानें त्यांचे नेत्र पाझरूं लागले. आणि भटजीमहाराजांच्या तोंडांतून पुढें लिहिल्या-प्रमाणें उद्गार निघाले :— "अहाहा! हें खरें संपुट! काय ही दिव्य शोभा! भूतल हें या संपुटाचें खालचें पूड आणि आकाश हें त्याचें वरचें झांकण! किती अद्भुत, किती विस्तीर्ण आणि किती दिव्य संपुट हें! द्यावा-पृथिवीच्या स्वरूपानें वेदांत आणि उपनिषदांत वर्णिलेलें तें हेंच संपुट! परमे-

श्वरानें स्वतः आपल्या हातानें हें संपुष्ट निर्माण करून मनुष्याच्या हवालीं केलें असतां त्याच्याकडे आजपर्यंत मीं कधीं पाहिलें नाहीं! आणि माझें संपुष्ट हरवलें म्हणून मी शोक करीत बसलों! आणि जसें माझें संपुष्ट तसेच त्यांतील माझे देव! संपुष्ट हरवल्याबरोबर त्यांतील माझे देवही हरवले! परतु देवा, तूं कधीं तरी हरवतोस काय? परमेश्वरा, तूं विश्वव्यापक असतांना कोठें आणि कसा हरवशील! पण ही गोष्ट मूढ जनांच्या लक्षांत येत नाहीं. तरी पण एवढें मात्र खरें कीं, आजपर्यंत अज्ञानामुळें माझे कांहीं तरी हरवलें होते खास! आज तुझ्या कृपेनें तें सर्व मला सांपडलें. देवा, माझें हरवलेले संपुष्ट आज मला सांपडलें! पृथ्वीतल आणि आकाशमंडल यांनीं बनविलेलें संपुष्ट, त्यांत या उगवणाऱ्या सूर्यासारखी माझी मूर्तिमंत उपास्य देवता, आणि त्याच्यावर वाहण्याकरितां हीं नक्षत्ररूपी सुवर्णकमलें असतांना मीं अज्ञानानें मोहित होऊन व्यर्थ शोक काय करावा! या दिव्य संपुष्टामध्यें प्रत्यक्ष परब्रह्म कोंडलें आहे. आणि अनंतालाही यामध्यें राहण्याला अवकाश आहे. हे जें विश्वात्म्याचें विश्वस्वरूप दिसत आहे याचें भजन, पूजन, अर्चन, मनन आणि निदिध्यासन केलें असतां काय प्राप्त होणार नाहीं? याचें चिंतन करतां करतां मनुष्य एतद्रूपच होऊन जाईल. आणि असें जो करील त्याच्यावर परमेश्वराची कृपा होईल, त्याचे सर्व संकल्प परमेश्वर सिद्धीस नेईल, आणि अंतीं त्याला परमेश्वराची सरूपता प्राप्त होईल!" इतके म्हणून ब्रह्मांडीं चढलेला आत्मा भटजीमहाराज खालीं उतरीत आहेत तों समुद्राच्या पाण्यांत तरगत तरंगत लाटाच्या उसळीनें किनाऱ्याला येऊन लागलेलें भटजीमहाराजांचें बोचकें घेऊन तो त्या पडावावरील नाखवा भटजींचा शोध काढीत त्यांच्या जवळ आला, व पूर्वीं कबूल केल्याप्रमाणें दोन पैसे देऊन भटजींनीं आपलें हरवलेलें संपुष्ट परत विकतही घेतलें. पुढें लोकसंग्रहार्थ ते ते संपुष्ट आपल्याजवळ बाळगीत असत. परंतु त्यांची खरी उपासना या दोन पैशांनीं मिळणाऱ्या संपुष्टाइतक्या आकुंचित जागेमध्यें ततःपर कधींही मावूं शकली नाहीं.

## हिंदुस्थान मात्र अजून आहे तसेंच आहे ! : १०

काळ : अग्रलेख, ता. २३-११-१९०६

हिंदुस्थानांत आलेल्या सगळ्या साहेब लोकांची एकच दिशा ! पहिल्या मुत्सद्यांनीं जो कित्ता घालून दिला आहे, तो त्यांचे पाठीमागून येणारे सर्व साहेब लोक गिरवित आहेत. हिंदुस्थानचें कल्याण झालें पाहिजे असें तोंडानें म्हणावयाचें, आणि हातानें इंग्लंडचें कल्याण करीत असावयाचें, हिंदुस्थानचे लोक पात्र झाले म्हणजे आम्ही त्यांचें राज्य त्यांच्या हवालीं करूं असें बाह्या-त्कारी बोलावयाचें, परंतु त्यांनीं नेहमीं अपात्रच राहावें अशी हातानें आंतून कृति करावयाची; हिंदुस्थानांतील लोकांना शिक्षण देऊन सुसंस्कृत केलें म्हणजे ते सुधारतील असें सांगावयाचें, परंतु त्यांना निरुपयोगी शिक्षणा-शिवाय दुसरें शिक्षण बारा आणि बारा चोवीस वर्षें ते रखडले तरी कधीं मिळूं नये अशी व्यवस्था आंतून ठेवावयाची; सारांश, हिंदु-स्थानच्या उन्नतीसाठीं प्राथमिक प्रयत्न करण्याचा सर्व आव घालावयाचा मात्र, परंतु कांहीं विवक्षित मर्यादेपलीकडे हिंदुस्थानची उन्नति उंच वाढूं द्यावयाचीच नाहीं; या धोरणाचें बाळकडू हिंदुस्थानांत येणाऱ्या प्रत्येक इंग्लिश मनुष्याला पाजण्यांत आलेलें असतें. हें त्यांचें धोरण पूर्वीं एकदां गुप्त होतें. पण आतां त्यांतील गुप्तपणा नष्ट झाला आहे. नेटिवांपैकीं सुशिक्षितांना तर तें कळलेलेंच आहे; पण साळी, माळी, तेली, तांबोळी वगैरे धंद्यांच्या लोकांनासुद्धां आतां ही गोष्ट कळून चुकलेली आहे. याचें प्रत्यंतर एकदां एका साहेबाला फारच चांगल्या रीतीनें आलें. हे साहेब हिंदुस्थानांतून विलायतेस गेल्याला बरींच वर्षें झालीं पण ते येथें होते तेव्हां त्यांच्याकडे

एका इलाख्यांतील कौन्सिलरचें काम असे. पुष्कळ पगार मिळत असल्यामुळें बंगला, गाडी-घोडे, बाग-बगीचा, नाच-रंग वगैरे चैनीला कांहीं कमी नव्हतें. त्यांना झाडांचा विशेष नाद असल्यामुळें त्यांनीं एक बाग तयार करवून त्याजवर एका माळ्याची नेमणूक केली होती. हा माळी आपल्या जातींतील इतर लोकांच्या मानानें पुष्कळच धूर्त व शहाणा होता. आणि त्यांतच लहानपणच्या थोड्याशा अभ्यासानें आणि मोठेपणाच्या पुष्कळशा सहवासानें तो इंग्रजी भाषेचें ज्ञान आणि व्यवहार यांत चांगलाच निपुण झाला होता. त्याला देशस्थिति काय आहे हें समजत असे. हिंदुस्थान देश आपला आहे, तो इंग्लिशांच्या गुलामगिरींत आहे, तो वर येण्याला आपण प्रयत्न केले पाहिजेत, या सगळ्या गोष्टी त्याला समजत. हिंदुस्थानचे खोटे मित्र आणि खरे शत्रु कोण या गोष्टींचेंही त्याला ज्ञान नव्हतें असें नाहीं. तो मोठा देशाभिमानी होता, आणि त्यामुळें जरी तो पोटासाठीं साहेबाची चाकरी करीत होता तरी त्या चाकरीची त्याला मोठीशी पर्वा होती असें नाहीं. त्याचे धनी जे कौन्सिलरसाहेब त्यांना वारंवार म्युनिपालिटयांचीं मानपत्रें, शाळांचे बक्षिससमारंभ, एखाद्या क्लबची मेजवानी, वगैरेसारख्या बारीकसारीक वेळीं भाषण करण्याचा प्रसंग येई. त्या वेळीं ते नेटिव लोकांच्या वाढीसाठीं अतोनात कळकळ दाखवीत, व प्राथमिक शिक्षण, लोकल बोर्डांतील निवडणूक वगैरे गोष्टी फार राष्ट्रोपयोगी आहेत असें ते सांगत. परंतु अशा उपायांनीं एखादे वेळीं लोक पुढें सरसावून जास्त हक्क मागण्याला प्रवृत्त झाले असतां हे साहेब त्याना असा उपदेश करीत कीं, तुमच्या राजकीय हक्कांची वाढ आस्ते झाली पाहिजे, अजून तुम्हांला दाबातच ठेवलें पाहिजे. तुम्हाला फार वाढू न दिल्यानें तुमची वाढ जशी फैलावेल तशी दुसऱ्या कशानेंही ती फैलावणार नाहीं. या सगळ्या गोष्टी त्या माळ्याच्या कानावर येत असत. त्या ऐकून घेऊन त्यानें आपल्या बागेमध्यें एक नवीनच क्रम सुरू केला! प्रत्येक झाडाच्या मुळाशीं तो अतिशय मेहनत घेई. त्याला पाणी घाली, खत घाली, आणि त्याची चांगली मशागत करी. परंतु त्याला आपल्या साहेबाच्या सहवासानें अशी एक वाईट खोड लागली कीं, तो सगळ्या झाडांच्या शेंडयांना कांहीं तरी अपाय करून ठेवी. कांहींचे तो शेंडे कातरून टाकी, कांहीं उंच वाढत चाललेल्या रोप्यांना वांकवून त्यांच्या

शेंडयावर मोठाल्या दगडांचें दडपण घालून ठेवी, कांहीं झाडांवर प्रत्यक्ष निखारे ठेवून तो त्यांचे शेंडे जाळी, झाड मारून टाकणारीं अशीं जीं कित्येक विषें आहेत त्या निरनिराळ्या विषांत निरनिराळे काटे बुडवून ते तो कित्येक झाडांच्या शेंडयांना हळूच एखाद्या गुप्त ठिकाणीं टोंचून ठेवी, आणि पाण्याला सळसळीत आधण आणून तें तो कित्येक झाडांच्या डोक्यांवर ओती. अशा रीतीनें बागेंतील प्रत्येक झाडाची त्यानें व्यवस्था लावली. एखादी खांदी कोठें जोरानें उंच वाढूं लागली कीं, त्या माळ्यानें ती तोडलीच ! एखाद्या झाडावर फूल येणार असें वाटलें कीं, त्याची कळी त्या माळ्यानें कुसकरून टाकलीच ! आणि कळीपासूनच जर ही व्यवस्था, तर मग फळ दृष्टीस पडण्याची आशा कशाला पाहिजे ! या रीतीनें सर्व बाग बनली गेली. तळाशीं हिरवेगारपणा पण वर पानें करपलेलीं, बुंधाशीं जोम परंतु वर वाढ खुंटलेली, मुळें टवटवीत परंतु वरून कीड लागलेली, असा चोहोंकडे देखावा दृष्टीस पडूं लागला. पण पुढें पुढें शेंडयाकडील प्रयोगांचा असा जारीनें सपाटा सुरू राहिल्यामुळें हळूहळू झाडांचीं मुळेंही शुष्क होऊं लागलीं. त्या वेळीं सुमारें फेब्रुवारीचा महिना होता. परंतु तेव्हां बागेंत पडत चाललेला फरक नेहमीं पाहणाराच्या एकदम दृष्टोत्पत्तीस येत नव्हता. पुढें उन्हाळा सुरू झाल्यामुळें कौन्सिलरसाहेब गरम हवेमधून थंड हवेमध्यें गेले. आणि तिकडे ते सुमारें तीन सवा तीन महिने राहिले. एकदां मे महिन्याच्या अखेरचे दिवस होते. तेव्हां मध्यंतरींच कांहीं जरूरीच्या कामासाठीं ते आपल्या हेडक्वार्टरच्या बंगल्यावर एकाएकीं आले, आणि बंगल्याच्या बागेंत पाहतात तों माळी कोणा झाडाचा शेंडा कातरतो आहे, तर कोणावर कढत पाणी ओततो आहे; कोणावर निखारा ठेवितो आहे, तर कोणाला विषारी कांटे टोचतो आहे ! हें पाहून साहेब चकित झाले व बागेंतील बहुतेक सर्व झाडें वाळून गेलेलीं पाहून त्यांना अतिशय राग आला. आणि संतापानें लाल होऊन हातांत, एक हंटर घेऊन बूट आपटीत त्या माळ्याजवळ येऊन त्याला रागें भरूं लागले; व हें तूं काय करीत आहेस म्हणून त्यांनीं त्याला हंटर उगारून विचारलें. तेव्हां तो अतिशय नम्रपणानें हात जोडून म्हणाला : "धनीसाहेब, माझ्यावर असें रागावूं नका. मी या बागेची सुधारणा करीत आहें ! आतां ती हळूहळू सुधारत चालली आहे ! आणि लवकरच ती फार चांगल्या ऊर्जिता-

वस्थेला येईल ! मी रात्रंदिवस इतकी मेहनत घेत असतां आपण रागावण्यासारखें काय कारण झालें ? ही बाग तुम्हांला वाळून गेल्यासारखी दिसते कीं काय ? नाहीं ! नाहीं ! असें कधींही होणार नाहीं ! मी ही बागेची जोपासना करण्याची पद्धत आपल्यासारख्या साहेब लोकांच्या पायांपासून शिकलों आहें. उन्नतीला कारणीभूत होणाऱ्या सर्व गोष्टींचे प्रारंभ मात्र करावे, परंतु प्रत्यक्ष उन्नति होऊं लागली म्हणजे तिला तेथल्या तेथें छाटून काढावी, म्हणजे उन्नतीची वाढ आस्ते आस्ते परंतु खात्रीनें चांगली होते, अशी आपल्यासारख्याच्या तोंडचीं वाक्यें आणि हातचीं कृत्यें मीं अनेक ऐकिलीं व पाहिलीं आहेत. आणि वाढीचा व भरभराटीचा जर हा इतका उत्तम उपाय असेल तर तो आपणही करून पाहावा. कारण, हिंदुस्थांतील लोकांवर त्याचा इतका चांगला परिणाम होत आहे तर तो आपल्या बागेंतील झाडांवरही अलबत झालाच पाहिजे, असा विचार करून मी त्या तत्त्वावर या बागेची सुधारणा करण्याला लागलों आहें आणि या कामांत मला बरेंच यश येत चाललें आहे, अशी माझी समजूत आहे ! काय, हीं झाडें तुम्हांला टवटवीत दिसत नाहींत ? मला तर वाटतें कीं, हिंदुस्थानांतील लोकांच्या चेहऱ्यांपेक्षां या झाडांवरच जास्त टवटवीतपणा दिसत आहे ! या बागेत भरभराट दिसत नाहीं असें तुम्हांला वाटतें ? मला तर वाटतें कीं, येथें किती तरी भरभराट आहे ! बजेटच्या वेळीं हिंदुस्थानांत जर तुम्हांला चोहोंकडे भरभराट दिसते तर मग ती याच बागेमध्यें कां दिसूं नये, हें मोठें आश्चर्य आहे ! मी एक दिवस निजलों असतां पहांटेस मला असें स्वप्न पडलें कीं, या बागेची सुधारणा करण्याकरतां देवानें माझी या बागेवर नेमणूक केली आहे ! आणि तेव्हांपासून देवानें माझ्यावर सोंपविलेल्या या कर्तव्यकर्माकडे मीं कधींही दुर्लक्ष केलें नाहीं. झाडांच्या मुळांशीं पाणी, खतें वगैरे सर्व गोष्टींचा मी अगदीं बरोबर देखावा करून दाखवितों. फक्त आपल्याच तत्त्वाप्रमाणें या झाडांची वाढ एकदम होऊं नये म्हणून मी कोणाचे शेंडे कातरतों, कोणावर कढत पाणी ओततों, कोणाला विषारी कांटे टोंचतों आणि कधीं कोणाच्या डोक्यावर जळजळीत निखारे ठेवतों. सारांश, या झाडांना सरासरी एक हातभर उंचीपेक्षां जास्त वाढूं देऊं नये अशाबद्दल मी नेहमीं दक्षता ठेवीत असतों. असें असूनही बाग आपणांला रमणीय दिसत नसेल तर आपल्या डोळयांत राजनिष्ठेचा अंश

कांहीं तरी कमी असला पाहिजे! अगदीं या बागेसारखेंच हिंदुस्थान असतां तें टवटवीत आणि भरभराटीस आलेलें आहे असें आम्हांला दिसतें, आणि आपल्याला ही बाग वाळलेली दिसते हें मोठें नवल आहे. या झाडांत रस उरला नाहीं असें आपण म्हणतां ? हिंदुस्थानच्या लोकांच्या अंगांतील सगळा द्रव्यरस आपण विलायतेस शोषून नेला तरी ते लोक जर जास्त जास्तच श्रीमंत असूं शकतात, तर मग या झाडांतील रस बराचसा आटून गेला असला म्हणून हीं टवटवीत दिसावयाला काय हरकत आहे ? मला तर ही सगळी बाग अगदीं प्रफुल्लित दिसत आहे! आणि इतका प्रफुल्लितपणा हिला पुरे आहे. हिंदुस्थानदेखील जर असल्या प्रफुल्लितपणामध्यें संतुष्ट आहे, तर मग ह्या बागेचेंच कां घोडावें ? आतां मी हें कबूल करतों कीं, या बागेंतील झाडांवरचीं बहुतेक पानें वाळून गेलेलीं आहेत; पण म्हणून तेवढ्यानें या बागेचा प्रफुल्लितपणा कांहीं कमी झाला आहे असें मला बिलकुल वाटत नाहीं. त्यांत काय आहे ? हिंदुस्थानांतील देखील पुष्कळ लोक दुष्काळांत असेच अन्नावांचून वाळून जातात. पण म्हणून हिंदुस्थानच्या आबादानींत कधीं तरी कमतरपणा पडला आहे काय ? तसेंच, साहेब, या बागेंत कोठेंही फूल किंवा फळ दिसत नाहीं, यावर आपण जाऊं नका ! हिंदुस्थानची आज पन्नासपाऊणशें वर्षें एकसारखी मशागत चालली आहे, त्याच्यावर काय फूल किंवा फळ आलें आहे ? फळाबद्दल उतावीळपणा करून उपयोगी नाहीं ! या बाबतींत अगदीं नेमस्तपणानें वाट पाहत बसलें पाहिजे. टिकाऊ फळें पाहिजे असतील, तर तीं दीर्घ काळानें प्राप्त होणार. माझी तर अशी समजूत आहे कीं, या बागेंतील झाडांवर जर चांगलीं परिपक्व फळें यावयास पाहिजे असतील, तर आपण निदान एक हजार वर्षें तरी दम धरला पाहिजे! आपण जहालपणानें घाई मात्र करूं नये, म्हणजे आपणांला या बागेपासून सर्व कांहीं मिळेल ! मीं आपल्याकडून शिकस्त करीत आहें, आणि माझ्या मतें मी ही बाग सुधारीत आहें. पण मी तिला मारून टाकीत आहे असें आपल्याला वाटत असेल, तर आपल्या भाषेचा उपयोग करून मी आपल्याला खात्रीपूर्वक सांगतों कीं, मी हिंदुस्थानच्याइतकी ही बाग मारून टाकली आहे. आतां या माझ्या कामगिरीबद्दल माझी आपल्या पायांपाशीं एवढीच प्रार्थना आहे कीं, मला निदान तीनचार हजार रुपये तरी पगार असावा ! दहा रुपयांमध्यें माझें भागत नाहीं !

शिवाय–" "बस्, बस्" साहेब त्याच्या अंगावर खेंकाळून म्हणाले, "पुरे झालें तुझें शहाणपण! थांब तुला पगार वाढवतों!" असें म्हणून साहेब त्याच्यावर चवताळून धावून गेले व तूं येथून चालता हो असें त्याला म्हणूं लागले. तेव्हां तो माळी फिरून शांतपणानें म्हणाला, "काय! मी येथून चालता होऊं? आणि या बागेला भरभराटीस आणण्याचें काम तसेंच टाकून देऊं? छे, माझा स्वप्नावर फार विश्वास आहे; आणि पहांटेचीं स्वप्नें नेहमीं खरीं होत असतात! देवानें मला या बागेची सुधारणा करण्याला मुद्दाम सांगितलें आहे! मी ती देवाची आज्ञा ( बराच मोठा लाभ होत असल्यावांचून ) कधींही मोडणार नाहीं!" हा त्याचा लोंचटपणा पाहून साहेबांना अधिकच त्वेष आला व तूं गेलेंच पाहिजेस असें त्यांनीं त्याला निक्षून सांगितलें. माझ्यानें इतक्यांत येथून कसें जाववेल? अजून येथील कित्येक झाडें जिवंत आहेत! व कोठें कोठें एखादें हिरवट पान दिसत आहे! अजून मला या बागेबद्दल पुष्कळ आशा आहे! अजून माझें हिला सुधारण्याचें काम पुरें झालें नाहीं! पण मी आपल्याला असें एक विचारतों कीं, "साहेब, या झाडांचें आणि आपलें काय नातें आहे हो?" साहेब संतापून म्हणाले, "गाढवा, माणसांचें आणि झाडांचें काय नातें असतें? मी झाड आहे की काय, कीं ज्यामुळें त्याचें माझें नातें असावें? त्याचा माझा कांहीं संबंध नाहीं!" "तरीदेखील त्यांच्यासाठीं," माळी म्हणाला, "तुम्ही इतके हळहळतां, मग हिंदुस्थानांतील ज्या लोकांच्या पोटचीं पोरें अशाच रीतीनें अन्नावांचून वाळून जात असतील त्यांना काय बरें वाटत असेल? या यःकश्चित् निर्जीव झाडांकरतां तुम्हांला इतका खेद वाटतो; पण हिंदुस्थानांत यांच्यासारखे हजारों सजीव प्राणी अन्नावांचून करपून जातात त्यांच्याबद्दल तुम्हांला कधीं दाद तरी लागली आहे काय? या झाडांचें काय? यांची जरा काळजी घेतल्याबरोबर हीं सगळीं झाडें फिरून चांगलीं होतील! पण हिंदुस्थानांतील जीं असंख्य माणसें अन्नावांचून करपून मरून गेलीं आहेत, त्यांपैकीं एक तरी माणूस आपण फिरून जिवंत करून दाखवा पाहूं! मनुष्याच्या हातांत परमेश्वरानें ती विद्या ठेविली नाहीं, तरी मनुष्य दुसऱ्यांच्या जिवाबद्दल किती तरी बेपर्वा असतो! हें चांगलें काय?" हें त्या माळ्याचें भाषण ऐकून साहेबांच्या मनोवृत्तींत फरक झाला. त्यांच्या हृदयांत सत्याचा प्रकाश पडला. डोळे वटारलेले होते त्यांत सौम्यपणा उत्पन्न होऊं लागला. वर चढलेल्या

भिंवया सरळ रेषेमध्यें आल्या. तोंडावरील लाली कमी झाली. रागानें स्फुरण पावत असलेले ओष्ठ स्थिर झाले. ज्या हातानें हंटर वर उगारला होता तो हात लंबरेषेनें पूर्ववत् खांद्यापासून खालीं लटकूं लागला. लाथ मारण्यासाठीं उगारलेला बुटाचा पाय मागे सरला आणि साहेब शांतपणानें म्हणाले, "आम्ही राज्यमदानें धुंद झालेले आहों, असें बोलून आमचे कोणी डोळे उघडले तर आम्ही खरोखरच तुमचें स्वराज्य तुम्हांला पात्र करून तुमच्या हवालीं करूं!" त्यानंतर "तुम्ही मला घालवीत होतां तर आतां मीच होऊन निघून जातों," असें म्हणून तो माळी जाऊं लागला. तेव्हां साहेबाने त्याचा प्रेमानें हात धरून सांगितलें कीं, "मी तुला कधींहि जाऊं देणार नाहीं. तोंडपुजे लोक पुष्कळ मिळतात; परंतु तुझ्यासारखा खरें बोलणारा मनुष्य मला हिंदुस्थानांत आल्यापासून आजपर्यंत जो कधीं एकही मिळाला नाहीं, तो तूं अनायासानें माझ्या हातीं लागला असतांना तुला मी कसा जाऊं देईन?" तरींहि तो माळी जातच होता. परंतु साहेबांनीं आग्रहाची अतिशय कमाल केल्यावरून तो पुढे कांहीं दिवस तेथें होता. त्या मुदतींत त्यानें आपली बाग फिरून चांगली सुधारली. परंतु सगळे साहेब लोक पश्चात्ताप पावून चांगले झालेले नसल्याकारणाने हिंदुस्थान मात्र अजून आहे तसेंच आहे!

---

## काँग्रेसच्या उमेदवाराला उपदेश : : : ११

काळ : अग्रलेख, ता. ३०-११-१९०६

● यापूर्वी काँग्रेसचें स्वरूप केवळ औपचारिक होतें.

एका गांवांत एक सामान्य मनुष्य राहत असे. त्याला फारसें इंग्रजी वगैरे येत होतें असें नाहीं, तरी पण त्याच्या चेहऱ्यावरून पाहिलें तर, निदान हा एल्एल्. बी. तरी असावा असें वाटण्याइतका तरतरीतपणा त्याच्या तोंडावर दिसत असे. त्याला एक दिवस असें वाटलें कीं, सगळे लोक काँग्रेसला जातात तर आपणही एक वर्ष तेथें जाऊन काय आहे तें पाहावें. असा विचार मनांत आणून तो त्या उद्योगाला लागला. त्याच गांवांत एक नेहमींचे वारकरी होते. काँग्रेस सुरू झाल्यापासून यांची वारी कधींही चुकली नाहीं. घरीं कितीही अडचण असेना, डिसेंबरची विसावी तारीख आली कीं, हे घरीं भेटावयाचेच नाहींत. एकदां तर प्रत्यक्ष त्यांचे वडील अगदीं शरपंजरीं पडले होते. तरीसुद्धां त्यांनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं. ते म्हणाले, मला गेलेंच पाहिजे. यंदां काँग्रेसच्या कान्स्टिटयूशनचा ठराव पुढें मांडावयाचा संभव आहे, तेव्हां मला काँग्रेसच्या मंडपांत हजर असलेंच पाहिजे! इतक्या एकनिष्ठेनें ते काँग्रेसची वारी करीत असत आणि त्यामुळे त्यांना काँग्रेसची सर्व माहिती झालेली होती. काँग्रेसच्या मंडपाला किती खांब असावे, व काँग्रेसच्या प्लॅटफॉर्मची लांबीरुंदी किती असावी येथपासून तों काँग्रेसमधील कोणत्या खुर्चीवर कोणीं बसावें, आणि कोणत्या स्थळीं किती टाळ्या वाजवाव्या, याबद्दलची इत्थंभूत माहिती त्यांच्यापाशीं होती. त्यांनीं काँग्रेसमधील वर्तनाबद्दल एक शास्त्रच बनविलें होतें. असल्या अनुभवशीर मनुष्याची गांठ घेऊन त्यांच्यापासून माहिती मिळवून आपणही एकदां काँग्रेसला जावें असें त्या तरुण मनुष्यानें ठरविलें. आणि त्यांचा सल्ला घेण्याकरतां व ते सांगतील त्या नोट्स उतरून घेण्याकरतां एक शिसपेन्सिल आणि नोटबुक बरोबर घेऊन तो त्यांच्याकडे गेला. त्यांच्या संवादामध्यें जी माहिती बाहेर पडली ती इतर

लोकांच्याही फार फायद्याची असल्यामुळें तिचा गोषवारा थोडक्यांत पुढें दिला आहे.

वारकरी सभ्य गृहस्थ म्हणाले : तुमच्यासारख्या तरुण लोकांना कॉंग्रेस पाहावयाला जाण्याची इच्छा होत आहे ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. असो. आतां मी तुम्हांला कॉंग्रेसमधील वर्तनासंबंधानें व इतर कित्येक किरकोळ गोष्टींसंबंधानें नियम सांगतों ते ऐका. तुम्ही प्रथम आपल्याकरितां एक नवीन पोषाक तयार करा. कोट, पाटलोण, बूट वगैरे सरंजाम असल्याशिवाय तुम्ही कांग्रेसमध्यें जाऊन काय करणार ? याकरितां या गोष्टी अवश्य पाहिजेत. तसेंच सगळ्या डोकाभर केस पाहिजेत. मग त्या डोकीवर आपण हिंदुस्थानांतील आहों एवढें दाखविण्याकरिता तुम्ही रुमाल घाला, किंवा पगडी घाला, किंवा एखादें बावळें पागोटें घाला, किंवा अघोलीसारखी सिंधी टोपी घाला. आपल्या हिंदुस्थानी लोकांना फसविण्याकरितां हें एवढें हिंदुत्वाचें चिन्ह तुम्हीं डोक्यावर बाळगलेंच पाहिजे. परंतु जर तें डोक्यावरील शिरस्त्राण काढून बाकी राहिलेल्या तुमच्या शरीराकडे कोणीं पाहिलें तर, त्याच्या उत्पत्तीचें श्रेय एखाद्या नेटिव खिस्त्याकडेच असलें पाहिजे, अशीच पाहणाराची खात्री झाली पाहिजे. आतां इतकें झाल्यानंतर अंगावर धोतर घ्यावें किंवा नाहीं हा त्याच्यापुढें महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न होतो. यासंबधानें बरेच मतभेद आहेत. हिंदुस्थानच्या बहुतेक देशभक्त पुढाऱ्यांचें असें मत आहे कीं, अंगावर धोतर घेऊं नये, परंतु कांहीं थोडया लोकांचें याच्या उलट असें मत आहे कीं, अंगावर उपरणें हें घेतलेंच पाहिजे. आतां उपरणें घ्यावयाचेंच झालें तर तें घेण्याचे तीनचार प्रकार आहेत. एक गळ्याभोंवतीं गळफांसासारखें घ्यावें, दुसरें जानव्याप्रमाणें एका खांद्यावरून आणि दुसऱ्या बगलेमधून वगैरे. वगैरे परंतु कोट, पाटलोण आणि बूट यांच्याइतकी नेमस्त देशाभिमानाला या विषयाची आवश्यकता नसल्यामुळें याबद्दलचा विस्तार मी फारसा तुम्हांला सांगत नाहीं. अशा तयारीनें तुम्ही कॉंग्रेसच्या ठिकाणीं जाऊन पोहोंचला म्हणजे तुम्हांला तेथें बरींच कामें करावीं लागतील. अध्यक्ष कधीं येणार याचा तुम्ही तेथें गेल्यानंतर फार बारकाईनें शोध ठेवा. कारण, ते आल्याबरोबर त्यांना ओढीत नेलें पाहिजे ! त्यांची प्रकृति ठीक नसते, किंवा कॉंग्रेस भरण्याइतकें जें मोठें शहर असतें तेथें घोडे किंवा बैल यांचा तोटा

असतो असें नाहीं; तरी पण इंग्लिशांनीं आपल्याला किती पशुतुल्य स्थितीला नेऊन पोहोंचाविलें आहे हें प्रत्यक्षप्रमाणानें दाखविण्याकरतां तुम्ही अध्यक्षांच्या गाडीचें जोंखड आपल्या मानेवर घेण्याला तत्पर असलें पाहिजे. आणि तुम्ही देखील तेथें फार काळजीनें वागा, नाहीं तर कदाचित् कोणी तुम्हालाही ओढूं लागतील. याकरतां तुम्ही अशी खबरदारी ठेवा कीं, तुम्ही कॉंग्रेसच्या शहरीं गेल्यावर होतां होईल तोंपर्यंत घोडयाच्या गाडींत बसण्याचेंच टाळा, म्हणजे तुमच्यावर सहसा तो प्रसंग येणार नाहीं. आणि इतक्याही उप्पर कदाचित् एखादे वेळीं तुम्ही चुकून गाडींत बसलांच तर गाडीच्या घोडयांकडे फार दक्षतेने नजर ठेवा. कोणी आपल्या गाडीचें घोडे सोडतो आहे कीं काय, हें डोळयांत तेल घालून पाहत बसा. नाहीं तर कांहीं वस्ताद मुलें तुमच्या घोड्यांच्या रेन्स केव्हांच तोडून टाकून तुमची नजर चुकवून त्या घोडयांच्या जागीं आपल्या माना घालतील! आणि असा जर का दुर्दैवानें तुमच्यावर प्रसंग आला तर मात्र मग तुमचें कांहीं चालणार नाहीं. तुम्ही त्यांना म्हणाल कीं, मीं असें काय शतकृत्य केलें आहे, अजून आपल्या देशाचीं पुष्कळ कामें व्हावयाचीं आहेत, मी यःकश्चित् मनुष्य आहे, तरी तिकडे कोणीसुद्धां लक्ष देणार नाहीं! तुम्ही त्यांना ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगूं लागाल, सर्व माणसें सारखीं आहेत, आपण सगळे बंधु आहों, मी तुम्हांला मनुष्य समजतों, अशा अनेक प्रकारच्या तुम्हीं त्यांच्या विनवण्या केल्या तरी 'वंदे मातरम्‌च्या' गलक्यांत हें तुमचें तत्त्वज्ञान कोणीही ऐकणार नाहीं. याकरतां तुम्हीं घोड्याची गाडी वर्ज्य करावी हें उत्तम. असो. तुम्हांला दुसरी गोष्ट सांगावयाची ती अशी कीं, तुम्हीं कॉंग्रेसच्या मंडपामध्यें गेल्यानंतर तेथें कधींही झोंप घेतां कामा नये. अध्यक्षांचें तीनचार तासांचें चऱ्हाट, मि. वाच्छा यांचें मिलिटरी खर्चाचे आंकडे, आणि मद्रासच्या शामभटी वक्त्यांचे वेडेवांकडे उच्चार आणि निरस व नेमस्त विचार हे ऐकत असतां कोणालाही झोंप न येणें अशक्य आहे, हें मी कबूल करतों. तरी पण मनुष्यानें फार सावध असावें लागतें. कारण, मध्येंच एखादे वेळीं ह्यूमसाहेबांचें नांव येतें आणि त्या वेळीं टाळया वाजविण्याला आपण जागे नसलों तर सगळे नेमस्त लोक आपल्याकडे टकमकां पाहूं लागतात! कॉंग्रेसमध्यें वास्तविक अतिशय मोठें देशकार्य म्हटलें म्हणजे टाळया वाजविण्याचेंच असतें. शेत-

कऱ्यांचीं पोरें टाळ्या वाजवून ज्याप्रमाणें शेतांतील पांखरें उडवितात, त्याप्रमाणें काँग्रेसमधील ठराव पास करून घेण्यास टाळ्या वाजवाव्या लागतात! टाळ्यांवांचून ते ठराव पास होत नाहींत. एका वर्षी पहिले दोन दिवस मोठमोठ्या पुढारी वक्त्यांनीं आपल्या भाषणांत खाल्ले; आणि पुढें अध्यक्षांना राहण्याला व रिसेप्शन कमिटीला चर्चा करण्याला सवड नसल्यामुळें शेवटच्या एका दिवसांत एकदां काँग्रेसनें आपले सतरा ठराव पास करून घेतले त्या वेळीं मी अगदीं टाळ्या वाजवतां वाजवतां मेटाकुटीस आलों. सकाळीं बरोबर दहा वाजल्यापासून कामाला सुरवात झाली आणि तेव्हांपासून अगदीं रात्रीच्या नऊ वाजेपर्यंत मला सुमारें पांच पांच मिनिटांच्या अंतरानें एकसारख्या टाळ्या वाजवाव्या लागत होत्या. कारण, ठराव पुष्कळ आणि त्यांजवर ताजे अध्यक्ष, शिळे अध्यक्ष, सेक्रेटरी, रिसेप्शन कमिटीचे सभासद वगैरे सगळ्यांच्या भिडेभाडेचे वक्तेही पुष्कळ! एकेका ठरावावर पांचपांच, सहासहा वक्ते! जणुं काय बैलगाडीच! टांग्यांत फक्त दोनच माणसें बसविण्याचा जसा cruelty to animals च्या दृष्टीनें पोलिसांनीं नियम करून दिला आहे, त्याप्रमाणें एकेका ठरावावर फक्त दोनच वक्त्यांनीं बसावें, असा cruelty to men च्या तत्त्वावर काँग्रेसला पोलिस एक नियम करून देतील, तर आमच्यासारख्या भाविक प्रतिनिधींचा कांहीं तरी निभाव लागेल! मी आपल्याला भाविक प्रतिनिधि म्हणवून घेण्याचें कारण असें कीं, कांहीं धर्मलंड प्रतिनिधि राजेसाहेबांचे आभार मानावयाचे, किंवा वेडरबर्नसाहेबांना आयुष्य चिंतावयाचे, किंवा मि. दादाभाईंना फिरून लिबरल लोकांनीं निवडून द्यावें म्हणून प्रार्थना करावयाची, किंवा ब्रिटिश काँग्रेस कामिटीच्या खर्चाची खंडणी मंजूर करावयाची, असले पवित्र ठराव पास होत असले तरी टाळ्या वाजवीत नाहींत! मी या टाळ्यांच्या शास्त्राचा फार सूक्ष्म रीतीनें अभ्यास केला आहे. सगळ्या मुख्य मुख्य काँग्रेसमधील पुढाऱ्यांच्या यासाठीं मीं गांठी घेतल्या आहेत व तुम्ही सूचना आणणारांना किती टाळ्या वाजवितां, अनुमोदन देणाराला किती टाळ्या वाजवाव्या, आणि त्याच्या पाठीमागून टेकू देण्याकरतां येणाऱ्या वक्त्यांची किती टाळ्यांनीं संभावना करावी, याबद्दल प्रत्येकाचीं मतें विचारून मी त्याबद्दलच्या आंकड्यांचीं कोष्टकें तयार केलीं आहेत, आणि काँग्रेसच्या ब्ल्यूबुकामध्यें हे स्टॅटिस्टिक्सचे आंकडे प्रसिद्ध

करण्याला काय हरकत आहे, या विषयासंबंधानें कॉंग्रेसच्या एका स्टँडिंग कौन्सिलपाशीं माझा पत्रव्यवहार सुरू आहे. प्रत्येक वक्तयाला, मग तो चांगला असो किंवा वाईट असो, निदान त्याच्या जाण्यायेण्याच्या खर्चापुरत्या दोनदां तरी टाळ्या मिळाल्याच पाहिजेत, याबद्दल बहुतेक मतैक्य झालेलें आहे. आणि त्यामुळें अगदीं मूर्ख बोलणारा असला तरी मला टाळ्या पडल्या अशी घरीं येऊन खरी फुशारकी मारण्याला त्याला अडचण पडत नाहीं. कारण, तो येतो तेव्हां एकदां टाळ्या वाजतात व तो जातो तेव्हां तर त्याच्या कटाळवाण्या मूर्खपणाच्या संकटांतून आपण एकदांचे सुटलों असें समजून लोक अतिशय आनंदानें टाळ्या वाजवतात! या जाण्यायेण्याच्या टाळ्यांशिवाय आणखीही मधून मधून पुष्कळ वेळां टाळ्या वाजवाव्या लागतात. आपल्या इकडच्या लोकांना टाळ्या वाजवण्याचें मोठेंसें संकट वाटत नाहीं. कारण, त्यांना कथांतून वगैरे टाळ्या वाजविण्याची संवय असते. परंतु कथेंतून ही सोय असते कीं, हरदास स्वतः जेव्हां टाळी वाजवावयाची असेल तेव्हां 'टाळी महाराज' म्हणून ओरडतात. परंतु कॉंग्रेसमध्यें तसें नसतें, म्हणून पंचाईत पडते. माझी पुष्कळ दिवसांपासून कॉंग्रेसच्या सेक्रेटरींना अशी सूचना आहे कीं, जेथें ह्यूम, दादाभाई, वेडरबर्न वगैरेंचीं नांवें येतील तेथें वक्ते स्वतःच "टाळी महाराज" म्हणून ओरडण्याला खुषी नसतील तर वक्त्याजवळच त्यांनीं एक व्हालंटियर उभा करावा व कॉटन, वेडरबर्न वगैरेंच्या नांवांसारखीं टाळी वाजवण्याचीं स्थळें आलीं म्हणजे त्यानें "टाळी महाराज" म्हणून मोठ्यानें ओरडून सर्व झोंपीं गेलेल्या श्रोत्यांना इशारत द्यावी! पहावें यंदा तरी ही सूचना अमलांत येते कीं नाहीं ती! 'टाळी महाराज' म्हणून ओरडणाऱ्या व्हॉलंटियरची विशेष आवश्यकता अशासाठीं आहे कीं, चांगल्या वक्त्याच्या भाषणाच्या साहजिक ओघांत हीं नांवें आलीं तर मनुष्य सावध असतो व टाळी वाजवूं शकतो. परंतु गचाळ वक्ते आपल्याला कोठेंच टाळी पडत नाहीं म्हणून मध्येंच कोठें तरी दादाभाईंचें अगर कॉटनसाहेबांचें नांव घुसडून देण्याची युक्ति करूं लागले आहेत. त्यामुळें ऐकणारे सहज फसतात. तेव्हां अशा प्रसंगीं लोकांना जागे करण्याकरितां एखाद्या तरी व्हॉलंटिअरची फार आवश्यकता आहे! हा झोंपेचा रोग फक्त आफ्रिका

खंडांतच नवीन सुरू झाला आहे असें वर्तमानपत्रकर्ते लिहीत असतात. परंतु कांग्रेसमध्येंसुद्धां हा रोग फार फैलावतो. एकदां वऱ्हाडांतल्या एका प्रसिद्ध सुधारकाचें कांग्रेसमध्यें वक्तृत्व चाललें असतां माझ्या तपकिरीच्या तीन डब्या खपल्या ! असें महत्त्वाचें मेंदट भाषण चाललेलें असतां माझ्या प्रतिनिधिबंधूंनीं झोप घेतली तर हिंदुस्थानचें हित होणार कसें, हा विचार मनांत आणून असला एखादा मेंदट परंतु प्रतिष्ठित बोलणारा उभा राहिला म्हणजे मी आपल्या तपकिरीची डबी घेऊन सगळ्या रांगांमधून फिरत असें. व जे डुकल्या खात असतील त्यांच्यापुढें मी हळूच ती डबी करीत असें. "O! thank you" असें म्हणून ते आपलें सगळें नाक तपकिरीनें बरबटीत असत, परंतु मी पुढे गेलों म्हणजे फिरून डुकल्या खाऊं लागत व कित्येकाचीं पागोटींही पाठीमागें बसणाऱ्यांच्या मांडीवर पडत असत ! हा प्रकार बरोबर नाहीं म्हणून मेंदट वक्ते बोलावयाला येतील तेव्हां रिसेप्शन कमेटीनें आपल्या प्रतिनिधींना या झोपेच्या रोगावरील औषधाच्या डब्या वांटाव्या अशी सूचना करून मीं या कामाकरितां दहा रुपयांचा वर्गणीचा आंकडाही घातला आहे ! परंतु यंदांच तपकिरीच्या डब्या वाटल्या जातील किंवा नाहीं याची शंका असल्यामुळें तुम्ही जातांना आपल्याबरोबर निदान दोनचार तपकिरीच्या डब्या घेऊन जा. कारण, प्रतिष्ठित मेंदट लोक कितीही दळण घालून बसले तरी अध्यक्ष त्यांचें भाषण बंद करण्याकरतां कधींही घंटा वाजवावयाचे नाहींत ! कारण, हे नेहमीं अध्यक्षांच्या टेबलाभोंवतालच्या खुर्च्यांवर कोठें तरी बसलेले असतात ! शिवाय तुम्ही आपल्या खिशांत एक हातरुमाल घेऊन जाण्याला विसरूं नका. कारण, राजेसाहेबांचें आयुष्यचिंतन करावयाचा कोणी ठराव आणल्यास त्या वेळीं अगर वेडरबर्नसाहेबांच्या नांवानें तीन चीअर्स देण्याची वेळ आल्यास "हिप्, हिप्, हूरे !" म्हणून ओरडतांना एकदम रुमाल वर गेला पाहिजे ! आणि त्या वेळीं जर तुमच्यापाशीं हातरुमाल नसला तर तुम्ही देशभक्त कसले ! आपल्यांतील हरदास सांगतात त्याप्रमाणे अशा वेळीं रुमाल फडकवीत हात वर केला नाहीं, तर खाकमांजरी होते ! म्हणून तुम्ही एक हातरुमाल जवळ अवश्य बाळगा. अशा तुह्मांला सांगण्यासारख्या पुष्कळ गोष्टी आहेत, परंतु सध्यां इतक्याच गोष्टी पुरेत. त्या तुमच्या हातून झाल्या तरी तूर्त पुष्कळ देशकार्य होईल.

## स्वतंत्रतेसाठीं आत्मयज्ञ : : : १२

काळ : अग्रलेख, ता. २८-१२-१९०६

स्वित्झर्लंडच्या स्वतंत्रतेच्या इतिहासांतील कांहीं भाग आम्हीं नुकताच प्रसिद्ध केला आहे. तो मुख्यत्वेंकरून स्वित्झर्लंडमधील पहिल्या तीन कँटन्सच्या कटाचा इतिहास आहे. परंतु तेथील लोकांत जी स्वातंत्र्याची प्रीति दिसून आली तीच स्वित्झर्लंडमधील इतर प्रांतांतीलही लोकांच्या अंगामध्यें भरलेली होती. सभोंवतालची परिस्थिति, लहानपणचें शिक्षण, वडील माणसांचे विचार, वाचावयाला मिळणाऱ्या पुस्तकांचें धोरण, वगैरे सर्व गोष्टींनीं तिकडील लोकांच्या मनांत स्वातंत्र्याची निस्सीम भक्ति उत्पन्न झालेली असते. आपल्या इकडील अतिशय प्रेमळ अशा भगवद्भक्तांची प्रत्यक्ष भगवंतावरदेखील भक्ति नसेल इतकी तिकडील लोकांची स्वतंत्रतेच्या कल्पनेवर भक्ति जडलेली असते. त्या स्वतंत्रतेसाठीं ते पाहिजे तें करण्याला तयार होतात; किंबहुना, ते आपले प्राणही देण्याला मागेंपुढें पाहत नाहींत. आणि यामुळेच त्यांनीं ज्या स्वतंत्रता-देवीची इतक्या निस्सीमपणें आजपर्यंत उपासना केली आहे, ती त्यांच्यावर सदोदित सुप्रसन्न होऊन राहिली आहे. तिकडील यःकश्चित् लोकांतसुद्धां स्वतंत्रतेची प्रीति किती भरलेली असते हें झूरिचच्या इतिहासांतील एका लहानशा गोष्टीवरून चांगलें लक्षांत येण्यासारखें आहे. झूरिच हा स्वित्झर्लंड-मधीलच एक भाग आहे. हा प्रांत बाकीच्या प्रांतांच्या कटांत सामील होण्याच्या पूर्वी तेथील सामान्य लोक आणि सरदार लोक यांच्यामध्यें तंटे होत. या वरिष्ठ सरदारांचा जुलूम सामान्य लोकांना असह्य होऊन त्यांनीं तेथील

सर्व राजकीय सत्ता आपल्या हातांत घेतली होती. पण साळी, कोष्टी, तेली, तांबोळी वगैरे सामान्य लोकांचें वर्चस्व झालेलें सरदार लोकांना पाहवत नव्हतें. आणि म्हणून त्यांची सत्ता मोडून टाकण्याविषयीं त्यांचे गुप्त बेत चालले होते. रोडाल्फ ब्रॉन हा लोकपक्षाचा पुढारी होता, व त्यानें आपल्या प्रांताची व्यवस्था चांगल्या रीतीनें चालवली होती; व झूरिचमधील सर्वसामान्य लोक त्याजवर प्रीति करीत असत. त्याच्या ताब्यांतील झूरिच शहराला एकदां आग लावून टाकण्याचाच सरदारांनीं घाट घातला होता; परंतु तो बेत उघडकीस येऊन फसला. नंतर सरदारांनीं आपल्या पक्षाची जमवाजमव करून तें शहर हस्तगत करून घेण्याचा दुसरा एक गुप्त प्रयत्न आरंभिला; आणि एके दिवशीं संध्याकाळीं सुमारें सातशें यात्रेकरू लोक झूरिच शहरामध्यें शिरले. हे खरोखर यात्रेकरू असतील असें समजून कोणी त्यांच्याकडे लक्ष दिलें नाहीं. परंतु कांहीं वेळानें त्यांच्याबद्दल शहरांतील लोकांना संशय येऊं लागला, व हे सरदारांच्या पक्षाकडील गुप्त कटवाले आहेत अशीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं. ती गुप्त बातमी एका होडीवाल्याला कळली, व दुसऱ्या कांहीं कारणानें असाच संशय एका रोटीवाल्याच्या दुकानांतील एका नोकराला आला. हे जरी साधारण इसम होते, तरी त्यांना आपल्या प्रांताच्या स्वतंत्रतेची किंमत पूर्णपणें कळत होती. त्यांनीं ताबडतोब ती बातमी शहरचा मुख्य अधिकारी आणि लोकपक्षाचा मुख्य नायक जो रोडाल्फ ब्रॉन त्याला कळविली. शहरचा जो मुख्य म्युनिसिपल हॉल होता त्याजवर रात्रीं एक वाजतां हल्ला करून तो काबीज करण्याचें कटवाल्यांनीं ठरविलें होतें व ती वेळ अगदीं जवळ येत चालली होती. कटवाले हल्ला करण्याला आणि लोकांची कत्तल उडविण्याला आपल्या म्यानांतील तरवारी बाहेर काढून अगदीं सज्ज होऊन बसलेले होते. एका क्षणाचाही विलंब उपयोगी नव्हता. थोडा उशीर झाला तर झूरिचची स्वतंत्रता तेथील लोकांच्या हातून चालली होती. अशा वेळीं रोडाल्फ ब्रॉन एका चाकरानिशीं घरून निघून म्युनिसिपल हॉलमध्यें येऊन पोंहोचला. त्यानें तेथें येऊन शहरांतील लोकांना जागे करण्याकरतां तेथील घंटा वाजविण्याला सुरवात केली. घंटेचा घणघण आवाज शहरांत चोहोंकडे पसरूं लागल्याबरोबर सर्व लोक जागे होऊन म्युनिसिपल हॉलमध्यें जमा झाले. रोडाल्फ ब्रॉन यानें त्यांना आपल्या स्वतंत्रतेवर कोणतें संकट प्राप्त झालें आहे तें समजावून

सांगितलें; त्याबरोबर आपल्या स्वतंत्रतेच्या संरक्षणासाठीं ते हातांत तरवारी घेऊन लढण्याला तयार झाले. इकडे कटवाले लोक प्रथम रोडाल्फ ब्रॉन याच्या घराकडे गेले. परंतु तो घरीं नाहीं असें समजल्यानंतर ते सर्वजण म्युनिसिपल हॉलमध्यें आले. तेथें शहरांतील लोक त्यांचा समाचार घेण्याला तयारच होते. एकमेकांनीं एकमेकांना पाहतांच तरवार चालू झाली. जुलमाच्या शरीरावर स्वतंत्रतेच्या हत्यारांचे घाव पडूं लागले. एकमेकांवर आपटणाऱ्या तरवारी खणखण वाजू लागल्या. रक्ताचे पूर वाहण्याला सुरवात झाली. वीरश्रीच्या आरोळया उठूं लागल्या; आणि लढणारे योद्धे जखमा लागून जमिनीवर पडूं लागले. लोकपक्षाकडील योद्धे या प्रसंगी जरी अतिशय निकरानें लढत होते तरी त्यांना खात्रीनें जय मिळेल असा संभव नव्हता. परंतु इतक्यांत शहरांतील खाटिक लोकांचे थवे ही बातमी ऐकून धांवत आले. दुसऱ्या दिवशीच्या बाजारांत लोकांना मांस पुरवण्याकरतां जनावरें कापण्याचें त्यांचें काम चाललें होतें. तेच जनावरांच्या रक्तानें लाल होऊन थबथबत असलेले सुरे हातांत घेऊन ती खाटिक लोकांची टोळी आपल्या स्वतंत्रतेच्या शत्रूवर धांवून येऊन तुटून पडली, व तिनें जनावरांप्रमाणें शत्रूचीं माणसें कापून काढण्याला सुरवात केली. शत्रूवर असा दोहोंकडून मारा चालू झाल्याच्या योगानें त्यांची दाणादाण होऊन ते पळून गेले, व झूरिचच्या लोकांची स्वतंत्रता कायम राहिली.

पण ही गोष्ट एवढ्याचकरतां तेथें सांगितलेली नाहीं. यांतील मुख्य रहस्य निराळेंच आहे. ही झूरिचची स्वतंत्रता या वेळीं कोणी राखली ? त्याचा उल्लेख अद्यापि झालाच नाहीं. खाटिक लोकांच्या टोळीच्या शौर्याची कोणी प्रशंसा करतील; आणि बहुतेक लोक रोडाल्फ ब्रॉन याला सगळें श्रेय देतील. पण वास्तविक तें श्रेय यांपैकीं कोणाचेंच नाहीं. रोडाल्फ ब्रॉन हा जेव्हां त्या गुप्त कटाची बातमी ऐकून आपल्या घरून म्युनिसिपल हॉलकडे जाण्याकरतां निघाला, तेव्हां त्यानें आपल्याबरोबर एक नोकर घेतला होता. या नोकराकडे झूरिचच्या स्वतंत्रतेचें सर्व श्रेय आहे. रोडाल्फ ब्रॉन आणि त्याचा चाकर हे जेव्हां घरांतून निघाले तेव्हां चाकरानें आपल्या धन्याला एकमेकांचे पोषाख बदलण्याविषयीं सुचविलें. चाकर म्हणाला : " तुमचा पोषाख मला द्या आणि माझे कपडे तुम्ही घाला. कारण वाटेनें अपघात होण्याचा संभव आहे. शत्रु तुम्हांला मारण्याकरतां टपून बसलेले असतील. त्यांच्या हातीं तुम्ही

सांपडला तर आपल्या शहराची स्वतंत्रता संपलीच. मी मेलों तर त्यांत कांहीं मोठेंसें नाहीं. माझा देह स्वतंत्रतेच्या कामीं उपयोगास येईल!" असें म्हणून त्यानें आपले कपडे काढून धन्यापुढें ठेवले. रोडाल्फ ब्रॉन यानें त्या वेळचा प्रसंग पाहून ते कपडे आपल्या अंगावर घातले व आपला पोषाख त्याला दिला व दोघेजण रात्रीचे म्युनिसिपल हॉलकडे जाऊं लागले. ज्यानें नोकराचा पोषाख घातला होता तो सुरक्षितपणें म्यु. हॉलमध्ये जाऊन घंटा वाजवूं लागला. परंतु ज्याच्या अंगावर झूरिचच्या अध्यक्षाचा पोषाख होता त्याची काय वाट झाली? हाच रोडाल्फ ब्रॉन असें समजून शत्रूंनीं त्याचे तुकडे तुकडे करून टाकले! परंतु त्या तुकड्यांनी रोडाल्फ ब्रॉनला व झूरिचच्या स्वतंत्रेला वांचविलें. यःकश्चित् नोकर लोकांच्या मनांतसुद्धां स्वदेशाच्या स्वतंत्रतेच्या कल्पनेचीं पाळेंमुळें इतकीं खोल गेलेलीं होतीं, म्हणूनच त्या देशांतील लोकांना स्वतंत्रतेच्या मधुर फळांचा रसास्वाद घेण्याला सांपडत आहे. बाळाजी विश्वनाथ पेशवे दिल्लीहून चौथाईच्या आणि सरदेशमुखीच्या सनदा घेऊन दक्षिणेत येत असतां वेषांतर करून त्यांचें संरक्षण करणारे स्वतंत्रताप्रिय लोक महाराष्ट्रात होते तोंपर्यंत महाराष्ट्रही स्वतंत्र होतें. परंतु आतां त्याचें काय! जेथें निमकहराम लोक उत्पन्न होऊं लागले, तेथें गुलामगिरीच नांदली पाहिजे!

---

# सह्याद्रीच्या तावडींत सांपडलेली कल्पनाशक्ति : १३

काळ : अग्रलेख, ता. ७-९-१९०६

● हा पर्वत परमेश्वरानें हिंदुस्थानला हिंदुस्थानच्या स्वतंत्रतेकरितां दिला आहे.

प्रातःकाळची वेळ होती; आणि उन्हाळा संपून पावसाळ्याचे दिवस सुरू झाले होते. अशा एके प्रसंगीं कोणी एक कल्पनाशक्ति सह्याद्रीच्या उंच शिखरां-मधून परिभ्रमण करीत असतां त्या ठिकाणीं तिला कित्येक सुविचार सुचूं लागले. पर्वतांचे उच्च शिरोभाग हे बहुधा सर्व उच्च वस्तूंचे गर्भाशय असतात. स्वच्छ पाण्याचे झरे पर्वताच्या शिखरांवर उगम पावतात, आणि शुद्ध व दोष-रहित वारे पर्वतांच्या अग्रभागावरील वृक्षवाटिकांमधूनच निर्माण होतात त्या-प्रमाणें निर्मळ, उदात्त, आणि सात्त्विक विचारांचेंही जननस्थान असल्याच पर्वतांच्या शिरोभागांवर पुष्कळ वेळां आढळून येतें. अशा रीतीनें सह्याद्रीच्या भव्यपणापासून निसर्गनियमानुसार कल्पनाशक्तीला कांहीं सुविचार सुचूं लागले असतां ते आपल्या अंगच्या प्रतिभेमुळेंच आपल्याला सुचत आहेत असें वाटून त्या विचाराना "कल्पनाशक्तीच्या तावडींत सांपडलेला सह्याद्रि" असें नांव देण्याची त्या कल्पनाशक्तीनें योजना केली. परंतु हें नांव किती अयथार्थ झालें असतें! मन हें अणुपरिमाण मानलें तर ह्या मनांतील कल्पनाशक्तीच्या वांटणी-ला अणूचा विभाग शक्य असेल तर कितवा येईल, याची कल्पनाही करणें अशक्य आहे. ह्या कल्पनाशक्तीच्या तावडींत असंख्य परमाणूंनीं बनलेला सह्याद्रि सांपडला, अशी मनाची समजूत करणें अगदीं गैरशिस्त आहे. आपल्या

तावडींत ह्या वेळीं सह्याद्रि सांपडला आहे, असें एक वेळ कल्पनाशक्तीला वाटलें खरें, पण तिची ती समजूत लवकरच नाहींशी झाली. त्याच पर्वताच्या दरींतील वाळलेलीं झाडांचीं पानें ज्याप्रमाणें सोसाट्याचा वारा गरगर फिरवीत होता, त्याप्रमाणें हा पर्वत आपली अवस्था करून सोडीत आहे, अशी तिची खात्री झाली. तेव्हां तिनें "सह्याद्रीच्या तावडींत सांपडलेली कल्पनाशक्ति" हेंच नामाभिधान कायम केलें. अशा स्थितींत सांपडलेल्या कल्पनाशक्तीनें आपल्या निरनिराळ्या सुविचारांना एका ठिकाणीं आणण्याचा प्रयत्न केला होता. परंतु बारीक दोरा तुटून गेल्यामुळें सगळे मणि विस्कळित झाले आहेत. ते ओघळत ओघळत जसे आले तसे ते पुढें पडले आहेत.

ग्रीष्मऋतूचीं चिन्हें पुरीं नाहींशीं झालेलीं नव्हतीं; आणि वर्षाऋतूचीं सर्व लक्षणें पूर्णपणें प्रादुर्भूत झालेलीं नव्हतीं; अशा संधींत सह्याद्रीच्या रांगेंतील एके ठिकाणीं मोठा चमत्कार चाललेला होता. शंकराचीं स्वयंभू स्थानें बहुतेक पूर्वीं जमिनींत झांकलेलीं असतात व त्यांवरील माती काढून मग तीं लोकांत प्रख्यातीस येतात. परंतु या ठिकाणीं जें स्वयंभू थान दिसत होतें तें फारच अद्‌भुत होतें. आपल्यावरची माती बाजूला फेकून देऊन हें शंकराचें उग्र स्वरूप आपण होऊनच आपलें वसतिस्थान जें आकाश तिकडे जात आहे कीं काय असें वाटत होतें. सह्याद्रीचें एक मोठें थोरलें भव्य शिखर मध्येंच उंच आकाशामध्यें गेलेलें होतें, आणि त्या तेथील प्रशांतगंभीर प्रदेशाच्या जादूनें भरलेल्या मनानें त्याच्याकडे पाहिलें म्हणजे ही प्रत्यक्ष शंकराची मूर्ति कांहीं कारणानिमित्त तपश्चर्या करण्याकरता इकडे एकीकडे येऊन बसली आहे कीं काय असा भास होई. ही कल्पना दृढ होण्याला दुसरेही एक कारण झालें. शंकराच्या जटेमध्यें गंगा वास्तव्य करीत असते, हें सर्वांना विदितच आहे. त्याप्रमाणें या नैसर्गिक महादेवाच्या शिरोभागामधून जें झऱ्याचें स्वच्छ पाणी झुळझुळ वाहत येऊन खालीं पडत होते, त्यावरून तर बिलकुल शंका उरली नाहीं. शिवाय त्या शिखरावरील झुडपांच्या जाळींतून मेलेल्या वाघांचीं कातडीं पडलेलीं होतीं तीं त्या पर्वतशिरोभागानें पांघरलेलीं पाहून शंकराच्या व्याघ्रांबरपरिधानाची आणखीही एक खूण पटली. तेव्हां ही प्रत्यक्ष शंकराचीच मूर्ति येथें अवतीर्ण झाली आहे अशी खात्री होऊन त्या अरण्यांतील आणि त्याच्यावरील आकाशांतलि सर्व वस्तु त्या स्वयंभू स्थाणूची अनेक उपचारांनीं

पूजा करण्याकरितां प्रवृत्त झाल्या. शंकराला संततधार आवडते म्हणून मेघांनीं आकाशांतील पोकळीचें विस्तीर्ण अभिषेकपात्र घेऊन त्यांतून सहस्रधारांनीं त्या अभिषेकप्रिय परमेश्वराच्या मस्तकावर अभिषिंचन करण्याला सुरवात केली. संततधार सुरू झालेली पाहून पर्जन्यकाळामुळें प्रमुदित झालेले अनेक प्रकारचे आणि निरनिराळ्या शाखांमधील जे द्विजगण त्यांपैकीं कित्येक आपआपल्या पर्णासनांवर विराजमान झाले, आणि कित्येक आनंदानें त्या भव्य पर्वतमूर्तीसभोंवतीं प्रदक्षिणा घालूं लागले, व आपल्या सुंदर, मधुर आणि उंच अशा सुरानें ते आपल्या भाषेंत शंकराला अत्यंत प्रिय अशा रुद्राच्या आवर्तनांतील चमक आणि नमक गाऊं लागले. गंधवती पृथ्वीच्या पोटांत जो गंध सांठवून ठेवलेला असतो तो पर्जन्यकाळाच्या प्रारंभीं जणूं काय सगळाच बाहेर पडत असतो. त्या वेळीं पहिल्या पावसानें भिजलेल्या मातीचा सुगंध जिकडे तिकडे पसरून पृथ्वी जणूं काय गंधोद्दामच झालेली होती. तसल्या त्या सुगंधयुक्त पृथ्वीचा कांहीं भाग वाहून येऊन त्या पर्वताच्या मस्तकाला लागला होता. परंतु तें त्या गंधप्रिय गंधर्वाधिपतीला सुगंधयुक्त विलेपनच लाविलें आहे कीं काय, इतकी त्याची विलक्षण शोभा दिसूं लागली. सर्व वनलतांनीं आपआपलीं परम सुवासिक आणि अत्यंत नेत्राल्हादक अशीं पुष्पें त्या स्वयंभू प्रभूच्या मस्तकावर समर्पण करण्याकरितां आपले करपल्लव उंच उभारले. आसआसच्या दऱ्यांतून धुक्याचे लोट हळूहळू हवेच्या मऊ अंथरुणावरून लोळत लोळत वर येत होते; ते या भव्यमूर्तीच्या समोर आल्याबरोबर मंत्र म्हणून त्या दऱ्यांनीं " धूपोऽयं प्रतिगृह्यताम् " अशी त्या मूर्तीची अत्यंत नम्रपणानें प्रार्थना केली. आकाशांतून जमिनीवर आणि फिरून जमिनीवरून आकाशांत अशी वर, खालीं, इकडे, तिकडे, चहूंकडे, सारखी चमकणारी प्रत्यक्ष वीज या मूर्तीच्या भोंवतीं पंचारती ओवाळूं लागली. तसेंच या पूजेनिमित्त सूर्याचा नंदादीप पाजळण्यांत आला; परंतु त्या वेळीं वारा अतिशय सुटला असल्यामुळें कदाचित् तो जाईल म्हणून एका पातळ ढगाच्या पडद्याच्या आड त्याला पूर्वेच्या आंगच्या एका कोंपऱ्यांत बाजूला ठेवून दिलें होतें. आकाशमंडपामध्यें मेघगर्जनेचे चौघडे झडूं लागले, हवेमध्यें पक्ष्यांच्या किलकिलाटाच्या सुस्वर सनया वाजूं लागल्या, आणि जिकडे तिकडे सुप्रसन्नता दिसूं लागली. अशा रीतीनें त्या सृष्टींतील अनेक वस्तूंनीं त्या मूर्तिमंत. सृष्टि-

देवतेची चालविलेली महापूजा पाहून कल्पनाशक्ति एकाग्र भक्तिभावानें ओत-प्रोत भरून गेली, आणि अत्यंत दीन होऊन तिनें अतिशय विशाल अशा या विश्वरूपापुढें साष्टांग प्रणिपात घातला, आणि ब्रह्मापासून तों स्तंबापर्यंत जें चैतन्य सर्वत्र पसरून राहिलें आहे त्यामध्यें ती एक क्षणभरपर्यंत तल्लीन आणि तन्मय होऊन गेली. त्या वेळीं कल्पनाशक्ति जेथें होती तो स्वर्ग लोक ! आणि त्या क्षणांत तिनें जें कांहीं पाहिलें तोच परमेश्वर !

अशा उदात्त आणि रम्य प्रदेशामध्यें जो कोणी जाईल तो कवि होऊन माघारा येईल. अशीं ठिकाणें हीं कवितेच्या वास्तव्याचीं ठिकाणें होत. या ठिकाणीं परमेश्वरानें आपल्या हातानें मोठमोठ्या अक्षरांनीं सुंदर काव्यें लिहून ठेविलेलीं आहेत. तेथें जावें आणि तीं वाचावीं. आंधळ्या मनुष्याला या जगांत जर कांहीं खरें दुःख असेल तर तें हेंच कीं, त्याला या अपौरुषेय वेदांतील ऋचा आपल्या डोळ्यांनीं वाचतां येत नाहींत. अशा ठिकाणांतून जे लोक नेहमीच राहतात ते धन्य होत. आपण एखादे वेळीं तेथे गेलों तर आपल्याला इतका आनंद होतो, मग जे लोक नेहमीं त्या अप्रतिम देखाव्यांचा उपभोग घेत असतात त्यांचें भाग्य काय वर्णावें ! ते सृष्टिदेवतेचे खरे खरे उपाध्ये होत. ते सृष्टिदेवतेची प्रातःकाळची अपूर्व टवटवी पाहतात, ते सायंकालचा शांतपणा आपल्या शांत अंतःकरणामध्ये सांठवून घेतात, आणि मध्यान्ह रात्रीं कदाचित् आपल्या चुकलेल्या गाईला किंवा वांसराला शोधण्याकरितां जातां जातां मध्येंच लागलेल्या एखाद्या उंच कड्यावर क्षणभर उभें राहून आपल्या-सभोंवतीं सृष्टिदेवता गाढ आणि स्वस्थ झोपेचा अनुभव घेत असलेली पाहतात ! असे जे लोक तेच सृष्टिदेवतेचे खरे उपासक. स्वच्छ झऱ्यांतील अमृत हें ज्यांना पाणी, निसर्गपरिपक्व फळे हे ज्यांचे अन्न, मेघ ही ज्यांची छत्री, वारा हा ज्यांचा पंखा, गाई आणि वांसरें हे ज्यांचे आप्तवर्ग, झाडांचीं तरुतलें हीं ज्यांचीं वसतिगृहें, तृणभूमिका ही ज्यांची सुखशय्या, आणि चंद्र व नक्षत्रें हे ज्यांचे दिवे, त्यांना स्वर्गामध्यें देव याहून सुख काय देऊं शकणार आहे ? अशा भव्य आणि अद्भुत देखाव्याच्या मध्यभागीं बसून तेथील रहिवासी लोक जेव्हां आपलें गोड गोड भोजन सेवीत असतात, तेव्हां त्यांना पुष्कळ वेळ भ्रम पडतो, मध्येंच तें खाण्याचें विसरून जातात, आणि आसमंताद्भागीं पसरलेल्या दिव्य सृष्टीची अनुपमेय शोभा पाहण्यामध्यें ते तल्लीन होऊन

जातात, व आपल्या पुढें गोड पदार्थ आहेत ते खावे, किंवा ही गोड सृष्टि घटा-घटा पिऊन टाकावी, असें त्यांना होऊन जातें. अशा ठिकाणीं कोणी एखादे उत्कृष्ट कवीचे उत्कृष्ट ग्रंथ वाचीत बसतील, त्यांना हें आपल्या हातांतील पुस्तक वाचूं किंवा हें परमेश्वराचें पुस्तक वाचूं, अशा गोंधळांत क्षणभर पडल्यासारखें वाटून सर्व पुस्तकें वाचण्याचें जें श्रेय तें त्यांना येथें प्राप्त होत असलें पाहिजे. कवीच्या काव्यातील कठिण स्थळें या ठिकाणीं बसून विचार केल्यास सहज उकलतात, आणि तत्त्वज्ञानाच्या पुस्तकांतील गूढ तत्त्वें या ठिकाणीं सुलभ होऊन जातात.

देव पहिल्या दिवसापासून हें जग निर्माण करीत करीत हिंदुस्थानच्या किनाऱ्यापर्यंत येऊन ठेपला, व तेथें त्यानें बहुतेक हिंदुस्थान स्थापलें. नंतर देवानें हातांत एक मातीचा गोळा घेतला, आणि तो एकीकडे एका हातानें झेलीत झेलीत विचार करूं लागला, व त्याची मुद्रा सचिंत झाली. सर्व लोक म्हणूं लागले कीं, देवाला इतकी काळजी कसली पडली आहे! परंतु हा मातीचा गोळा कोठें ठेवावा अशा विवंचनेमध्यें देव होता. देवानें मनांत असा विचार केला कीं, हिंदुस्थानच्या उत्तरेस हिमालय पर्वत आहे, तेव्हां तिकडून हिंदुस्थानाला भीति नाहीं. आणि दक्षिणच्या बाजूनें टोंक चिंचोळें आणि निमुळतें करून हिंदुस्थानाला आपण दक्षिणची बाजूच ठेविली नाही. तेव्हां आतां हा आपल्या हातांतील गोळा टाकावा कोणत्या बाजूला? पूर्वेच्या बाजूला टाकावा तर परराज्य लोलुप असे लोक त्या दिशेला कोणीही नाहींत! तेव्हां हा गोळा तिकडे व्यर्थ खर्चीं घालण्यांत हंशील नाहीं. असा सगळा विचार करून परमेश्वरानें आपल्या हातांतील मातीच्या गोळ्याचा हिंदुस्थानच्या सबंध पश्चिम किनाऱ्यावर बांध घातला. आणि त्यालाच पुढें तीन-साडेतीन हात उंचीचे लोक सह्याद्रि पर्वत असें म्हणूं लागले! हा पर्वत परमेश्वरानें हिंदुस्थानाला हिंदुस्थानच्या स्वतंत्रतेकरितां दिला आहे. हा स्वतंत्रतेचा पर्वत आहे. हिंदु-स्थानच्या स्वातंत्र्याच्या किल्ल्याला पश्चिमच्या बाजूनें सह्याद्रीसारखी तटबंदी आणि त्याच्यापुढें समुद्रासारखा पाण्यानें भरलेला खंदक असतांना हिंदु-स्थानाला कालत्रयींही भीति नसावी अशी परमेश्वराने सृष्टिरचनेच्या वेळीं उघड उघड योजना करून ठेविलेली होती. या सह्याद्रीच्या डोक्यावरून आपण चोहींकडे दृष्टि फेंकीत जर त्याच्या रांगांवरून फिरत गेलों तर ठिकठिकाणचे

वर चढण्याला अशक्य असे तुटलेले कडे, दबा धरून बसण्याला सोईच्या अशा दऱ्या, लाखों लोकांच्या सैन्याला दडून बसतां येण्यासारखीं दाट अरण्यें, एक रांग हस्तगस्त झाली असतां तिच्या मागे तयार करून ठेविलेल्या जास्त उंच तटबंदीच्या भिंतीवर जाऊन मारा करण्याकरितां सोईच्या केलेल्या जागा या गोष्टी जेव्हां आपल्या दृष्टीस पडतात, तेव्हां परमेश्वराच्या कृपेची बरोबर कल्पना आपल्या मनामध्यें येते. परमेश्वरानें हा पर्वत अगदीं बरोबर जेथून भय होतें तेथेंच नेमका ठेविला होता. पण पर्वत काय करणार? जेथें माणसें फितूर होतात, तेथें जे बिचारे बोलून चालून दगड त्यांनीं काय करावें? आपल्या गुलामगिरीला आत घेण्याकरितां कालिकतचे दरवाजे प्रथम माणसांनीं उघडले. एवढा उंच सह्याद्रि पर्वत रचण्याची देव खटपट करीत बसला त्याच्यापेक्षां त्यानें असलीं माणसें हिंदुस्थानांत निर्माण केलीं नसतीं तर त्याच्या हेतूचें जास्त चीज झालें असतें. पण प्रत्येक देशांतील लोक आपापल्या देशाबद्दल अभिमानी असतीलच, अशा समजुतीवर देव गेला! पण तसें नाहीं! हिंदुस्थानांत स्वदेशद्रोही लोक आहेत. आणि त्यामुळें सह्याद्रीसारख्या भिंतीचीही उंची ठेंगणी झाली आहे, आणि मजबुती कमकुवत होऊन गेली आहे. तरी पण परमेश्वराचे हेतु सर्वथैव विपरीत कधीही होऊं शकणार नाहींत. जो स्वतंत्रतेचा पर्वत म्हणून परमेश्वरानें निर्माण केला, त्यानें हिंदुस्थानच्या अर्वाचीन इतिहासांत नुकतीच एकदां स्वतंत्रतेची कामगिरी बजाविलेली आहे. शिवाजीमहाराजांचे मावळे हे याच पर्वताच्या पोटामधून बाहेर पडले, आणि यांच्याच वंशजांनीं स्वतंत्रतेचे झेंडे चंदीचंदावरपासून अटकेच्या अटकेपर्यंत नाचविले. ज्याच्या पोटांत असली प्रजोत्पत्ति करण्याचें सामर्थ्य आहे त्याच्या पोटांतून फिरूनही कदाचित् तसलीच प्रजा निर्माण होणार नाहीं म्हणून कशावरून? परमेश्वराची लीला अगाध आहे!

या स्वतंत्रतेच्या पर्वताला आपल्या सभोंवतालची स्थिति पाहून खात्रीनें अतिशय वाईट वाटत असलें पाहिजे. प्रतापगड, रायगड, तोरणा, राजगड, सिंहगड वगैरे ठिकाणचें पूर्वकालीन राजांचें वैभव आणि स्वतंत्रतेचें सामर्थ्य नाशाप्रत गेलेलें पाहून यांचीं उंच उंच शिखरें अतिशय खिन्न होतात, आणि झऱ्यांच्या विशुद्ध पाण्याच्या रूपानें त्यांच्या डोळयांतील अश्रु टपटप खालीं गळत असलेले प्रवासी लोकांच्या नेहमीं नजरेस पडतात! मी स्वतंत्रतेचा

पर्वत; परंतु हल्लीं मी परतंत्रतेंत आहे, असें पाहून वणव्याच्या रूपानें या पर्वताचें हृदय जळत असते. आणि स्वतंत्रतेच्या दरवाजावरील आपल्या रखवालदारीचा कांहीं उपयोग झाला नाहीं ही गोष्ट मनांत आणून तो पर्वत सोसाट्यानें वाहणाऱ्या वाऱ्याच्या मिषानें रात्रंदिवस दुःखाचे दीर्घ श्वास टाकीत असतो. तो आपल्यावरील दगडांना आणि कंटकांना म्हणतो कीं, " हे दगडांनो, दुष्ट लोक दुसरीकडे, आणि तुम्ही येथें पडून काय करतां ? हे कंटकांनो, कांट्यानें कांटा काढावा म्हणून ज्या तुमची उत्पत्ति, ते तुम्ही येथें निरुद्योगी काय बसलां ? " अशा अनेक रीतींनीं हा स्वतंत्रतेचा पर्वत गेलेल्या स्वतंत्रतेबद्दल विलाप करीत असतो !

परंतु त्याला विलाप करण्याचें कांहीं कारण नाहीं, तो स्वतंत्रच आहे, आणि तो आपल्या छायेखालील लोकांनाही स्वतंत्रतेचे धडे शिकविल्यावांचून कधींही राहावयाचाच नाही. जेथील पक्षी स्वतंत्रतेचीं राष्ट्रगीतें गात असतात. आणि जेथील झऱ्यांतून स्वतंत्रतेच्या विचारांचे परमाणु वाहत येत असतात त्याच्या आश्रयाखालील लोकांच्या अंतःकरणामध्ये तत्समान धर्म उत्पन्न न होणें अशक्य आहे. आणि शिवाय जेथें मनुष्याचें मन परमेश्वरापाशीं सारूप्य पावून अद्वितीय स्वतंत्रतेचा अनुभव घेतें, तेथें ही ऐहिक स्वतंत्रता प्राप्त होण्याबद्दल अशक्यता ती काय आहे ? जेथे आकाशांतील देवदूत खालीं उतरतात आणि जेथून पृथ्वीवरील निवृत्तिपर मनुष्ये आकाशाच्या पायऱ्या चढूं लागतात, जेथे पृथ्वीवरही गंधर्वांचें सुस्वर गायन ऐकूं येतें आणि जेथील साध्याभोळ्या शेतकऱ्यांचीं प्रेमळ आणि भाविक गाणीं आकाशांतील रहिवाश्यांना ऐकूं येतात, व जेथें आकाशांतील नक्षत्र जवळपणामुळें मोठीं दिसतात, आणि जेथील गरीब लोकांच्या घरांतील दिव्यामुळें पृथ्वीवरही नक्षत्रें आहेत कीं काय, असा नभोमंडळांतील ज्योतिष्यांना भास होतो, इतकीं जीं उंच शिखरें, तेथें मन रमल्यानंतर साहजिकपणें त्याला या खालच्या नीच, अधम, अमंगळ, मत्सरानें भरलेल्या, कलहानें पेटलेल्या, दुःखानें व्यापलेल्या, आणि जुलमानें गांजलेल्या जगाचा वीट येऊन तें निर्मल, निष्कलंक, आणि निरंजन अशा परमेश्वराच्या चरणीं लीन झाल्यावांचून कधींही राहावयाचें नाहीं !

---

## कांहीं लष्करी गोष्टी : : : १४

काळ : अग्रलेख, ता. १८-१-१९०७

चित्राळची लढाई प्रथम सुरू झाली तेव्हां तेथील मेहेतरचें सैन्य आणि इंग्रजी सैन्य यांची एक लहानशी चकमक होऊन इंग्लिशांचा पराभव झाल्यानंतर इंग्लिशांच्या सैन्यानें चित्राळच्या किल्ल्याच्या आश्रय धरिला आणि त्या किल्ल्याला चित्राळच्या पठाण लोकांनी बाहेरून वेढा घातला. किल्ल्यांत सरासरीनें साडेपांचशें लोक सांपडले होते. किल्ला ज्या जमिनीवर बांधलेला आहे ती जागा कांहींशी खळग्यांत आहे आणि किल्ल्याच्या सभोंवतीं टेकड्या असून तेथून किल्ल्यांतील सर्व भाग दिसण्यासारख्या आहे. या टेकड्या शत्रूंनीं आपल्या ताब्यांत घेतल्या होत्या. झांशीच्या किल्ल्याची १८५७ सालांत अशीच स्थिति होती. बंडवाले लोक किल्ल्यांत काय करतात हें इंग्रजी ऑफिसर बाहेरून दुर्बिणी लावून सर्व पाहत होते. बंडवाल्यांचे सर्व बेत आणि हालचाली त्यांच्या शत्रूंना दिसत होत्या, आणि त्यामुळें त्यांचा प्रतिकार करण्याला इंग्लिशांना फारसें जड गेलें नाहीं. अशी जेव्हां किल्ल्याची स्थिति असते तेव्हां त्याच्यावर कांहीं तरी उपाय योजणें अवश्य असतें. चित्राळच्या किल्ल्यांतील इंग्लिश लोकांनीं किल्ल्यांत जिकडे तिकडे कॅनव्हसचीं छतें लावून दिलीं होतीं. आणि त्यांतील हेतु हा कीं, बाहेरच्या टेकडीवरील शत्रूला आपण आंतमध्यें काय करीत आहों हे कोणत्याही रीतीनें जाणतां येऊं नये. किल्ल्याच्या भिंतीच्या बाहेर ज्या कांहीं बारीकसारीक इमारती होत्या त्या इंग्लिशांनीं पाडून टाकल्या. नाहीं तर त्यांचा आश्रय धरून किल्ल्यांतील लोकांना त्रास देण्याची शत्रूला संधि सांपडली असती. किल्ल्याच्या

जवळच नदी आहे, आणि त्या नदीपासूनच किल्ल्यांतील लोकांना पाण्याचा पुरवठा व्हावयाचा होता. परंतु उघड्या जागेवरून तेथें पाण्याला गेल्यास शत्रु आपल्या बंदुकीचा मारा करतील ह्या भीतीस्तव किल्ल्यांतून जमिनींतून नदीपर्यंत इंग्लिशांनीं एक झांकलेला रस्ता तयार केला होता; व त्या रस्त्याला जमिनीच्या वर ज्या भिंती घातल्या होत्या त्यांतून शत्रूवर गोळीबार करण्याकरितां भोकें ठेवलेलीं होतीं. किल्ल्याच्या भिंती मातीच्या आणि लाकडाच्या अशा मिळून बांधलेल्या होत्या. पैकीं लाकडी भागाला शत्रु आग लावतील अशी भीति होती. आणि म्हणून ठिकठिकाणीं पहारा करण्याकरितां पिकेट्स ठेविलीं होतीं व जेथें जेथें आग लावण्याचा संभव होता तेथें तेथें पाण्याचीं टिपें आणि मातीचीं पोतीं भरून ठेवलेलीं होतीं. आणि भिस्ती लोक झोपीं गेले तरी त्यांची मशक त्याच्या उशागती पाण्यानें भरलेली असे. तसेच किल्ल्याच्या कांहीं भागावर शत्रूचा रात्रीच्या वेळीं हल्ला येण्याचा जेथें संभव होता तेथें धक्के बांधून त्याच्यावर साऱ्या रात्रभर मोठा विस्तव पेटवून ठेविलेला असे. त्यांतील हेतु असा कीं, रात्रीच्या काळोखांत लपून छपून शत्रूला किल्ल्याच्या जवळ येतां येऊं नये. इंग्लिशांनीं ही जशी तयारी चालविली होती तशीच चित्राळच्या सैन्याचीही बाहेरून तयारी चालली होती. टेकड्या त्यांच्या ताब्यांत होत्याच, तेथून किल्ल्याच्या जवळजवळ जाण्याकरितां त्यांनीं झांकलेल्या वाटा तयार करण्याला सुरवात केली. किल्ल्याच्या भिंतीवर कोणी येऊं नये म्हणून इंग्लिशांकडून नेहमीं किल्ल्यासभोंवतीं गोळीबाराचा फायर सुरूच होता. त्याच्यापासून दगा होऊं नये म्हणून चित्राळी सैन्याला आच्छादनाचे रस्ते बांधणें जरूरच होतें. तसल्या रस्त्यांनीं पुढें जात जात त्यांनीं किल्ल्याच्या सभोंवतीं मोठमोठे संगर रचिले. व एका संगराच्या आसऱ्यामधून दुसऱ्या संगराच्या आसऱ्याखालीं जात जात ते किल्ल्याच्या जवळ अगदीं चाळीस यार्डांवर युक्तियुक्तीनें आले. तेथून किल्ल्याच्या बुरजांना आगी लावण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, परंतु त्यांत त्यांना यश आलें नाहीं. तेव्हां त्यांनीं दुसरी युक्ति काढिली. नवीन युक्त्या प्रसंगानें आणि जुन्या युक्त्यांच्या अभ्यासानें सुचत असतात. आपल्या नेटिव सैन्यांत ताशे, नगारे, वगैरे मोठ्यानें वाजविण्याची चाल आहेच. त्याप्रमाणें एके दिवशीं किल्ल्याच्या अगदीं जवळील अशा एका ठिकाणीं ताशे आणि नगारे यांचा मोठा कडकडाट सुरू झाला; व तो तसाच

पुष्कळ वेळ चालू राहिला. हे ताशे वगैरे कां वाजत आहेत हें इंग्रजी सैन्या-पैकीं कोणाच्याही लक्षांत आलें नाहीं, परंतु पुढें त्यांना संशय आला. आणि नंतर विचार करतां करतां चित्राळी लोकांची युक्ति अमुक अमुक असावी असा तर्क त्यांच्या डोक्यांत शिरला आणि त्याप्रमाणें त्याच्या प्रति-कारासाठीं एक शंभर लोकांची टोळी त्यांनीं पाठविली. ज्या बाजूला ताशे वगैरे वाजत होते त्याच बाजूला इंग्लिशांच्या तोफा डागलेला एक बुरूज होता. तो उडवून टाकण्याचा चित्राळी लोकांचा हेतु होता व त्यासाठीं ते त्याच्या खालपर्यंत भुयार खणून तेथें सुरंग उडविण्याचा प्रयत्न करीत होते. परंतु तो खणण्याचा वगैरे आवाज शत्रूला ऐकूं जाऊं नये म्हणून ताशे वाजत ठेविले होते. ही युक्ति फार अजब होती, परंतु ती सफळ होण्याच्या आधींच इंग्लिशांच्या लक्षांत आली. त्यांच्या लोकांनीं येऊन चित्राळी लोकांना तेथून पिटाळून लाविलें आणि त्यांनीं सुरू केलेली खाण मोडून टाकली. लढाई हा एक बुद्धिबळाचा खेळ आहे ! ज्याच्यापाशीं बुद्धि व बळ, पण विशेषतः बुद्धीचें बळ आहे त्याच्यापासून विजय फारसा दूर नाहीं !

लढाई म्हणजे क्रूरपणाचें घर हें तर खरेंच; परंतु त्या लढाईतसुद्धां पुष्कळ वेळां अनेक प्रकारचे उदात्त मनोविकार दृष्टोत्पत्तीस येतात. उभयपक्षांतील लोक एकीकडे एकमेकांना ठार मारीत असतात आणि दुसरीकडे भाऊ भावा-वरदेखील प्रेम करणार नाहीं असें एकमेकांवर प्रसंगविशेषीं प्रेम दाखवितात. नेपाळच्या लढाईत एक गुरखा शिपाई इंग्लिशांकडे आला. शत्रूकडील बंदुकी-ची गोळी लागून त्याची हनुवटी फुटून गेली होती. आणि त्याचें सर्व अंग रक्तानें भरलें होतें. अशा स्थितींत तो इंग्लिशांकडे आला तेव्हां इंग्लिशांनीं त्याला आपल्या हॉस्पिटलमध्यें पाठवून दिलें. तो औषधोपचारासाठींच आलेला होता, इंग्लिशांनीं ती मदत ताबडतोब दिली. पुढें कांहीं दिवसांनीं बरा झाल्या-वर त्याला जाण्याची परवानगी मिळाली. तेव्हां आपण शत्रूकडील असूनही आपल्याला इंग्लिशांनीं औषधपाणी दिलें, याबद्दल त्यानें इंग्लिशाचे आभार मानले, पण शेवटीं तो असें म्हणाला कीं, "जरी माझ्यापुरता मी तुमचा फार ऋणी आहें, तरी आतां परत आपल्या पलटणींत जाऊन मला तुमच्याविरुद्ध लढलें पाहिजे. खासगी संबंध आणि राष्ट्रीय संबंध हे अगदीं भिन्न आहेत. खाजगी रीतीनें मी तुमचा मित्र आहें. पण माझ्या नेपाळच्या राष्ट्राच्या दृष्टीनें

तुम्ही माझे शत्रु आहां, आणि म्हणून तुमच्याविरुद्ध मला लढलेंच पाहिजे. मी विव्हळ झालों असतां तुम्ही मला बरें केलें हें तुम्ही सत्कृत्य केलें, आणि त्याबद्दल मी तुमचे उपकार स्मरीन. परंतु माझ्यावर तुम्ही जितकें प्रेम दाखविलें आहे तितकें माझ्या देशावर तुम्हीं दाखविलेलें नाहीं. मी जखमी झालों होतों. त्या माझ्या जखमा तुम्हीं नाहींशा केल्या, पण माझ्या देशाला पहिल्या जखमा मुळीच नव्हत्या, त्या तुम्ही त्याला नवीन पाडीत आहां. जसे व्यक्तीवर तुमचे उपकार होतात, तसे देशावर होत नाहींत. तुम्ही व्यक्तींना वांचवितां, परंतु देशांना ठार मारितां. एखाद्या व्यक्तीवर तुम्ही जितके उपकार करता त्याच्या-पेक्षां त्या व्यक्तीच्या अत्यंत प्रियकर देशाच्या स्वतंत्रतेवर शतपटींनीं जास्त अपकार करितां. याकरिता मला आपल्या देशाच्या स्वतंत्रतेसाठीं तुमच्याविरुद्ध लढलेंच पाहिजे." हें त्याचें म्हणणें इंग्लिशांनाही मान्य झालें, व त्यांनीं त्याला आपल्याविरुद्ध लढण्याकरितां जाण्याला मोठ्या आनंदानें रजा दिली, व तोही नेपाळी शिपाई आपल्या छावणींत परत येऊन पुनरपि पूर्ववत् आपल्या देशाच्या स्वतंत्रतेसाठीं शौर्यानें लढूं लागला. असले उदात्त प्रसंग लढायांतून पुष्कळ वेळां दृष्टीस पडतात.

---

## सातारच्या महाराजांचा जाहीरनामा : : १५

काळ : अग्रलेख, ता. १८-१-१९०७

'विविधज्ञानविस्तार' या मासिक पुस्तकांत "ऐतिहासिक टिप्पणें" या सदराखाली अलीकडे कांहीं उपयुक्त माहिती प्रसिद्ध होत असते. त्यापैकीं शारीरिक शिक्षणासंबंधाचा पुढें दिलेला एक उतारा फार बोधप्रद आहे. तो वाचला असतां आपले मराठी राजे आपल्या प्रजेच्या शारीरिक शिक्षणासंबंधानें किती काळजी घेत असत याबद्दलची चांगली कल्पना येते. सातारचे प्रतापसिंहमहाराज यांनीं आपल्या राज्यातील प्रजेला शरीरसामर्थ्याचें महत्त्व कळवून देण्यासाठीं एक जाहीरनामा प्रसिद्ध केलेला आहे. तो येणेंप्रमाणें:—

जाहिरनामा श्रीमन्महाराज राजश्री छत्रपति सरकार राजमंडळ हुजुरून इलाखा सातारा येथील समस्त लोकांस समजण्याकरितां आज्ञा केली ऐसीजे:—हरएक लोकांनीं शरीरें चागलीं तालमीनें तयार राखावी; याचकरितां आपण व आपले मुलास तालीम, कुस्ती, जोर काढणें वगैरे अभ्यास केल्यास शरिरास फार सुखावह आहे, व शरिरास तयारी करावी. हे करणें ब्राह्मण, क्षत्रिय वगैरे कोणत्याही जातवाल्यांनी केल्यास चिंता नाहीं. सर्वांनीं करावें. म्हणजे शरिरें चांगली होतील. ज्याची जितकी शक्ति तितकेंच त्यानें खाऊन शरिरास नीट राखावें. सदरहूप्रमाणें मेहनत करून जे तयार होतील त्या एकेकानें स्वारी पेट्यास जमाबंदसमयीं येते, तेव्हां मामलेदार यांस रुजू व्हावें, म्हणजे सरकारांत कळवितील. सरकारचे समक्ष पाहाण्यांत येतील व ज्यांनीं तयारी

चांगली केली त्यांजवर खूष होऊन सरकार कांहीं मेहेरबानी करतील. हें सर्वांनीं समजून सदर लिहिल्याप्रमाणें करीत जावें. हें सर्वांस महशूर होण्या-करितां हा जाहीरनामा सादर केला असे. जाणिजे. चंद्र ७ जिल्हेज सुंग खम्मस सल्लसीन मयातेन व आलफ. मु. तारीख ६ एप्रिल सन १८३५ इसवी. मोर्तब."

जेथें स्वतंत्रता आहे तेथील राजे आपल्या लोकांना अशींच उत्तेजनें देत असतात. खुद्द इंग्लंडांत लोकांनीं निशाण मारण्याला शिकावें म्हणून किती तरी प्रयत्न चालले आहेत. परंतु हिंदुस्थानांत मात्र आतां तशीं उत्तेजनें मिळ-ण्याचे दिवस राहिले नाहींत. सातारचे महाराज गेले, त्यांच्याबरोबर तीं उत्तेजनेंही गेलीं. हल्लींही शाळांतून आणि कॉलेजांतून इंग्रज सरकारनें तालमीच्या संस्था ठेविलेल्या आहेत हें खरें; परंतु प्रतापसिंहमहाराजांचा जाहीरनामा आणि हल्लींच्या तालमींची मोकळीक यांच्यांत पुष्कळ फरक आहे. पूर्वी जमाबंदीकरितां मामलेदार गांवावर आले म्हणजे ज्यांनीं आपलें शरीर सुधारण्यासाठीं मेहनत केली असेल त्यांचीं नांवें बक्षिसाकरतां कळ-विलीं जावीं असा महाराजांचा जाहीरनामा होता; आणि हल्लीं एखादे पोलिस अधिकारी वसुलीकरतां एखाद्या गांवावर आले म्हणजे जर कोणी तालीम करून आपलीं शरीरें घष्टपुष्ट राखीत असले तर त्यांचीं नांवें वहिमी लोकांच्या यादीसाठीं गुप्त रीतीनें वरिष्ठांकडे कळविलीं जातात! हल्लीं शरिरानें धष्टपुष्ट असणारांना उत्तेजन नाहीं. शुष्क, रोडलेलें आणि काटकीसारखें होण्या-करतां सध्यां उत्तेजन आहे. लोकांनीं लठ्ठ होण्यापेक्षां जास्त सुकावें, वाळावें, त्यांचे अवशय कृश व्हावे, त्याच्या पोटाला वीतवीत खळग्या पडाव्या, त्यांचे गाल सुरकुतावे, वगैरे गोष्टी तूर्त जास्त श्रेयस्कर आहेत. क्षीण होणारांना तूर्त बक्षिसें मिळण्याचे दिवस आहेत. हिंदुस्थानांतील लोक जितके जितके जास्त अशक्त होत जातील, तितके तितके ते हल्लींच्या सरकारला जास्त प्रिय आहेत. हल्लींच्या स्थितीला अनुसरून एखाद्याला जर जाहीरनामा काढावयाचा असेल तर तो त्यानें पुढीलप्रमाणें काढला पाहिजे:—समस्त लोकांस समजण्याकरतां आज्ञा ऐसीजे कीं, हरएक लोकांनीं आपलीं शरीरें उपासमारीनें काटकीप्रमाणें राखावीं; याजकरितां आपण व आपले मुलांनीं दारिद्र्यामुळें उपाशी राहण्याचा अभ्यास केल्यास शरिरास फार सुखावह आहे. कारण त्यापासून अजीर्णाचा रोग

कधींहि व्हावयाचा नाहीं. याप्रमाणें उपाशी मरण्याचें काम ब्राह्मण, क्षत्रिय वगैरे कोणत्याही जातवाल्यांनीं केल्यास चिंता नाहीं. सर्वांनीं खुशाल करावें! म्हणजे शरीरें वाळून चांगलीं कृश होतील. ज्याची जितकी भूक त्याच्या अष्टमांश पटीनेंच त्यानें खाऊन शरिरास नीट कृश राखावें. सदरहूप्रमाणें मेहनत करून जे मरण्याला तयार होतील त्यापैकीं कोणीही स्वारी पेट्यास जमाबंदी समयीं येते तेव्हां, अधिकाऱ्यासमोर रुजू होऊं नये. म्हणजे सर्वत्र आबादी-आबाद आहे असें ते सरकारांत कळवतील. उपास करकरून मरण्याच्या कामांत ज्यांनीं अशा रीतीनें चांगली तयारी केली आहे त्यांजवर त्यांच्या निरुपद्रवीपणाबद्दल पूर्ण मेहेरबानी राहील. हें सर्वांनीं समजून सदर लिहिल्याप्रमाणें करीत जावें, हें सर्वांस महशूर होण्याकरतां हा जाहीरनामा सादर केला असे जाणिजे.

अशक्तपणापासून खरोखरच पुष्कळ फायदे आहेत! मग ही गोष्ट प्रतापसिंहमहाराजांच्या लक्षांत कशी आली नाहीं कोण जाणे! पूर्वीचे राजे मोठे धूर्त आणि शहाणे होते असें म्हणतात, मग त्यांचें शहाणपण कशांत असेल तें असो, आपली प्रजा थोडीशी अशक्त, जरा रोडकी, कांहीं दिवस उपासमारीनें वाळलेली, किंचित् मरणोन्मुख झालेली ठेवण्यामध्यें किती फायदा आहे ही साधी गोष्टदेखील ज्यांच्या लक्षांत आली नाहीं त्यांच्या शहाणपणाला शहाणपण असें नाव देण्याला कोणी तरी धजेल काय? हल्लींच्या राज्यकर्त्यांपासून पूर्वीच्या राजांनीं पुष्कळच शिकण्यासारखें होतें! पण आपल्या इकडील गांवढळ राजांना पाश्चिमात्य सुधारणांची कल्पनासुद्धां नव्हती! अशक्तपणापासून किती तरी फायदे आहेत! आपण असा विचार केला पाहिजे कीं, असे फायदे असल्यावांचून इंग्लिशांसारखे दयाळू लोक आपल्या तीस कोटि प्रजेपैकीं निम्मेहून अधिक लोकांना उगीच अर्धपोटी उपाशी ठेवतील? दानासारखें पुण्य कशांत नाहीं. आणि गरीब लोक नसले तर दान कोणाला करावयाचें? दाते पुष्कळ असले तरी उपाशी मरणाऱ्या गरीबावांचून त्यांना काय शोभा आहे? दाते देणार कोणाला? जर गरीब नसतील तर या उदार महात्म्यांचें दान घेणार कोण? जर बुभुक्षित झालेले कंगाल नसतील, तर आज दानाच्या पद्धतींतील सर्व महत्त्व नाहींसें होईल. दयेला अवसर उरणार नाहीं. सर्व जगभर निर्घृणतेचा अमल माजेल. दयेच्या द्रवाच्या अभावामुळें सर्व पृथ्वी

कोरडी पडेल आणि जिकडे तिकडे रूक्षता भासूं लागेल. इंग्लिशांनीं जगावर किती उपकार केले आहेत याची कोणाला कल्पना नाहीं. अशा बिन-पारखेच्या जगांत इंग्लिशांनींच म्हणून आपले प्रयत्न हिंमत न खचूं देतां एक-सारखे चालू ठेविले आहेत. इंग्लिशांनीं सुमारें शंभर दीडशें वर्षांच्या पूर्वीपासून असें पाहिलें कीं, फ्रान्स, जर्मनी, रशिया, इटली, अमेरिका वगैरे सगळे देश श्रीमंत होऊन जे ते आपल्यामध्यें उदार दाते उत्पन्न करण्याच्या उद्योगाला लागले आहेत; पण कोणी असा विचार करीत नाहीं कीं आपण सगळे श्रीमंत दाते झालों तर आपलीं दानें घेण्याला गरीब लोक कोठें आहेत! जगाची ही चुकी इंग्लंडच्या लक्षांत आली आणि पुढें जगावर जो अनर्थ कोसळणार तो टाळण्याकरितां इंग्लंडनें अठराव्या शतकापासूनच कामाला सुरवात केली. केवढें धोरण आणि केवढी दूरदृष्टि! इंग्लिशांनीं असा विचार केला कीं, सगळें जग श्रीमंत होऊन दातृत्वगुण संपादण्याच्या नादीं लागले आहे; तेव्हां याची भीक घेण्याला सपात्र असे गरीब लोक आपण निर्माण करून ठेविले पाहिजेत. सगळ्या जगांतील स्वतंत्र आणि श्रीमंत लोक दान देण्याला उठणार, तेव्हां त्यांच्या देणग्यांच्या सपाट्याला पुरतील इतके पुष्कळ भिकारी आपल्याला कोठें करतां येतील, याविषयीं विवेचना करीत असतां आणि त्यासाठीं निरनिराळ्या देशांतील लोकसंख्येच्या आंकड्यांच्या कोष्टकांवर नजर फिरवीत असतां इंग्लिशांच्या दृष्टीला तीस कोटि लोकसंख्येचा हिंदुस्थान देश आढळला! हा देश दरिद्री करण्याकरतां आपण घेतला तर यांतून सगळ्या जगाचे दानधर्म घेण्याला पुरतील इतके भिकारी लोक आपण निर्माण करूं शकूं, अशी इंग्लिशां-नीं अटकळ बांधिली. त्या वेळीं पुष्कळ साध्याभोळ्या इंग्रज लोकांनीं या कल्पनेला जबरदस्त हरकती घेतल्या. त्यांचें असें म्हणणें पडलें कीं, हिंदुस्थान ही सुवर्णभूमि आहे. तिला आपल्याच्यानें कधींही भिकारी करवणार नाहीं. आपण जरी हजारों वर्षें रात्रंदिवस राबलों तरी आपल्याच्यानें हें कृत्य तडीस नेववणार नाहीं. जेथें अलेक्झांडर थकला, जेथें गिझनीच्या महमदाच्या बारा लुटींची डाळ शिजली नाहीं, जेथें तैमूरलंगानें हात टेकले आणि जेथें नादिर-शहाच्या दरवड्यांचाही कांहीं पाड लागला नाहीं, तेथील संपत्ति आपण किती व कशी लुटणार? परंतु यावर कित्येक धूर्त, राजकारस्थानी, आणि कर्तबगार माणसांनीं उठून फारच कडाक्याचा वादविवाद केला व सांगितलें कीं, त्याची

तुम्हांला काळजी नको ! तैमूरलंग आणि नादिरशहा हे कोठले अडाणी लुटारू तुम्ही घेऊन बसलां आहां? आपल्या इंग्लिशांच्या अंगचे गुण तुम्हांला माहीत नाहींत. हिंदुस्थान कितीही श्रीमंत असूं द्या, आम्ही राज्यव्यवस्थेची अशी कांहीं जंत्री लावून देतों कीं, तिच्यापुढें कुबेरानेंदेखील कंगाल होऊन दारोदार भीक मागत फिरावें, मग हिंदुस्थानची काय कथा ! अशी प्रतिज्ञा करून त्यांनीं जगाला दरिद्री याचक पुरविण्याच्या कामाला ताबडतोब सुरवात केली आणि त्यांच्या त्या सत्कृत्याच्या वृक्षाला अलीकडच्या दहापांच वर्षांत तर बहुतेक सालोसाल फार चांगलीं फळें येऊं लागलीं आहेत. हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व लोक दरिद्री आणि भिक्षेकरी बनले आहेत. लोकांना भिक्षेकरी बनविण्याची अजब हातोटी इंग्लिशांना साधली आहे यांत खरोखर शंका नाहीं. इंग्लिशांनीं येथील ज्या लोकांना दरिद्री केले आहे, त्यांना त्यांनीं भिक्षेकरी बनविलें यांत फारसे आश्चर्य नाहीं; परंतु जे कांहीं श्रीमंत आहेत त्यांनादेखील यांनीं भिक्षेकरी बनवून सोडलें आहे, हें मात्र आश्चर्य आहे. हे भिक्षेकरी दरसाल आपली भिक्षेकऱ्यांची एक सभा भरवीत असतात आणि भिक्षा मागण्याचा आपला हक्क कोणी काढून घेतला नाहीं हें ठरवून घेण्याविषयीं ते फार दक्षता दाखवीत असतात. एवंच, श्रीमंत आणि गरीब, हिंदुस्थानांतील सरसकट सर्व लोक भिक्षेकरी बनले आहेत; व ह्यांतच सुदैवानें जेव्हां हिंदुस्थानांत दुष्काळ पडतो, तेव्हां इंग्लिश लोक मोठ्या वाजवी आढ्यतेनें जगांतील बाकीच्या लोकांना असें आव्हान करतात कीं, आतां येऊं द्या तुमची श्रीमंतांची दानशूरता कोठें आहे ती ! पाहूं या, जगांतील बाकीच्या लोकांचें औदार्य हटतें किंवा आम्ही हिंदुस्थानांत उत्पन्न केलेलें दारिद्र्य हटतें ! अशा आव्हानानंतर उभयपक्षांमध्यें मल्लयुद्ध सुरू होतें. परदेशांतून जितक्या देणग्या येतात तितक्या सगळ्या इंग्लिशांनीं हिंदुस्थानांत उत्पन्न केलेल्या दारिद्र्याच्या भयंकर जबड्यामध्यें गडप ! किरातवेषधारी शंकर ज्याप्रमाणें अर्जुनाचें प्रत्येक शस्त्र आणि अस्त्र स्वाहा करून टाकीत होता, त्याप्रमाणें इंग्लिशांनीं निर्माण केलेल्या दारिद्र्यरूपी भयंकर राक्षसाच्या जठराग्नीमध्यें बाकीच्या जगाचीं सर्व औदार्यें पचून जाऊन त्यांचा पत्ता सुद्धां लागत नाहीं ! बाहेरच्या श्रीमंत आणि उदार लोकांनीं या क्षुधेचें पारिपत्य करण्याकरतां वाटतील तितकीं द्रव्यास्त्रें हिच्या तोंडावर फेकावीं, परंतु तीं सगळीं गिळून ही

राक्षसी क्षुधा फिरून आपली वखवखलेलीच! अशी स्थिति पाहून सर्व औदार्यें थक्क झालीं. आणि इंग्लिशांनीं निर्माण केलेल्या दारिद्र्यापुढें दातीं तृण धरून तीं शरण आलीं व आपला महिमा फार अगाध आहे, आपण निर्माण केलेल्या दारिद्र्याशीं झगडण्याला आम्ही असमर्थ आहों, आपल्या दारिद्र्याचा विजय आम्ही कबूल करतों, अशा शब्दांनीं इंग्लिशांचा स्तुतिवाद गात तीं सर्व औदार्यें मागें फिरलीं!

लोकांना दरिद्री करणें हें बाह्य आणि ऐहिक दृष्टीनें थोडेंसें क्रूरपणाचें आहे असें कोणाला वाटेल. परंतु पारलौकिक दृष्टीनें याच्यासारखें पुण्यकारक कृत्य कोणतेंही नाहीं. आणि जीजस ख्राइस्टनें जर दानधर्म ( Charity ) केल्यापासून स्वर्गसुख प्राप्त होतें असें सांगितलें नसतें, तर इंग्लिशांनीं हिंदुस्थानांतील लोकांना गरीब करण्याचें कृत्य कधींही आपल्या हातीं घेतलें नसतें. सारांश, हें केवळ देवाच्या म्हणण्याखातर ते करीत आहेत. केवळ धर्मासाठीं ही सगळी खटपट आहे! नाहीं तर दुसऱ्याचा पैसा घेऊन त्यांना काय करावयाचें होतें! परंतु जगांत दानधर्माचा प्रसार व्हावा आणि धर्म करण्याची देवाची आज्ञा ख्रिस्ती लोकांना पाळतां यावी, एतदर्थ हे सगळे परिश्रम आहेत! उघड्याला वस्त्र द्यावें आणि क्षुधिताला अन्न द्यावें, म्हणून ख्रिस्ती धर्मशास्त्रकार सांगून बसले पण तें द्यावयाचें कसें? अर्थात् ज्याच्या अंगावर भरगच्ची वस्त्रें असतील त्याच्यापासून तीं हिसकावून घेऊन त्याला आधीं उघडें केलें पाहिजे, आणि जो पोटभर खात असेल त्याला आधीं नागवून क्षुधित केलें पाहिजे; तेव्हांच उघड्याला वस्त्र आणि क्षुधिताला अन्न द्यावें या वचनाला अवकाश सांपडेल. शास्त्र करणें फार सोपें आहे. शास्त्राप्रमाणें वागणारांना काय अडचणी येतात या त्याच्या त्यांनाच माहीत! तरी पण धर्माच्या आणि देवाच्या आज्ञा शक्य करण्यासाठीं घेतलेले श्रम हे कधींही निष्फळ होत नाहीत.

सारांश, गरीब, उपाशी, अशक्त आणि रोड होण्यापासून जगाच्या रचनेमध्यें फार मोठा फायदा आहे. दरिद्री आणि अशक्त होण्यापासून आपण या जगावर किती उपकार करीत आहों! आणि परमेश्वराच्या या सृष्टींतील किती महत्त्वाचा बोजा आपण आपल्या डोक्यावर उचलीत आहों याची गरीब आणि अशक्त लोकांना कल्पनाही नसेल. शिवाय अशक्त असल्यापासून दुसरेही पुष्कळ फायदे आहेत! अशक्त माणसाना खावयाला थोडें पुरतें. आणि या

बाबतींतही अशक्त लोक जगावर थोडाथोडका उपकार करतात असें नाहीं. त्यांनीं जगांतील किती तरी अन्न वांचविलें आहे. हिंदुस्थानांतील बुभुक्षित, किडकिडीत आणि अशक्त माणसांनी जर थोडें खावयाचेंच नाहीं असा निश्चय केला, तर ते जगांतील व्यापाऱ्यांचीं किती तरी धान्याचीं कोठारें फस्त करून टाकतील! पण मग व्यापार कसा वाढणार? हिंदुस्थानांत अशक्त आणि किडकिडीत लोक असल्यापासून दुसरा असा एक फायदा आहे कीं, किड-किडीत शरीर झांकण्याला कपडा थोडा पुरतो! हा फायदा लक्षांत आणून हिंदुस्थानांतील लोक किडकिडीत होतील तर फार बरें होईल! परंतु आपल्या साम्राज्याच्या दृष्टीनें अशक्त असण्यापासून एक मोठा फायदा आहे. आणि तो हा कीं, आपल्याला ताब्यांत ठेवण्याला इंग्लिशांपाशीं थोडें सैन्य असले तरी तें पुरतें. आपल्या इंग्रजांचें साम्राज्य वाढत चालल्यामुळें त्यांच्या संरक्षणाच्या बाबतींत त्यांची हल्लीं किती तारांबळ आणि फटफजिती उडत आहे हें आपण पाहतच आहों. राज्य मोठें आणि सैन्य थोडें, अशी त्यांची स्थिति झालेली आहे. त्याच अडचणींत आपणही जर सशक्त बनलों तर इंग्लिशांनीं हिंदु-स्थानच्या संरक्षणाकरतां सैन्य आणावयाचें कोठून? कर जास्त वाढवावेत तर तिकडूनही कॉंग्रेसची कुरकूर आहेच. ह्याकरतां हिंदुस्थानांतील सर्व लोकांनीं थोडथोडें कमी जेवून हिंदुस्थानच्या संरक्षकसैन्याची आवश्यकता कमी केली तर त्यांचे हिंदुस्थानावर फार उपकार होतील!

---

## एका सनईनें सुचविलेले विचार : : १६

काळ : अग्रलेख, ता. १-२-१९०७

एका शहरांत बरेच मल्ल राहत असत. तेथील लोकांना कुस्त्यांची मोठी हौस असे. कधीं कोणाची कुस्ती होऊं लागली म्हणजे गांवांतील सगळे लोक ती पाहावयाला जमत असत. कांहीं लोक एका पक्षाचे होत आणि कांहींना दुसऱ्या पक्षाबद्दल अभिमान वाटत असे; आणि त्यामुळें एखादी कुस्ती चालू असतां कुस्ती करणारांच्या डावपेंचांची जशी कमीजास्त सरशी होत जाईल तसतशी त्यांच्या पक्षाच्या अभिमानी लोकांच्या चेहऱ्यांवर उल्हासवृत्ति अगर खिन्नता कमीजास्त उत्पन्न होत असे. लोकांमधील या चढाओढीमुळें त्या शहरांत असलेल्या दहाबारा पेहलवानांमध्येंही नेहमीं एक प्रकारची चुरस उत्पन्न झालेली असे. परंतु ही त्यांच्यामधील चुरस फक्त तेथील लोकानींच उत्पन्न केलेली होती असें नाही. आसपासच्या राजेरजवाड्यांचाही तिच्यामध्यें कांहीं वाटा होता. प्रत्येक पहिलवान आपण कोठल्या तरी राजाच्या आश्रयाखालील आहों असें म्हणवून घेत असे. कांहींना कित्येक संस्थानिकांकडून खरोखरच खावयाला खुराक मिळत असे. परंतु जे इतके भाग्यवान् नव्हते, ते कांहीं तरी बादरायण संबंध लावून आपल्याला अमक्या अमक्या राजाचा आश्रय आहे अशी आपल्या चेलेमंडळींमध्यें खोटीच बढाई मारीत असत. आणि त्यामुळें एखादा पहिलवान कितीही सशक्त असला किंवा अशक्त असला तरी ज्या संस्थानचा त्याला आश्रय असेल त्या संस्थानच्या जमाबंदीवरून त्याचा वर किंवा खालीं नंबर ठरत असे. त्या शहरांत आखाडे, कुस्त्या, चढाओढी वगैरे-शिवाय संभाषणाचा किंवा वादविवादाचा दुसरा विषय क्वचितच असे. ज्या

दिवशीं एखादी कुस्ती व्हावयाची असेल, तो दिवस म्हणजे अतिशय मोठ्या सणाचा दिवस म्हणून लोकांकडून मानला जात असे. अशा एके दिवशीं ठरलेल्या एका कुस्तींत एका पहिलवानाचा जय झाला. ज्याचा जय होईल त्याला मंदील बांधून, ताशे, वाजंत्रीं, चौघडे लावून आणि हजारों लोक जमून त्याची मिरवणूक काढण्याचा परिपाठ असे. त्याचप्रमाणें याचीही मिरवणूक मोठ्या थाटाची निघाली. मिरवणूक चालतां चालतां संध्याकाळ झाली, तेव्हां हौशी लोकांनीं नळेचंद्रज्योतीही उडविल्या. अशा थाटानें जेथें कुस्ती झाली तेथून त्या विजयी मल्लाच्या आखाड्यापर्यंत एक जंगी मिरवणूक निघाली.

परंतु हा सगळा प्रकार चालला असतां त्या विजयी मल्लाच्या मनाची स्थिति फारच विलक्षण होऊन गेलेली होती. त्याच्या विचारांचा पूर्वींचा ओघ अगदीं बदलून गेला. आजपर्यंत त्याच्या कल्पना ज्या मार्गानें चालत होत्या, तो मार्ग सुटून त्याच्या अगदीं उलट मार्गाने त्या चालूं लागल्या. आणि असे फरक कधीं कधीं मनुष्याच्या मनांत होत असतात. पायरी पायरीनें जेथें मनुष्याच्या विचारांत फरक पडतो तेथें त्या फरकाचीं कारणें मानवी बुद्धीला आकलन करतां येण्यासारखीं असतात. परंतु जेव्हां एकदम असा फरक पडतो तेव्हां मानवी मनें बुचकळ्यांत पडल्यासारखीं होतात. आणि जेव्हां दृश्य कारणें उत्पन्न होऊं शकत नाहींत, तेव्हां अदृष्ट कारणांकडे मनुष्याचें मन धांव घेतें. इहजन्मींचा संबंध संभवनीय दिसत नाहींसा होतो, तेव्हां जन्मांतरीय हेतूंच्या कल्पनांनीं मनुष्याला आपल्या मनाचें समाधान करून घ्यावें लागतें. त्या विजयी मल्लाच्या मनाच्या या आकस्मिक स्थित्यंतराबद्दल कांहीं कारण सांगतां येत नाहीं हें खरें, तरी पण तें स्थित्यंतर झालें यात संशय नाहीं. एखाद्या डोंगराच्या तुटणाऱ्या कड्याच्या शिखरापर्यंत वाट गेल्यानंतर तेथून ती आपली दिशा एकदम बदलते त्याप्रमाणें, एखाद्या अर्वाचीन मल्लाच्या मोठेपणाच्या शिखरापर्यंत तो जाऊन पोंहोचल्यामुळें कदाचित् त्याच्या मनानें येथें उलट खाली असेल. कदाचित् आसक्तीचा अतिरेक झाला म्हणजे विरक्ति उत्पन्न होतें, तसेंही झालें असेल. पण कांहीं तरी झालें खरें. त्याला जें मोठें दिसत होतें तें क्षुद्र दिसूं लागलें. जें भरीव म्हणून तो आजपर्यंत मानीत आला त्याचा पोकळपणा त्याला दृश्यमान होऊं लागला. त्याच्या महत्त्वाकांक्षेची दिशा पालटली. आपल्या विजयाची

खरी किमत काय आहे आणि लोकांनी केलेल्या स्तुतिवादांतील निरर्थकपण किती आहे, या गोष्टींसंबंधानें त्याच्या डोक्यांत उजेड पडला. तो ब्राह्मण-वर्णाचा असून वेदशास्त्रादिकांचा त्याच्या मनावर थोडासा संस्कार झालेला होता. आणि हल्लीं चोहोंकडेच प्रचलित झालेल्या स्वदेशभक्तीच्या कल्पनाही त्याच्या कानापर्यंत पूर्वीच जाऊन पोंहोचलेल्या होत्या व त्यांचा पगडा त्याच्या शुद्ध मनावर हळूहळू बसत चालला होता. त्या स्वदेशभक्तीच्या दृष्टीनें त्या दिवशींच्या आपल्या स्वतःच्या आणि लोकांच्या कृतीकडे पाहून तो फारच उद्विग्न आणि विरक्त झाला. आजपर्यंत जो शहाणपणा म्हणून त्याला वाटत होता, त्यांतील मूर्खपणा त्याला आतां ढळढळीत दिसूं लागला. "भली, खाशी," अशा प्रकारच्या लोकांच्या ज्या शाबासकीच्या आरोळ्यांनीं तो आजपर्यंत फसला गेला त्यांतील फसवणूक त्याच्या लक्षांत आली. आणि जस-जसे हे बदललेले विचार त्याच्या मनामध्ये जास्त घोळूं लागले, तसतसे त्याचें डोकें फारच भडकून गेलें, आणि त्याच्या विचारांची मजल फारच अतिदेशा-प्रत जाऊन पोहोचली. मिरवणूक काढणारे सर्व लोक आपापल्या घरीं गेल्या-नंतर जिकडे तिकडे सामसूम झालें तेव्हां, हा वेड्यासारखा विचार करीत एकटाच इकडे तिकडे फेऱ्या घालूं लागला. मिरवणुकीला बरीच रात्र झाल्या-मुळें ताशेवाले, वाजंत्रीवाले, वगैरे थकून गेलेले लोक आपले ताशे, सनया, वगैरे सामान तेथेंच ठेवून गेले होते त्याच्याकडे याची सहज दृष्टि गेली, तेव्हां विचाराच्या वादळामध्यें सांपडून चोहोंकडे गिरगिर गिरगिर घिरट्या घालीत असलेल्या त्याच्या मनानें त्याच्या पावलांला हळूहळू त्यांतील एका सनई-जवळ नेलें. ती पाहून त्याला फार विस्मय वाटला. त्यानें ती आपल्या हातांत उचलून घेतली आणि तिला तो वरून खालून पाहूं लागला. त्या वेळीं त्याच्या डोक्यांत बीजस्वरूपानें असलेले विचार त्याच्या तोंडांतून पुढीलप्रमाणें व्यक्ततेला आले:--

या लोकांच्या स्तुतीला भुलून जाण्यांत माझ्या हातून फार मोठी चूक होत होती—ही सनई! हीसुद्धां थोड्या वेळापूर्वी माझी स्तुति करीत होती, आणि मी हिच्या स्तुतीला फसून जात होतों. थोड्या वेळापूर्वी माझ्या सन्मानासाठीं ही वाजत नव्हती काय? पण ही कां वाजत होती? हिला मी काय माहीत? माझ्या अंगचा कोणता गुण हिला कळला

कीं, ज्यासाठीं ही माझें स्तोत्र इतक्या मंजुळ स्वरानें गात होती? अहाहा! मला लोक रस्त्यानें मिरवीत नेत होते त्या वेळीं हिचा जो सुस्वर ध्वनि माझ्या कानावर येत होता तो मला किती गोड लागत होता! पण खऱ्या मनोविकारावांचून पाहिजे त्यापुढें गायन करून दाखविणाऱ्या वारांगनांचा आवाज देखील असाच गोड लागतो; पण त्यांत काय अर्थ आहे? आणि तसाच या सनईच्या मधुर ध्वनीमध्येंही कांहीं अर्थ नाहीं. ही लबाड आणि खोटी स्तुति करणारी सनई आहे. हिला काय कळतें? आजच्या कुस्तींत मी पडलों किंवा विजयी झालों म्हणून हिला काय? आणि असेंच लोकांना! मी पडलों असतों तर हिला दुःख झालें असतें? नाहीं! हिला रडतां येतें? नाहीं, नाहीं! हिला तें काय येणार आहे? हें माणसानें पितळेचें बनविलेलें यंत्र, हें माणसाप्रमाणेंच फक्त फसविण्याच्या कामांत मात्र निष्णात असणार! ही सनई म्हणजे परमेश्वरानें प्रत्येक मनुष्याच्या शरीररचनेमध्यें नाभिचक्रापासून तों कंठापर्यंत बनविलेल्या अत्युत्कृष्ट सनईची एक भिकारडी अनुकृति आहे. मनुष्याला प्रमुखत्वानें सप्त सूर काढतां येतात म्हणून हिला सात भोकें पाडून ठेविलेली आहेत. परंतु नाभिचक्रावर खालचें तोंड आणि कंठाशीं वरचें तोंड अशा रीतीनें परमेश्वरानें मनुष्याच्या शरीरामध्यें जी अद्भुत सनई बसवून ठेविली आहे तिला प्रेरणा करणारें मन तिच्यामध्यें परमेश्वरानें घातलें आहे; तें मन या सनईत कोठें आहे? वरून पाहा, खालून पाहा, या भोकांतून पाहा, त्या भोकांतून पाहा जिकडे तिकडे सगळें मोकळें! इकडून फुंकलें तर तिकडे वारा जातो आणि तिकडून फुंकलें तर इकडे वारा येतो! हिच्यांत मन कोठें आहे! देवानें केलेल्या कंठनालाचें अनुकरण करून क्षुद्र मनुष्यप्राणी पितळेची सनई तयार करतो, व तिला पूर्णता आणण्यासाठीं तिच्या अंगाला जागोजाग भोकेंही पाडतो; पण तो तिच्यामध्यें तें परमेश्वरीय मन घालूं शकेल काय? तो मनाचा परमाणु या सनईत कोठें आहे? ज्याच्यांत सुखदुःखादिक विकार प्रतिबिंबित होतात, जो निर्विकल्प परमेश्वराचा अंश, जो शुद्ध चैतन्याचा एक भाग, तें मन जर या सनईत नाहीं, तर ही काय कामाची? ही मनावाचून बनविलेली जड वस्तु माझी स्तुति काय करणार? आणि मीं हिला काय म्हणून फसून जावें? मनाशिवाय स्तुति हें शुद्ध तोंडपुजेपणाचें लक्षण होय. ही सनई म्हणजे तोंडपुजे लोकांची अगदीं हुबेहुब

प्रतिमा आहे. मनांत खरोखर कांहीं एक आनंद नसतां तोंडपुजे लोक स्तुति करितात, त्याप्रमाणें हिला मन नसतांनादेखील ही पाहिजे त्याची स्तुति करूं शकते! तोंडपुजे लोकांना जर या राज्यांत मोठाले किताब मिळत असतील, तर या सनईला मोठयांतील मोठा किताब मिळाला पाहिजे. आजपर्यंत ही सनई कितीकांच्या करतां तरी वाजली असेल! आणि कित्येकांची हिनें आजपर्यंत खुशामत केली असेल! ते जसे फसले, तसाच मीही फसून जात होतों. ही सनईसुद्धां आपल्या गुणांचें वर्णन गात आहे असें पाहून आजपर्यंत शेंकडों लोक या खोट्या मोठेपणाच्या जाळयामध्यें गुरफटून गेले असतील; पण आजपर्यंत हें एकाच्याही लक्षांत आलें नाहीं कीं, एखाद्या वेश्येप्रमाणें जो पैसे देईल त्याच्या करितां ही आपल्या शरिराचा उपयोग करूं देते. ही सनई वाजली म्हणून मी मोठा कसा झालों? आजपर्यंत लक्षावधि मिरवणुकी निघाल्या असतील, आणि तितक्या लक्षावधि वेळां ह्या असल्या वारांगनासदृश सनया वाजल्या असतील. त्या लक्षावधींतलाच मी एक. तो मी मोठा कसा झालों? ही सनई माझ्या सामर्थ्याच्या अतुलपणासाठीं माझ्यापुढें वाजत होती? तसेंही म्हणतां येत नाहीं. ही मुलामुलींच्या लग्नांत देखील अशीच वाजते. किंवा एखाद्या न्हाणवलीचीही त्याच तोडानें स्तुति गात असते. त्याच तिच्या तोंडांतून निघालेल्या स्तुतीनें मीं हुरळून जावें, एखाद्या वारवनितेच्या मुखाप्रमाणें पाहिजे त्यानें विटाळून टाकिलेल्या या सनईच्या तोंडाने माझी स्तुति गाइली म्हणून मीं त्यांत महत्त्व मानावें, हा केवढा मूर्खपणा आहे? जिला स्वतःचें मन म्हणून कांहीं एक नाहीं आणि जी केवळ पैशासाठीं एखाद्या तोंडपुजाप्रमाणें माझी स्तुति गाते, ती आज माझी स्तुति गात असली तर उद्यां तिला कोणी उलट पैसे दिले म्हणजे ती माझी निंदाही गाऊं लागेल. असल्या या व्यभिचारी सनईनें पसरिलेल्या स्तुतीच्या मोहजालामध्यें मीं सांपडावें लबाड मनुष्यजात! आणि त्या मनुष्यांना आपल्या कंठाच्याबरहुकूम केलेली ही सनईची प्रतिमाही त्यांच्याप्रमाणेंच लबाड! वाऱ्याच्या लहरीप्रमाणें या सनईचीही स्तुति अनिश्चित! जसा वारा फुंकावा तशी ही वाजणार! हे अनेकनिष्ठे, व्यभिचारिणि, अपतिव्रते सनई, तुला पहिल्यानें कोणी निर्माण केली? या जगांतील लोक खोट्या मोठेपणाच्या कल्पनांना फसले नसते तर जग चाललेंच नसतें, असें वाटून त्यांना फसविण्याकरितां तूं निर्माण झालीस होय? तुझ्यावांचून

जग पुष्कळ सुखी झालें असतें. तूं या जगांत खोटें महत्त्व, हेवा, मत्सर, द्वेष, निंदा इत्यादिकांचे खळगे उकरून ठेविले आहेस. तूं स्वतः इतकी निर्बुद्ध असून खोटी स्तुति करण्यांत इतकी पटाईत आहेस, तर मग ज्यांनीं कपट कसें करावें हें जाणण्याकडेच ईश्वरानें दिलेल्या चिच्छक्तीचा दुरुपयोग केलेला आहे ते लोक किती तरी पटाईत असले पाहिजेत ! तुला कोणी सांगितलें होतें माझी स्तुति करावयाला ? कुस्तीत माझी पाठ लागली नाहीं, म्हणजे तुला काय समजलें ? आणि माझी पाठ जमिनीकडे वळली काय, किंवा आकाशाकडे वळली काय, त्यांत तुला काय मोठेंसें वाटलें ? तूं कां माझ्यासाठी वाजत होतीस ? तुला कोणी पैसे दिले ? हे लोक खोटे स्तुतिपाठक आहेत. यांच्या नादीं तूं लागूं नको. ह्यांच्या जिभा ब्रह्मदेवानें चारचार पांचपांच इंच लांब केल्या आहेत, तरीदेखील खोट्या स्तुतीला तेवढ्या पुरेशा न होऊन त्यांनीं तुझ्या रूपानें आपल्या जिभा आणखी हात हात लांब बनविल्या आहेत. तसेंच ब्रह्मदेवानें मनुष्यांना आंतड्यांची सनई दिलेली आहे, पण तेवढी पुरेशी न होऊन त्यांनीं ती तुझ्या स्वरूपानें आणखी लांब वाढविली आहे. आणि तुझ्या शरिराचा विनियोग दुसऱ्यांना फसविण्याच्या कामीं ते करीत आहेत. लोकांच्या खोट्या स्तुतीच्या घाणी तुझ्या या छिद्रांतून किती तरी वेळा बाहेर पडल्या असतील ! खोट्या स्तुतीच्या दुष्ट मनोविकारांची दुर्गंधि तुझ्या ह्या रंध्ररंध्रांमधून भरलेली असली पाहिजे. जिकडचा पैसा मिळेल तिकडची स्तुति करणारी तूं आणि वेश्या यांच्यांत काय फरक ? पूर्वींची तुझी अशी स्थिति नव्हती. लबाड आणि दुष्ट लोकांच्या हातीं तूं लागल्यापासून तुझ्या शरीराची त्यांनीं अशी खराबी करून टाकली आहे. “रवी ऊदयो अस्त तो पोटधंदा। स्तवी आर्जवी—तो करी येरनिंदा। कळेना पुढें काय होणार तें रे।” या श्लोकांत समर्थांनीं वर्णन केलेल्या प्रकारच्या लोकांच्या तावडींत तूं सांपडल्यानंतर मिथ्या स्तुतींत आणि तोंडपुजेपणांत तुझा विनियोग झाला तर त्यांत आश्चर्य तें काय ? तुझ्यासारख्या जड आणि मूर्ख वस्तु ज्यांच्या हातांत जातात त्यांच्यासारख्या त्या बनतात. नीच लोकांनीं तुला नीच केलें, पण पूर्वीं तुझा महिमा फार मोठा होता. पूर्वीं प्रत्यक्ष देव तुला आपल्या जवळ घेत असत. कैलास पर्वतावरील महादेवाच्या तांडवनृत्याच्या वेळीं तूं आपल्या सुस्वर स्वनानें त्याच्या गणांना ब्रह्मानंदामध्यें नेऊन सोडीत होतीस ! यक्ष, गंधर्व

आणि किन्नर नंदनवनांतील कल्पवृक्षाच्या छायेखालीं बसून अमृतरसाच्या पानानंतर तुझ्या वादनानें स्वर्गलोकालाही अधिक आनंदित करीत असत. आपले हितगुज एखाद्या सखीच्या कानांत सांगावें, त्याप्रमाणें अप्सरा आपल्या प्रीतीचीं गाणीं फक्त तुझ्यापाशीं सांगत असत. ज्याच्या चरणरजाचा स्पर्श झाला असतां महापातक्यानेंही सायुज्य मुक्तीवर आपला हक्क सांगावा, त्या प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्णांनीं आपल्या हातात धरून अनेक भक्तिरसप्लुत गोपीनाही दुर्लभ असा अधरचुंबनाचा लाभ तुला दिला, त्या वेळीं तर तुझ्या अंगामध्यें विलक्षणच सामर्थ्य उत्पन्न झालेलें होतें. वृंदावनाच्या पवित्र अरण्यांतून तुझा मंजुळ ध्वनि त्रिजगताला पावन करण्याकरितां दशदिगंतांत पसरूं लागला म्हणजे वासरें स्तनपान करण्याचें विसरत, वायु स्थिर होई, यमुनेचें पाणी वाहण्याचें थांबे, डोकीवर कुंभ घेतलेल्या गोपी तेथल्या तेथेंच तटस्थ होत, व्याघ्र आणि गाई आपला नैसर्गिक द्वेषभाव विसरून जात, गंधर्व आपलीं विमानें अंतराळांत थांबवून आपल्या आलापांतील वर्ज्यावर्ज्याच्या चुका दुरुस्त करून घेत, पृथ्वीवरील लोकांना आपण स्वर्गांत आहों असा भास होई, आणि स्वर्गांतील देवांना आपण मथुरेचे लोक झालों असतों तर बरें झालें असतें असें वाटे. ही तुझी पूर्वींची पीठिका कोणीकडे, आणि हल्लींचा हा तुझा अधःपात कोणीकडे ! नीच लोकांनीं चांगल्या चांगल्या वस्तूंचीही माती करून टाकली आहे. जी तूं देवादिकांच्या हातांत लहान मुलीप्रमाणें खेळत होतीस, आणि प्रियतमेप्रमाणें त्यांच्या अधरसुखाचा रसास्वाद घेत होतीस, ती तूं या श्रेष्ठ पदापासून भ्रष्ट होऊन आतां एखाद्या कसबिणीप्रमाणें पाहिजे त्याची स्तुति करून आणि त्यांच्या मनांत नसत्या मोठेपणाच्या खोट्या कल्पना उत्पन्न करून त्याला फसविण्याच्या धंद्याला लागली आहेस, ही केवढी लज्जेची गोष्ट आहे ! —वाज पाहूं, आतां वाज पाहूं ! गा—माझी स्तुति गा ! मी मोठा आहेना ? मग आतां तूं माझी स्तुति कां गात नाहींस ? आतां तुझी दांतखिळी कां बसली ? गुन्ह्यांत सांपडलेल्या अपराध्याप्रमाणें आतां तूं मुकी कां झालीस ? पण तूं काय बोलणार ? तुझ्या आंत काय आहे ? एखाद्या तोंडपुज्याच्या मनाप्रमाणें तुझें अंतरंग शून्य आणि कोरडें ठणठणीत आहे. माझ्या मोठेपणाबद्दल तुझ्या या पोळींत काय अवशिष्ट खूण आहे ? आणि तसें कांहीं नसून तूं माझी स्तुति करतेस ? आणि माझी स्तुति म्हणजे नुसती माझी स्तुतीच नाहीं. त्यांत जो आज

दुर्दैवानें पडला त्याची निंदाही आहे. असे एकाच वेळीं तूं दोन गुन्हे केलेस. पण ज्याची तूं निंदा केलीस, त्याचा काय कमीपणा तुला कळला ? तूं जडांतील जड, तुला त्याचा कमीपणा किंवा माझा मोठेपणा काय कळणार ? कुस्ती, जुगार आणि लढाई हे नशिबाचे खेळ आहेत. त्यांत जो हरला तोच कमी असें म्हणतां यावयाचें नाहीं. कदाचित् मीही पडलों असतों. त्याचा काय नेम आहे ? मग तूं त्याच्यापुढें वाजली असतीस, आणि मी कमी ठरलों असतों. पण यात कांहीं अर्थ नाहीं ! दोन भावांत एखादी घरांतील दुष्ट स्त्री कलागती लावते त्याप्रमाणें तूं आहेस. वास्तविक आम्ही दोघेही भाऊच आहोंत ! माझा जन्म ज्या हिंदुस्थानांत झाला त्याच हिंदुस्थानच्या पोटांतून त्याचाही जन्म झालेला आहे. त्यांपैकीं एकाला चढवून दुसऱ्याची निंदा करण्यासाठीं तूं आज आपल्या तोंडाचें भोक खिजविलेंस अशा तुला धिक्कार असो ! तुझ्यासारखीं जीं छिद्रवाद्यें आहेत तीं इतर देशांतून तेथील लोकांचीं मनें एक करून त्यांना स्वदेशाच्या स्वतंत्रतेच्या निशाणाखालीं एकत्र जमा करण्याकरतां वाजत असतात. त्यांचे आवाज ऐकले म्हणजे शेतकरी आपलें पिकलेलें शेत कापावयाचें ठेवून देतो, नवरामुलगा आपल्या नवरीच्या हातांतील लग्नकंकणाची सोडलेली अर्धी गांठ तशीच टाकतो, मुलगा आपल्या वात झालेल्या बापाकरतां उगाळलेले मात्रेचे वळसे सहाणेवरच वाळूं देतो, आणि सर्वजण आपल्या देशाच्या स्वातंत्र्याच्या संरक्षणासाठीं सज्ज होतात. असा इतर देशांतून तुझ्या शब्दाचा प्रभाव असतां, तूं या हिंदुस्थानांत आपसाआपसांत कलागती लागण्याला कारणीभूत होतेस ! तुला काय म्हणावें ? तूं खरोखर इंग्लिशाची साथीदार असली पाहिजेस. तुझ्या या पितळेंत कांहीं तरी इंग्लिशांचा अंश आला असला पाहिजे. हे हिंदुस्थानांत कलागती लावण्याचे दिवस आहेत काय ? कलागती पुष्कळ झाल्या. आपसांतील कलागतींनीं आमचीं राज्यें गेलीं, तरी तूं आमच्यांत अजून कलागती लावीतच आहेस, याला काय म्हणावें ? तुझे डोळे केव्हां उघडणार ? ज्या कारागिरांनीं तुला हें तोंड करून दिलें त्यांनीं तुला डोळेहि करून दिले असते तर फार बरें झालें असतें. त्यांनीं तुला फसविलें आहे. कारण, डोळ्यांवांचून तोंड काय कामाचें, आणि असें जेथें नेत्रविरहित मुख असेल, तेथें गुणावांचून स्तुति आणि दोषावांचून निंदा हे परिणाम उत्पन्न झाले तर त्यांत नवल तें काय ? आंधळे आणि

वृथा स्तुतिपाठक यांच्यांत एवढाच फरक असतो कीं, एकाच्या डोळ्यांच्या खाचींत देवानें केलेलीं पाहणारी भिंगें नसतात आणि दुसऱ्याच्यांत तीं आहेत तसें लोकांना वाटतें. तूं आपल्या मंजुळ स्वरानें मागील थोर पुरुषांचीं उदात्त चरित्रें गाऊन लोकांचें मन त्यांच्या उदाहरणांकडे वळवावें, तें टाकून एखाद्या दुर्जनाप्रमाणें तूं कलागती लावण्याला आपल्या तोंडाचा उपयोग करूं देतेस ! माझी स्तुति आणि त्याची निंदा तूं काय समजून करतेस ? मीं त्याची पाठ लाविली म्हणून ? अग वेडे, तुला अजून कांहींच समजत नाहीं. हिंदुस्थानांतील स्त्रियांना अजून खरोखरच पुष्कळ शिक्षण मिळावयाला पाहिजे आहे. दुसऱ्याशीं कुस्ती करून त्याची पाठ लाविली म्हणजे मीं एक मोठें शतकृत्य केलें असें मलाही अजूनपर्यंत वाटत होतें. पण आतां तो भ्रम गेला. आमच्या सगळ्यांच्याच पाठी इंग्रजांनीं जमिनीला लावल्या आहेत. इंग्रजांशीं जी मागें आपल्या देशाची कुस्ती झाली, त्यांत आम्ही सगळेच चीत झालेले आहों. अशा स्थितींत मीं काय अभिमान मानावा आणि तूं माझी काय खोटी स्तुति गावीस! आखाड्यांत मी त्याला खालीं पाडून त्याच्या छातीवर बसलों म्हणून तूं माझी स्तुति करतेस ? ती माझ्या मोठेपणाबद्दलची तुझी खोटी आणि अनाठायीं स्तुति पाहून मला लाज वाटते. हिंदुस्थानच्या रणभूमीच्या आखाड्यामध्यें आम्हा हिंदुस्थानांतील लोकांना खालीं पाडून इंग्रज लोक आमच्या सगळ्यांच्याच छातीवर बसले असतांना आम्ही असल्या या भातुकलीच्या कुस्त्या कराव्या, आणि त्यांत एकानें दुसऱ्याला पाडलें म्हणून ताशांनीं, वाजंत्र्यांनीं आणि चौघड्यांनीं आमच्यापुढें वाजावें, आणि नळेचंद्रज्योतींच्या प्रकाशांनीं आकाशांत उडावें, हें पाहून खरोखर कोणालाही अतिशय वाईट वाटलें पाहिजे. या गोष्टी वास्तविक आमच्या राजांना समजावयाला पाहिजे आहेत. पण त्यांना तर त्याचा गंधही दिसत नाहीं. त्यांना हिंदुस्थानच्या स्वतंत्रतेची कळकळ असावयाला पाहिजे होती. पण तेच आम्हाला खुराक चारून आमच्यामध्यें कुस्त्या लावतात. झुंज लावण्याकरतां जसे बोकड किंवा टोणगे माजविले असतात त्याप्रमाणें आम्हां पहिलवानांना संस्थानिक खावयाला घालून लठ्ठ करवितात. देशाच्या जास्त उपयोगीं पडेल अशी यांना आमच्यापेक्षां आपले पैसे खर्च करण्याला दुसरी कोठें जागाच उरली नाहीं काय ? हिंदुस्थानांत हल्लीं कोणी उपाशी मरतच नाहींत काय, कीं यांनीं दहादहा माणसांचें अन्न आम्हांला चारावें

आणि ते दहांच्या तोंडचें अन्न काढून आम्हीं निष्कारण फस्त करून टाकावें? आमच्यामध्यें जर देशाच्या उपयोगीं पडण्याची बुद्धि नाहीं, तर आमच्या सामर्थ्याचा काय उपयोग? आणि असल्या माझ्यापुढें तूं वाजत राहतेस आणि माझा मोठेपणा गातेस? यांत काय मोठेपणा आहे? तूं मोठेपणाच्या भलत्याच कल्पना लोकांच्या मनांत भरवून देतेस. या जगांत कोण मोठा आहे? फक्त एक परमेश्वर काय तो मोठा, आणि बाकी सगळे क्षुद्र जीवजंतु. त्यांची स्तुति गाऊन आणि त्यांचीं डोकीं मिथ्या मोठेपणाच्या कल्पनेनें वेडीं करून तूं आजपर्यंत किती तरी लोकांना बिघडवून टाकलें आहेस. या तुझ्या कृत्याबद्दल तुझें पारिपत्यच झालें पाहिजे. म्हणून मी तुला या दगडावर आपटून तुझे तुकडे तुकडेच करून टाकतों म्हणजे फिरून तूं अशी कोणाला फसवणार नाहींस.—पण नको!—अजूनही तुला पश्चात्ताप होऊन तूं मनांत आणशील तर तुझ्या हातून पुष्कळ सत्कृत्य होईल. क्षुद्र माणसांच्या स्तुतींत किंवा निंदेंत लक्ष न घालतां तूं जर इतःपर त्या अखिलगुणैश्वर्यमंडित भगवंताचे गुणागुवाद गायन करण्यामध्यें आपलें आयुष्य घालविशील तर त्याच्या घरीं सद्गतीला कधींही तोटा नाहीं.

असें म्हणून त्यानें ती सनई फिरून होती तेथें ठेवली. त्याच्या मनांत सांचलेल्या या विचाराच्या आविष्करणानें त्याला बरीच स्वस्थता प्राप्त झाली. मोठेपणाच्या खोट्या कल्पनांचा अहंकार त्याच्या डोळ्यांवरून गळाला. देशाचें खरें हित कशांत आहे हें त्याच्या लक्षांत बिंबलें. निंदा आणि स्तुति यांच्या विटाळापासून त्यानें स्नान केलें. आणि परमेश्वराच्या आराधनेमध्यें तो सर्व सुखाचा अनुभव घेऊं लागला.

---

## डोळ्यांत फेंकावयाच्या धुळीचे कण : : १७

काळ : अग्रलेख, ता. १२-१०-१९०६

● हिंदुस्थानांतील लोकांचे हक्क हिंदुस्थानांतच आहेत. आपण त्या हक्कांचा उपयोग करूं लागलों म्हणजे ते हक्क आपलेच आहेत.

हिंदुस्थानला कोणती राज्यपद्धति योग्य आहे याबद्दल सर्व ठिकाणीं हल्लीं चर्चा चालू आहे. कित्येकांच्या सोईसाठीं किंवा कित्येकांची लबाडी झांकण्यासाठीं नरम, गरम, कढत, कोमट, थंड, नेमस्त, अँग्लो-इंडियन, इंपीरियालिस्ट, लिबरल, टोरी वगैरे निरनिराळीं नांवें देऊन कितीही पक्ष कल्पिले, तरी वास्तविक पाहिलें असतां हिंदुस्थानच्या राज्यपद्धतीसंबंधानें खरे पक्ष दोनच; एक स्वतंत्रतेचा आणि दुसरा गुलामगिरीचा. आडून आडून बोलण्याचे पुष्कळ प्रकार आहेत; परंतु स्पष्ट बोलावयाचें असेल तर स्वतंत्रतेचा पक्ष हा सर्व नेटिव लोकांचा पक्ष होय, आणि गुलामगिरीचा पक्ष म्हणजे सर्व इंग्लिश लोकांचा पक्ष होय. आपल्याला आपल्या देशामध्यें स्वतंत्रता असावी असे नेटिवांना वाटणें अपरिहार्य आहे. आणि आपण एवढ्या शिताफीनें मिळविलेलें हिंदुस्थान आपल्याच ताब्यात राहावें अशी इंग्लिशांची इच्छा असली तर त्यातही त्यांच्या एका दृष्टीनें फारसें वावगें नाहीं. 'एका दृष्टीनें' असें म्हणण्याचें कारण आहे. कां कीं, सरळ दृष्टीनें पाहिलें असतां दुसऱ्याच्या वस्तूचा अभिलाष कधींही चांगला नाहीं. परंतु एक पातक केलें म्हणजे त्याच्यापुढलें दुसरें पातक करण्याची इच्छा उत्पन्न होते, आणि तें करणें अवश्य व न्याय्य आहे असें वाटूं लागतें. परंतु ही विचारसरणी अन्यायाची होय. हिंदुस्थान देश बोलून चालून

दुसऱ्याचा. तो आधीं इंग्लिशांनीं घ्यावयाचा नव्हे; परंतु देवाच्या आग्रहामुळें त्यांना तें पातक करावें लागलें! मालकाच्या गाफीलपणामुळें एखादी वस्तु त्याच्या खिशांतून जर रस्त्यावर पडली तर वास्तविक ती कोणी उचलून घेऊं नये. बरें यदाकदाचित् ती कोणी उचलून घेतलीच, तर तिचा मालक आपल्या हरवलेल्या वस्तूची आठवण होऊन ती मागूं लागला तर ती ज्याची त्याला परत दिली पाहिजे. त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील लोक आपली हरवलेली वस्तु जी इंग्लिशांनीं उचलून आपल्या खिशांत टाकली आहे ती त्यांच्या-पाशीं परत मागत आहेत. ती लोकांची वस्तु उचलून घेतली हें पहिलें पातक, आणि ती मालक मागत असतां ज्याची त्याला परत न देणें हें दुसरें पातक होय. जर पहिलें पातक केलें नसतें तर दुसरें पातक करण्याचा आज प्रसंग आला नसता. नेटिवांचें राज्य प्रथमतःच घेतलें नसतें, तर त्या राज्याच्या धन्यांनाच 'नाहीं' म्हणून कृतघ्नपणाचा, बेइमानीपणाचा, आणि विश्वासघातकीपणाचा जबाब देण्याची आज पाळी आली नसती. एखाद्या रस्त्यावर पडलेल्या वस्तूचा अमुक मनुष्य मालक आहे असें कळल्या-नंतर ती ज्याची त्याला परत देणें हाच सरळपणाचा आणि सत्यपणाचा मार्ग आहे. तुझी वस्तु कसली होती, ती तूं हरवलीस कां, तिचा तूंच मालक कशावरून, तिचे आणखी कोणी मालक आहेत कीं नाहींत, ती आमच्यापासून घ्यावी अशाबद्दल सर्व मालकांची एकवाक्यता आहे कीं नाहीं, आणि ती तुम्हांला परत दिली असतां तिचें संरक्षण करण्याची पात्रता तुमच्या-मध्यें आहे कशावरून, असले प्रश्न पुढें आणून ज्याची वस्तु त्याला देण्याची टाळाटाळी करणें हें शुद्ध लबाडीचें आणि अप्रामाणिकपणाचें लक्षण आहे. इंग्लिश लोक हिंदुस्थानासंबंधानें नेटिव लोकांशीं अशा प्रकारचे खोटे युक्तिवाद करतांना पुष्कळ वेळां आढळतात. ते नेटिवांना म्हणतात कीं, हिंदुस्थान देश तुमचा आहे खरा, तो आम्हीं घेतला आहे खरा, आणि तो तुमचा तुम्हांला आम्हीं परत देणें वाजवी आहे हेंही खरें; परंतु आम्ही तुमचें राज्य तुमच्या हवालीं केलें तर तें सुरक्षित ठेवण्याचें सामर्थ्य तुमच्या अंगात कोठें आहे? पण यावर सरळ उत्तर असें आहे कीं, त्याची चवकशी तुम्हांला कशाला पाहिजे? लोकांचें अन्यायानें घेतलेलें आपल्याला नको, अशा प्रामाणिकपणाच्या बुद्धीनें आपल्याजवळच्या पापापासून इंग्लिशांनीं दूर व्हावें

म्हणजे झालें; बाकीच्या निष्कारण उठाठेवी करीत बसून काय करावयाचें आहे? हिंदुस्थानचें संरक्षण तुम्हांला करतां येणार नाहीं, मुसलमान लोक हिंदूंवर जुलूम करतील, रशिया तुमच्यापासून तुमचा देश हिसकावून घेईल, वगैरे प्रकारचीं बयाद सांगत बसून तुम्हांला काय करावयाचें आहे? ही तुमची हिंदुस्थानबद्दलची कळकळ लबाडीची, स्वार्थाची, आणि आपलपोटेपणाची आहे. मानभावीपणाचा आव घालून हिंदुस्थान आपल्या दाढेखालून न सोडण्याचें हें लक्षण आहे. कित्येक इंग्लिश लोक न्यायीपणाचें असलें ढोंग आणतात म्हणून इतक्या स्पष्ट शब्दांनीं त्या ढोंगाचें आविष्करण करणें जरूर आहे. इंग्लिश लोकांची दुसरी एक खोटी कल्पना अशी आहे कीं, हिंदुस्थान आपल्या हातांतून जाणें हा आपला अपमान आहे, म्हणून तें राखण्याबद्दल आपण मोठा अभिमान धरिला पाहिजे परंतु हा अभिमान अगदीं चुकीचा आहे. अभिमान हा एक चांगल्यापैकीं सद्गुण आहे. परंतु अन्यायाच्या गोष्टीबद्दल अभिमान धरला असतां तो आपल्याच नाशाला कारणीभूत होतो. जो आपला देश आहे तो प्राण गेला तरी दुसऱ्याला घेऊं द्यावयाचा नाहीं असा अभिमान धरणें योग्य आहे. व सांप्रत काळीं हिंदुस्थानाबद्दल जे अशा प्रकारचा अभिमान धरीत आहेत ते पुढेंमागें स्तुतीला पात्र झाल्याशिवाय राहावयाचे नाहींत. परंतु दुसऱ्याचा देश उपटून नंतर त्याच्याबद्दल अभिमान बाळगणें ही अभिमानाची विचित्र तऱ्हा आहे! हिंदुस्थान इंग्लिशांच्या हातून गेलें, तर त्यांत इंग्लिशांना मानखंडना कां वाटावी? हिंदुस्थान हा जो लोकांचा देश तेथील पैसे लुबाडण्यांत मान वाटावा आणि ते ज्यांचे त्यांना परत देण्यांत मानखंडना वाटावी, इतकीं जगांतील नीतीचीं तत्त्वें बिघडून गेलीं आहेत काय? लोकांचा पैसा अन्यायानें घेण्याची लाज वाटावी, आणि तो त्याचा त्याला परत देण्यामध्यें धन्यता वाटावी, अशी जी मानवी मनाची स्वाभाविक प्रवृत्ति ती इंग्लिशांच्या ठिकाणीं खरोखरच इतकी बदलून गेली आहे काय? मानखंडना आणि अभिमान यांच्याबद्दलच्या कल्पना जर जगांत हल्लीं इतक्या पालटून गेल्या असतील तर हें जग आहे याच स्थितींमध्यें कायम ठेवावें कीं काय, याबद्दल देवानें विचार करण्याची वेळ खात्रीनें येऊन ठेपली आहे असें म्हटलें पाहिजे.

वर दाखविलेल्या रीतीनें ज्यांच्या न्यायाच्या, मानाच्या, आणि अभिमानाच्या कल्पना जगांतील रूढ कल्पनांशीं इतक्या विरुद्ध आहेत, अशा इंग्लिश लोकांच्या मनांत नेटिवांचें हिंदुस्थान आपल्या गुलामगिरीमध्येंच कायमचें असावें असें असले तर त्यांत कांहीं मोठेंसें आश्चर्य नाहीं. अशा इंग्लिश लोकांचा जो गुलामगिरीचा पक्ष म्हणून वर सांगितला आहे ह्या पक्षाचीची सदोदित अशी तजवीज चाललेली आहे कीं, कोणीकडून तरी नेटिव लोकांनीं आपल्या गुलामगिरीच्या नरकवासाचा अनुभव घेत स्वस्थ असावें. पण दुसरा जो स्वतंत्रतेचा पक्ष निसर्गदेवता हिंदुस्थानमध्यें निर्माण करूं लागली आहे, त्या पक्षाला या गुलामगिरीच्या सुखातिशयाचा अगदीं वीट आला आहे. असे हे दोन पक्ष उत्तर आणि दक्षिण ध्रुवाप्रमाणें एकमेकांपासून अगदीं विलग आहेत. परंतु तात्त्विकदृष्ट्या जरी यांच्यांत इतका भेद असला तरी यांच्यांत इतका भेद ठेवून व्यवहार चालूं शकत नाहीं. म्हणून व्यवहारासाठीं दोन्हीं पक्षांनाही निरनिराळीं सोंगें आणून एकमेकांजवळ जावें लागतें. स्वतंत्रतेच्या पक्षाच्या डोक्यांत स्वतंत्रतेची पुष्कळ इच्छा असली, तरी अंगांत आपली स्वतंत्रता मिळवून घेण्याचें सामर्थ्य आजमित्तीला नाहीं. त्याचप्रमाणें इंग्लिशांच्या डोक्यांत गुलामगिरीची कितीही आवड असली, तरी लाख दीड लाख भाडोत्री सैन्याच्या जोरावर तीस कोटी सज्ञान आणि स्वतंत्र होऊं इच्छिणाऱ्या प्रजेला नाखुष करण्याचें धाडस गुलामगिरीच्या पक्षाच्यानेंही करवत नाहीं. अशा रीतीनें दोन्हीही पक्ष आपापल्या परीनें थोडेथोडे लंगडे असल्यामुळें दोघेही तडजोडीच्या गोष्टी सांगून एकमेकांच्या डोळयांत धूळ फेंकण्याचा प्रयत्न करीत आहेत. लोकपक्षांमधील कित्येक आसामी कायदेशीर चळवळीचीं सोंगें आणीत आहेत, कोणी राजनिष्ठेची बतावणी वरवर करीत आहेत, आणि कोणी पुढें मुसलप्रवेश करण्याच्या इराद्यानें हल्लीं आमच्या हिंदुस्थानच्या राज्यकरभारामध्यें नुसता चंचुप्रवेश झाला तरी सर्व लोक खुष होतील अशी खोटीं निराधार आश्वासनें देत आहेत. पुढें सर्व हिंदुस्थानभर हिंदुस्थानांतील लोकांना हातपाय पसरतां यावे, म्हणून तूर्त फक्त ब्रिटिश राज्यकारभाराच्या ओसरीवर आपलें बिऱ्हाड ठेवण्याची परवानगी मागणारे कोणी, भटजी व्हाइसरॉयसाहेबांच्या एक्झिक्युटिव्ह कौंसिलमध्यें शिरूं पाहत आहेत, कोणी इंडिया ऑफिसमध्यें

शिरूं पाहत आहेत, कोणी इंडिया ऑफिसमध्यें जागा मिळविण्याचा प्रयत्न करीत आहेत. आणि कोणी अँग्लो-इंडियन लोकांना आवडतील असे काँग्रेसचे प्रेसिडेंट शोधून काढण्याच्या प्रयत्नांत निमग्न झालेले आहेत. धूर्त नेटिव लोक इंग्लिशांच्या डोळ्यांत जी धूळ फेंकीत आहेत त्या धुळीचे वर दिलेले हे कण आहेत. स्वदेशी चळवळ, बंगालच्या विभागणीविरुद्ध ओरड, औद्योगिक उन्नतीचे प्रयत्न, शिक्षणसंस्था, मुसलमानांची डेप्युटेशनें, आणि त्यांचे नवीन होणारें कान्फरन्स हेसुद्धां सगळे त्याच धुळीचे कण होत. पण ही धूळ फक्त एकाच बाजूनें फेंकण्यांत येत आहे असें नाहीं. दोन्ही पक्षांचे लोक एकमेकांच्या लुच्चेगिऱ्या समजून आहेत. बाहेरून दोन्हीही पक्ष एकमेकांशीं हंसतात, पण आंतून दोहीही पक्ष एकमेकांना फसविण्याकरितां निकरानें प्रयत्न करीत आहेत. नेटिवांप्रमाणे इंग्लिश मुत्सद्यांच्याही गोऱ्या मुठी डोळ्यांत फेंकावयाच्या धुळीनें काळ्या झालेल्या आहेत. इंग्लिश लोक नेटिवांच्या डोळ्यांत जी धूळ फेंकीत आहेत तिचे कण अनंत आहेत. त्यांची गणंना कोण करूं शकेल? हिंदुस्थानांत पाऊल टेविल्यापासून तों ते हिंदुस्थानांतून आपलें पाऊल काढून घेईपर्यंत एखाद्या जादूगाराप्रमाणें त्यांचीं सगळीं कारस्थानें धूळ फेंकण्याच्या जोरावर पूर्वी चाललीं व पुढें चालणार आहेत. हिंदुस्थानांत मिशनरी पाठविणें, त्यांच्याकडून ख्रिस्ती धर्माचा प्रसार करविणें, नेटिव राजांना विलायती नजराणे देऊन खुष करणें, त्यांच्याकडून व्यापार करण्याची सवलत मिळविणें, व्यापार करितां करितां राज्यांचाही व्यापार करूं लागणें, दोन भांडणाऱ्या नेटिव राजाच्या दरम्यान मध्यस्थी करण्याचा आव घालणें, नेटिव लोकांकडूनच नेटिव लोकांना मारविणें, राज्यें उपटण्यासाठीं दत्तकांची मनाई करणे, गुप्त रीतीनें मोडावयाच्या तहावर बाह्यात्कारी गंभीरपणाने सह्या करणें, शिक्षणाच्या मिषानें लोकांना कमकुवत करणें, सुरक्षिततेच्या मिषाने लोकांना निःशस्त्र करणें, आणि करांच्या मिषानें लोकांना निर्धन करणें, जातीजातींत फूट पाडणें, लोकांच्या अंगांत पात्रता येण्याच्या आशेवर त्यांना अवलंबून ठेवणे, म्युनिसिपॅलिट्या आणि लोकलबोर्डें यांतील केरकचरा साफ करण्याच्या कामांतच त्यांना वर्षानुवर्षे राबविणें, 'मागा म्हणजे मिळेल' या हुलकावणीवर त्यांची सर्व आशा मनच्या मनांत जिरवून टाकणें, वगैरे इंग्रजी राजकारस्थानांतील ज्या अनेक गोष्टी आहेत, ते इंग्रज

लोक नेटिव लोकांच्या डोळयांत फेंकीत असलेल्या धुळीचे कण होत. या कणांनीं आजपर्यंत नेटिव लोकांच्या डोळ्यांना पुष्कळ प्रसंगीं अधू केलेलें आहे, व अजूनही कित्येक लोक त्यामुळें फसत आहेत. हे जे अनेक कण आहेत, त्यांपैकीं बऱ्याच कणांचें मिथ्यास्वरूप लोकांच्या लक्षांत येऊन चुकलें आहे. तरीपण त्यांपैकीं कित्येकांवर कांहीं सुशिक्षित लोकांचा अद्यापिही पुष्कळ भरंवसा आहे. इंग्लिश लोकांपाशीं आपण कायदेशीर रीतीनें हक्क मागितले म्हणजे ते आपल्याला देतील अशी कांहीं लोकांची अद्यापि प्रामाणिकपणें समजूत आहे. परंतु ही अगदीं निराधार आहे. इंग्रजी धुळीच्या ज्या ह्या कणांनीं अजून कांहीं लोक आंधळे झालेले आहेत, त्या कणाचे थोडेसें पृथक्करण केलें असतां तें अप्रासंगिक होणार नाहीं.

सरकारनें हक्क देणें ही कल्पनाच तात्त्विकदृष्ट्या मोठी चमत्कारिक आहे. व सरकारकडून मिळणाऱ्या हक्कांच्या आशेमध्यें लोक गुंतून कसें जातात हाच एक मोठा पहिल्यानें विचार करण्याचा प्रश्न उत्पन्न होतो. परंतु जे विचाराचा उपयोग करतील त्यांच्या लक्षांत असल्या आशेचा वेडेपणा बिंबल्यांवांचून कधींच राहणार नाहीं. सरकार कोणतेही हक्क देऊं शकत नाहीं. सरकार ही लोकांपासून हक्क लुबाडून घेणारी एक संस्था आहे. सर्व हक्क हे परमेश्वरानें मनुष्याला दिलेले आहेत. पहिला राजा परमेश्वर होय, आणि त्याची पहिली सज्ञान प्रजा म्हणजे मनुष्य होय. या संबंधापासून मनुष्याला अनेक नैसर्गिक हक्क प्राप्त झालेले आहेत; आणि मनुष्य नैसर्गिक स्थितीमध्यें असतो त्या वेळीं तो आपल्या सर्व नैसर्गिक हक्कांचा पूर्णपणें उपभोग घेत असतो. या नैसर्गिक स्थितींत असतांना त्याचे इतर मनुष्यांशीं संबंध जडून तो आपल्या भोंवती एक कुटुंब म्हणून संस्था उत्पन्न करतो, व अशीं कित्येक कुटुंबें मिळून एखाद्या लहानशा समाजाची संस्था बनली जाते. परंतु कुटुंब आणि समाज अशा ज्या दोन संस्था सांगितल्या आहेत त्या निसर्गविरुद्ध नाहींत. मनुष्यांचे बहुतेक नैसर्गिक हक्क त्यांना या संस्थांमधून अबाधित रीतीनें पाळतां येतात व नैसर्गिक स्थितीमध्यें जसा मनुष्य राहत असतो तसाच बहुतेक तो या वरच्या संस्थांमधून राहूं शकतो. परंतु या दोन संस्थांच्या पलीकडची सरकार म्हणून जी संस्था आहे ती मात्र अतिशय घातक आहे. ही संस्था स्वाभाविक नसून कृत्रिम आणि निसर्गविरुद्ध अशी आहे. सरकार

ही संस्था मुळींच अस्तित्वांत नसली म्हणून कोणाचेंही अडावयाचें नाहीं. परमेश्वरानें मनुष्य हा प्राणी असा निर्माण केलेला आहे कीं, तो सरकाररूपी संस्थेवांचून खुशाल जिवंत राहूं शकेल आणि आनंदानें मरण पावूं शकेल. आतां असा एक प्रश्न उत्पन्न होतो कीं, जर मोठे मोठे राजे आणि बलाढ्य सरकारें नसलीं, तर लक्षावधि लोकांचे प्राण लढाईनें अगर दारिद्र्यानें कोणी घेतले असते ? हा प्रश्न थोडासा बरोबरही आहे. राजे नसते तर लढाया नसत्या आणि कृपा करणारीं सरकारें नसतीं तर लोक दरिद्री झाले नसते ! व त्यामुळे लोकांचे पैसे लोकांच्या पाशीं राहिले असते, आणि त्यांना वेळच्या वेळीं पोटभर खाता आलें असतें ! पण जुलमी राजे आणि कृपाळु सरकारें आहेत म्हणूनच लक्षावधि लोक मरूं शकतात; त्यांच्याशिवाय इतक्या लोकांचें खून कोणींही केले नसते, असें मानण्याचें कारण नाहीं. परमेश्वरानें मनुष्याला जसा जगण्याचा हक्क दिलेला आहे, त्याचप्रमाणें मरण्याचाही दिलेला आहे, आणि त्याप्रमाणें लोक यथाकालीं मेलेही असते. एवढें मात्र खरें की, जुलमी राजाच्या आणि कृपाळु सरकारांच्या अभावीं लोक पुष्कळ दिवस जगून मेले असते ; आणि परलोकांत जातांना त्यांच्या पोटांतील अन्नाच्या पिशव्या अन्नरसानें भरलेल्या राहिल्या असत्या. ज्यांना सरकार म्हणजे काय हें माहीत नाहीं असे पुष्कळ लोकसमाज पृथ्वीचे पाठीवर आनंदानें अस्तित्वांत असल्याबद्दलची अर्वाचीन इतिहास साक्ष देत आहे. कृपाळु सरकारांच्या कायदेशीर जुलमांना त्रासून पुष्कळ लोकांनीं आपल्या निरनिराळ्या वसाहती केलेल्या आहेत ; आणि सरकारपाशीं त्यांचें जर कांहीं मागणें असेल तर तें एवढेंच असतें कीं, त्या सरकार महाराजांनीं त्यांच्यापासून आपली काळजीची कृपादृष्टि मेहेरबानी करून दूर ठेवावी म्हणजे झालें ! सरकाररूपी संस्था म्हणजे लोकांच्या हक्कांचा अपहार होय. आणि तें सरकार जितकें जितकें जास्त बलाढ्य असेल तितका तितका तें सरकार लोकांच्या हक्कांचा जास्त अपहार करतें. सरकार अतिशय बलाढ्य असल्याबद्दल कित्येक मूर्ख गुलामांना अतिशय अभिमान वाटत असतो. पण हा केवढा वेडेपणा आहे ! त्यांचा बलाढ्यपणा हा आपल्यास जास्त चिरडण्याला कारणीभूत होतो, हें गुलामगिरीला संवकलेल्या डोक्यांमध्यें येत नाहीं. जो आपल्याला खाणार त्याला जितके कमी दांत असतील किंवा त्याचे जितके अधिक दांत पडतील तितके चांगले! त्याचे सगळे दांत शाबूद

आहेत, त्याच्या दांतांसारखे लांब आणि तिखट दांत कोणत्याही हिंस्त्र पशूचे नाहींत, अशा प्रकारचा स्तुतिवाद एखाद्या कोंकरानें आपल्याला खाणाऱ्या लांडग्याबद्दल करावा, हें त्या कोंकराचे केवळ पशुवृत्तीलाच शोभतें; मनुष्याच्या मनुष्यपणाला हें शोभत नाहीं. आधीं सरकार ही संस्था वाईट आणि त्यांत बलाढ्य सरकार ही संस्था तर अतिशयच वाईट! सरकार ही संस्था अस्तित्वांत आल्यावर तिचें पहिलें काम लोकांच्यापासून त्यांचे नैसर्गिक हक्क लुबाडून घेण्याचें असतें. लोकांपासून लुबाडलेल्या हक्कांवर आणि पैशावर सरकार ही संस्था उभारली जाते. असल्या सरकारापासून लोकांना हक्क काय मिळावयाचे आहेत? सरकारनें लोकांना हक्क देणें म्हणजे आपल्या स्वतःच्या शरिराला क्षयरोग लावून घेण्यासारखें आहे. म्हणून सज्ञान सरकार असली आत्मघातकी क्रिया कधींहि करणार नाहीं. तें सरकार 'देऊं दिलाऊं' करून आपल्या प्रजेला फसवील. पण खरे हक्क कधींही देणार नाहीं. लोक फारच निकराला आले तर आंधळया धृतराष्ट्राच्या कोपाला भीमाच्या लोहप्रतिमांनीं, ज्याप्रमाणें फसविण्यांत आले, त्याप्रमाणें आंधळया लोकांना खऱ्या हक्कांच्या प्रतिमांनीं फसविण्यांत येईल. परंतु आपण काय मिळविलें हें जेव्हां लोक पाहूं लागतील, तेव्हां धान्यकणांच्या ऐवजीं फोलकटच त्यांच्या हातांत पडलेलें त्यांना आढळून येईल. याकारितां अमुक राजानें किंवा अमुक पार्लमेंटनें अमुक हक्क दिले अशा प्रकारच्या ज्या बातम्या असतात त्या केवळ वृथा वल्गना होत. सरकार ही संस्था लोकांचे हक्क घेण्यांकरतां आहे. अलीकडचीं सरकारें लोकांना त्यांचे खरे हक्क देण्याकरितां नाहींत.

सरकार ही संस्था कशा लबाड्या करते, हक्क देण्यापेक्षां घेण्याचेंच काम या संस्थेकडून कसें होतें, आणि तें काम बेमालूम रीतीनें होण्याकरितां ती संस्था कसकशा लुच्चेगिरीच्या युक्त्या उपयोगांत आणीत असते, याचा विचार केला असतांना यावर लोकांच्या हातांत कांहीं तोड आहे किंवा नाहीं, हा प्रश्न साहजिकपणेंच उत्पन्न होतो. म्हणून लोक जरा निराळ्या दृष्टीनें या प्रश्नाकडे पाहूं लागतील तर ह्या अपायाचा उपाय आपल्याच हातांत आहे, असें त्यांना आढळून येईल. वर सांगितलें आहे कीं, सरकार ही संस्था लोकांचे हक्क हरण करून घेते. पण सरकार लोकांचे हक्क काढून घेतें. म्हणजे काय करतें? लोकांच्या खिशांतील पैसे करांच्या युक्तीनें ज्याप्रमाणें सरकार घेतें, त्याप्रमाणें

लोकांच्या खिशांत हक्क म्हणून कांहीं जिनसा असतात आणि त्या सरकार काढून घेतें असा याचा अर्थ आहे कीं काय ? असें मुळींच नाहीं. एखादा तैमुरलंग किंवा नादिरशहा, क्लाइव्ह किंवा हेस्तिंग्ज लोकांपासून वाटतील तितके पैसे नेऊं शकेल; पण त्यांचे हक्क तो कोठेंही नेऊं शकणार नाहीं. लोकांचे हक्क लोकांच्याच जवळ असतात. सरकार ते हक्क काढून घेतें म्हणजे त्या हक्कांचा उपयोग करण्याची बंदी करतें एवढेच काय तें. ती त्यांची बंदी लोकांनीं जुमानली नाहीं म्हणजे लोकांचे हक्क लोकांच्या जवळच आहेत. तैमुरलंगानें किंवा नादिरशहानें आणि क्लाइव्हनें किंवा हेस्तिंग्जने हिंदुस्थानांतील पैसा उचलून इराणांत आणि इंग्लंडमध्यें नेलेला आहे, त्याप्रमाणें हक्कांचें नाहीं. हिंदुस्थानांतील लोकांचे हक्क हिंदुस्थानांतच आहेत. कोणत्याही लुटारूला, उचल्याला, भामट्याला, अगर शहाजोग दरवडेखोराला ते येथून हलवतां येणार नाहींत. आपण त्या हक्कांचा उपयोग करूं लागलों म्हणजे ते हक्क आपलेच आहेत. सरकार या संस्थेच्या आपमतलबी मनाईला आणि प्रतिबंधाला न जुमानतां लोक आपापल्या गरजा भागवून घेऊं लागले म्हणजे ते हक्क लोकांना मिळाले असें झालें, आणि सरकारच्या हातांत ते हक्क उरले नाहींत असेंही झालें. सरकारची मनाई मोडण्याचें सामर्थ्य लोकांच्या अंगांत नाहीं, तोंपर्यंत लोकांचे सर्व हक्क सरकारच्या हातांत असणार, आणि सरकाचा दरारा सर्व लोकांनीं एकत्र होऊन लगट करून एकदां मोडून टाकला म्हणजे लोकांचे हक्क सरकारच्या हातांत कांहींएक राहिले नाहींत. वेदांतांतल्याप्रमाणें राजकारणांतसुद्धां सर्व कांहीं आपलें आपल्यापाशींच आहे. तें शोधावयाला दूर जावयाला नको. रज्जूवर सर्पाचा भास झाल्यामुळें लोक भयग्रस्त होतात. परंतु हे मिथ्याज्ञानजन्य भय एकदां नष्ट झालें, म्हणजे सर्वत्र मोक्ष आणि ब्रह्मानंदच भरून राहिला आहे !

## औट घटकेची राज्यक्रांति : : : १८

काळ: अग्रलेख, ता. १४-९-१९०६

● क्रान्तिकारक बंगालचे पुढारी सुरेंद्रनाथ बानर्जी यांना राज्याभिषेक झाला. पण या राजाचें सैन्य कोठें आहे? सुरेंद्रनाथ एका ठिकाणीं व्याख्यानास गेले असतां कोणीं त्यांच्या डोक्यावर पुष्पहार ठेवला आणि कोणी शास्त्र्यांनीं शांत्यभिषेक केला. लगेच पुकारा झाला कीं सुरेंद्रबाबूंनीं जनतेचा राजा म्हणून राज्याभिषेक करून घेतला. हें प्रकरण विलायतेंतही पुष्कळ गाजलें. टिळक-चरित्रांत केळकर म्हणतात, या राज्यारोहणाच्या नवलकथेच्या मुळाशीं तथ्य इतकेंच होतें कीं, पंचगौड पंडित पोथीपुराणाचा सप्ताह करतात, त्याच्या शेवटीं त्याला विशेष प्रकारचीं पुष्पभूषणें अर्पण करण्याची चाल आहे, तसलाच प्रकार याही प्रसंगीं झाला.

आरोपिताचा बचाव या दृष्टीनें हे समर्थन आणि उठावणीचा पुरस्कार या दृष्टीनें काळकर्त्यांचे विचार तुलना करण्यासारखे आहेत.

हिंदूंच्या वेदांतशास्त्रामध्यें विवर्तवाद म्हणून एक वाद सांगितलेला आहे. जगामध्यें पुष्कळ तत्त्वज्ञानें आहेत. परंतु ही विवर्तवादाची कल्पना इतक्या उत्कृष्ट रीतीनें मांडलेली दुसरीकडे कोठें क्वचित् आढळेल. जी वस्तु वास्तविक नाहीं, तिच्याबद्दल आभास उत्पन्न होणें याचें नांव विवर्त. जेथें साप नाहीं तेथे साप आहे, अशी कल्पना उत्पन्न होणें, हें विवर्तवादाचें नेहमींचें ठराविक

उदाहरण होय. या जडसृष्टीचें सूक्ष्म सूक्ष्म कारण शोधीत जातां जातां सूक्ष्मापासून सूक्ष्मतरापर्यंत आणि सूक्ष्मतरापासून सूक्ष्मतमापर्यंत मनुष्याची बुद्धि कारणें शोधीत आणि त्यांच्या पायऱ्या लावीत कशी गेली, हें तत्त्वज्ञानाच्या इतिहासाचीं पुस्तकें वाचलीं असतां कोणाच्याही लक्षांत येण्यासारखें आहे. परंतु हिंदुस्थानांतील वेदांत्यांसारख्या कुशाग्रबुद्धीच्या लोकांना ही सूक्ष्मतम कारणाचीसुद्धां कल्पना समाधानकारक न वाटून त्यांनीं त्या सूक्ष्मतमतत्त्वाच्या कल्पनेचा इतका कडेलोट केला कीं, अखेरीस हें सर्व जग वस्तुतः नाहींच, हा सर्व भ्रम आहे, असें म्हणण्यापर्यंत त्यांची मजल गेली. या मतांप्रमाणें परमेश्वर कांहीं एक जड उपादानकारण न घेतां ही खोटी सृष्टि उत्पन्न करूं शकतो, असा सिद्धांत आहे. आणि या सिद्धातांवर विश्वास ठेवणारे लोक आजपर्यंत असें समजत होते कीं, इतकी बेमालूम खोटी सृष्टि उत्पन्न करण्याची शक्ति फक्त त्या एका सर्व शक्तिमान् परमेश्वराच्याच अंगामध्यें आहे. पण अलीकडे असें आढळून आलें आहे कीं, ही कला इतर लोकांनाही साध्य झाली आहे. हें म्हणणें म्हणजे देवाच्या शक्तीचा अधिक्षेप करण्यासारखें नास्तिकपणाचें काम आहे, असें जर कोणाला वाटत असेल तर त्यांनीं थोडा वेळ दम धरावा.

गेल्या ऑगस्ट महिन्यांतील अगदीं अखेरच्या अशा एके दिवशीं हिंदुस्थानच्या सिंहासनावर राजा सुरेंद्रनाथ बानर्जी यांना राज्याभिषेक करण्यांत आला. छत्र, चामर, वगैरे सर्व राजचिन्हें त्यांच्यावर धरण्यांत आलीं. हिंदुस्थानचें राष्ट्रीय निशाण जवळ फडकतच होतें. सर्व लोकांचा आनंद पोटांत मावेनासा झाला. आपले सुखाचे दिवस आतां आले असें वाटून सर्व राष्ट्र स्वतंत्रतेच्या सौख्यसागरांत निमग्न होऊन गेलें. आणि राजा सुरेंद्रनाथ यांच्या शकाला त्या दिवसापासून सुरवात झाली. परंतु राजा सुरेंद्रनाथ यांना नुसतें तक्तावर बसवून काय उपयोग? सैन्यावांचून राजा कसा होईल? आणि लढाऊ लोकांच्या पाठबळावांचून राजाचें राज्य कसें कायम होईल? इंग्लिशाचे हिंदुस्थानावर अनंत उपकार आहेत. त्यांनीं आजपर्यंत हिंदुस्थानांतील लोकांना पुष्कळ बारीक सारीक हक्क देऊन पाहिलें. म्युनिसिपालिट्या दिल्या, लोकलबोर्डें दिलीं, थोडेंसें शिक्षण दिलें, कौन्सिलमध्यें नेटिव मेंबर घेऊन पाहिलें, कॅडेट कोअरचें सोंग करून फसतात किंवा नाहीं तें पाहिलें, मिठावरील

कर गुंज–पाव गुंज–कमी करून अल्पसंतोषी लोकांनीं संतुष्ट व्हावें म्हणूनही प्रयत्न केले; पण साखरेंत घोळले आणि तुपांत तळले, तरी नेटिव लोक कडू ते कडूच! नेटिव लोकांचा इतका जेव्हां निर्धार दिसला, आणि स्वतंत्र स्वराज्यावांचून ह्यांची महत्त्वाकांक्षा परिपूर्ण व्हावयाची नाहीं, असा जेव्हां पक्का निश्चय ठरला, तेव्हां यांची पुरीच हौस तृप्त केली पाहिजे, असा कलकत्ता, अलाहाबाद, मुंबई, वगैरे ठिकाणच्या कित्येक उदारबुद्धीच्या इंग्लिश लोकांनीं एके दिवशीं एकत्र जमून आपसांत एक गुप्त कट केला. हिंदुस्थानांतलि लोकांना स्वतंत्र स्वराज्य द्यावयाचें, तर राज्यक्रांतीवांचून स्वतंत्रता कशी उत्पन्न होईल, हा प्रश्न त्यांच्यापुढें येऊन त्यांनीं इष्ट हेतूसाठीं हिंदुस्थानांत राज्यक्रांति घडवून आणण्याचें मुक्रर केलें. परंतु हिंदुस्थानांत राज्यक्रांति घडवून आणण्याचें कांहीं सोपें काम नाहीं. प्रत्यक्ष अँग्लो-इंडियन लोकांनीं ही गोष्ट करण्याचें मनांत आणलें म्हणून काय झालें? हिंदुस्थानामध्यें काळेगोरे मिळून सुमारें ब्रिटिश सरकारचें दोन लक्ष सैन्य जय्यत तयार असतां त्यांच्याविरुद्ध राज्यक्रांति शक्य कशी व्हावी? एडवर्ड बादशहाच्याविरुद्ध राजा पहिला सुरेंद्रनाथ बानर्जी याला अंग्लो-इंडियनांनीं राज्याभिषेक करून राजा तयार केलें होतें हें खरें. पण नुसता राजा काय कामाचा? याकरितां, त्या राजाला सैन्याची कुमक देण्यांत आली. परंतु राजकारस्थानाचीं पाताळयंत्रे न जाणणारे बाबळट लोक असा प्रश्न विचारतील कीं, हे सैन्य एकदम कोठून आलें? हें सैन्य इतके दिवस होतें कोठें? आणि हें आम्हांला कळलें नाहीं कसें? यावर उत्तर असें आहे कीं, मूर्ख लोकांनों, हें सैन्य इतके दिवस गुप्त होतें. अंग्लो-इंडियन लोकांना जेव्हां त्याची गरज लागली तेव्हां त्यांनीं तें आयत्या वेळीं उकरून काढून राजा सुरेंद्रनाथ यांच्या हवालीं केलें! हिंदुस्थानांतील स्वतंत्रतेची राज्यक्रांति यशस्वी होण्याकरितां ब्रिटिश सरकारच्या दोन लक्ष जय्यत सैन्याविरुद्ध राजा सुरेंद्रनाथ यांच्या बाजूनें बरेंच सैन्य पाहिजे होतें. परंतु प्रथमारंभींच इतकें सैन्य जमा होणें शक्य नाहीं, असें वाटल्यावरून तूर्त फक्त पन्नास हजार सैन्यानिशीं राज्यक्रांतीच्या लढाईला सुरवात करावी असें ठरविण्यांत आलें, व एकदां हिंदुस्थानच्या स्वतंत्रेसाठीं लढाई सुरू झाली अशी बातमी चोहोंकडे पसरली म्हणजे एक कोटी लोक राजा सुरेंद्रनाथ यांच्या निशाणाखालीं जमतील, असा बरोबर अंदाज गृहीत धरण्यांत आला. कवाईत शिकलेल्या दोन लाख

सैन्याविरुद्ध बाजारबुणगे कां होईनात, पण जर एक कोटी लोक लढाईला उभे राहतील, तर हिंदुस्थानांतील राज्यक्रांतीला यश येईल किंवा नाहीं याबद्दल शंका घेण्याचें कांहीं कारणच नाहीं. अशी सर्व बाजूंनीं अटकळ बांधून "सोनेर बंगला" असें आरंभींच्या पन्नास हजार सैन्याला नांव देऊन लढाईला सुरवात करण्यांत आली. परंतु राजा सुरेंद्रनाथ यांची कारकीर्द नवीनच सुरू झालेली असल्यामुळें त्यांना आपल्या राज्यांत लढाईच्या वेळीं उपयोगी पडणारी "रेड क्रॉस सोसायटी" स्थापन करण्याला अद्यापि फुरसत सांपडली नव्हती. त्यामुळें लढाईत जे फिरंगी जखमी होतील त्यांची वाट काय करावी, याची मोठी काळजी येऊन पडली. परंतु अखेरीस बहुमतानें असें ठरलें कीं, फिरंग्यांचीं धडें फाडून गंगेंत टाकून देण्याला बंगाल्यांतील गिधाडांना परवानगी असावी, अशी सर्व व्यवस्था होऊन राज्यक्रांतीला सुरवात झाली. सर बॉम्फील्ड फुलर यांच्या राजीनाम्यामुळें जरी सर्व मुसलमान लोक हिंदूंच्याविरुद्ध नाराज झाले होते तरी कांहीं गुप्त फकिरांनीं त्यांना कानांत गुप्त मंत्र सांगितल्याबरोबर त्यांच्या झुंडीच्या झुंडी दररोज या राज्यक्रांतीच्या निशाणाखालीं जमा होऊं लागल्या. व राज्यक्रांतीची सर्व तयारी होऊन, आतां बंडाला सुरवात होणार ; पण इतक्यांत एकजण मध्येंच मोठ्यानें ओरडून म्हणाला, "थांबा, थांबा ! तुम्ही अर्धेमधें हें बंड कसें करतां ? आतांच हें बंड करण्याला कांहीं तरी निमित्त पाहिजे. हिंदुस्थानांतील लोकांवर परकीयांचा अतिशय जुलूम चालला आहे, हें जर निमित्त तुम्ही म्हणाल तर तो जुलूम रोजचाच असल्यामुळें आजच्याच बंडाला तें निमित्त कांहीं योग्य दिसणार नाहीं. याकरितां याला दुसरें कांहीं तरी अतिशय सबळ कारण शोधून काढलें पाहिजे !— थांबा, थांबा ! सुचलें !— पण जरा थांबा मोजून पाहूं द्या !— किती बरें बाकी उरते ?—हं, सहांतून सात गेले, बाकी उरले नऊ ! हं, ठीक आहे !— पण एक कमी येतो !—१९०६ मधून १८५७ वजा दिले असतां ४९ बाकी उरते ! एका आंकड्यानें सगळीं घाण केली ! नाहीं तर कसें छान जमून येत होतें. पण एकूणपन्नासाव्या वर्षीच ज्युबिली करण्याची चाल कां पडली नाहीं ?–अथवा जेथें इतकें महत्वाचें राष्ट्रीय काम हातघाईवर आलें आहे तेथें एका वर्षासारख्या बारीकसारीक मुदतीच्या फरकाकडे पाहण्याची आपल्याला फुरसत कां असावी ?—हं, चला, ठरलें ! ही १८५७ सालच्या बंडाची ज्युबिली

होय ! एकूणपन्नास म्हणजे पन्नासच होय कीं नव्हे ? अलबत होय !— आणि एखाद्या गोष्टीला पन्नास वर्षे झालीं म्हणजे तिची ज्युबिली झालीच पाहिजे ! विलायतेंत एका नाटकांत नाचणाऱ्या टेरी नांवाच्या पोरीचीसुद्धां ज्युबिली झाली होती ! हें संभावित आणि प्रतिष्ठित उदाहरण आपल्या पाठीमागें असल्यावर मग काय हरकत आहे ?— कोणीविचारलें तर खुशाल सांगावें कीं, ही १८५७ सालच्या बंडाची ज्युबिली आहे ! अशा रीतीनें या राज्यक्रांतीला हें सयुक्तिक निमित्त सांपडून हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत जिकडे तिकडे दंगल उडून गेली. राजा सुरेंद्रनाथ यांचा जिकडे तिकडे दिग्विजय होऊं लागला. आपल्या बूट घातलेल्या पायांचा धूळ प्रसाद म्हणून तो आपल्या प्रीतीतील सर्व भक्त आणि तोंडपुजे लोकांना वाटूं लागला. जिकडें तिकडे सुरेंद्रनाथ स्वतंत्र हिंदुस्थानचे पहिले राजे झाले असें लोक बोलूं लागले. ही बातमी फारच पसरल्यामुळें आपल्या डोक्यावर अजून मुकुट आहे कीं नाहीं, असें पाहाण्याकरितां एडवर्ड साहेबांनींही एकदां आपल्या डोकीला कोणी पाहत नाहीं असें पाहून, चटकन् हात लावून पाहिला, असें तिकडील लोक सांगतात ! आणि हिंदुस्थानचें शिक्कामोर्तब सिमल्यास आपल्या बंगल्यांतच आहे, किंवा कलकत्त्यांतील बालराम घोस यांच्या स्ट्रीटवरील तुळशीराम घोस यांच्या घरीं गेलें आहे, याचा बारकाईनें तपास करण्याकरितां डिटेक्टिव बॅंचमधील सर्वांत अतिशय वस्ताद डिटेक्टिव नेमण्यांत आले होते. राजा सुरेंद्रनाथ आणि त्यांचें एक कोटपर्यंत वाढणारें पन्नास हजारांचें सैन्य यांच्या दराऱ्यामुळें कलकत्त्यांतील "इंग्लिश-मन" पत्र नवीन संपादन केलेल्या तिबेट देशाच्या सरहद्दींत बसून प्रसिद्ध करावें असें वाटूं लागलें, आणि एशिया खंडांतील प्रमुख अशा वर्तमानपत्राच्या मजकुराच्या कॉप्या बंदरांतील आगबोटीवर आदळणाऱ्या लाटांच्या तुषारांनीं ओल्या होऊं लागल्या. राजा सुरेंद्रनाथांच्या पराक्रमानें जिकडे तिकडे अशी दुर्दशा झालेली पाहून फक्त प्रयागचे महर्षि क्रोधायमान झाले, व त्यांनीं आपल्या शापवचनाचा या बंडवाल्यावर भडिमार करण्याला सुरवात केली. भोळ्या लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकण्यासाठीं भैदांप्रमाणें तीर्थाच्या ठिकाणीं गोडीगुलाबीचे पांघरूण घेऊन जे आजपर्यंत लोकांना भावार्थाच्या गोष्टी सांगत होते कीं, आम्हांला काय करायचें आहे,

तुम्ही योग्य झालां म्हणजे तुमचें राज्य तुमच्या हवाली करून आम्हीं आपल्या गांवीं जाऊं, तेच आतां वाघासारखे चवताळून अशा किंकाळ्या फोडूं लागले कीं, The British mean to continue their supremacy आणि परस्पर लोकांच्या भाड्याच्या गाडींत एखादें माणूस जास्त बसलें तर लगेच गाडीच्या घोड्याला ओझें होईल म्हणून ज्यांचें अंतःकरण दयेनें तिळतिळ तुटत असतें ते दयेच्या पांघरुणाखालील आपलें खरें स्वरूप असें सांगूं लागले कीं, The tiger qualities of an imperial race are not dead ; they merely sleep. हे भयंकर शाप ऐकून बंगाली लोक आपलें बंड बंद करतील असें कोणाकोणाला वाटलें होतें, व राजा सुरेंद्रनाथ हे पहिल्याप्रमाणें स्थानिक लेजिस्लेटिव्ह कौन्सिलच्या ताटाखालील ना. सुरेंद्रनाथ बानर्जी होतील अशी समजुत होती. व हें राज्याभिषेकाचें बंड फैलावणार नाहीं अशी आशा होती. पण "अमृतबझारपत्रिके" नें अगदीं खात्रीपूर्वक इंग्लिश लोकांना सांगितलें कीं, राजा सुरेंद्रनाथ यांनीं आपल्याला राज्याभिषेकच करवून घेतला आहे. त्यामुळें सर्वांना मोठी धास्ती पडून हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्य अगदीं डळमळूं लागलें आणि हिंदुस्थानची स्वतंत्रता आपलें डोकें वर काढूं लागली. या स्वतंत्र होत चाललेल्या हिंदुस्थानच्या गादीवर कोणाला बसवावें, याच्याबद्दल मध्यंतरीं थोडासा मतभेद उत्पन्न झाला होता. एका पक्षाचें असें म्हणणें होतें कीं, ना. गोखले यांचा या गादीवर विशेष हक्क आहे. परंतु राजा सुरेंद्रनाथ यांनीं ना. गोखले येथें नाहींत अशी संधि पाहून ते येण्याच्या आधींच आपल्याला राज्यभिषेक करवून घेतला. ना. गोखले इतक्यांतच हिंदुस्थानांत परत येतील आणि ते आल्यावर इंग्लिशांनीं रिकाम्या केलेल्या हिंदुस्थानच्या गादीकरतां राजा सुरेंद्रनाथ आणि ना. गोखले या दोन वारसांमध्यें परकीयांकडून गृहकलह पेटवून दिला जाईल कीं काय, अशी भीति होती. पण ना. गोखले यांना फक्त सुराज्यच पाहिजे असल्यामुळें हिंदुस्थानच्या स्वराज्यावर हक्क सांगण्याला ते उभे राहणार नाहींत. अशा खात्रीनें राजा सुरेंद्रनाथ यांचा गादीवरील हक्क कायम झाला. आणि अशा रीतीनें सर्व बाजूंनीं संकटाचें निरसन होऊन अँग्लो-इंडियनांनीं सुरू केलेली राज्यक्रांति अव्याहतपणें अतिशय जोरानें जिकडे तिकडे फैलावत जाऊन तिचे हेतु शेवटास गेले. या राज्य-

क्रांतीचे जाहीरनामे खुद्द इंग्लिश पत्रांनीं सर्व हिंदुस्थानभर वाटले आणि विलायतेस तारेनें कळविले. आणि हिंदुस्थानांतील लोकांच्या स्वतंत्रतेची द्वाही साहेबलोकांनीं दौंडी पिटवून सर्वत्र श्रुत कराविली.

इतकी उलथापालथ, इतकी मोठी राजक्रांति, आणि इतका भयंकर बंडावा झालेला ऐकून पुष्कळ लोक घाबरले. रुपयावर शिक्का एडवर्डचा आहे किंवा राजा सुरेंद्रनाथचा आहे, हें अलीकडचे रुपये काढून लोक तपासूं लागले. एकजण पत्र लिहिते वेळीं राजा सुरेंद्रनाथांच्या शकाची आज कितवी तारीख म्हणून विचारूं लागला! कोणी आपआपल्या जवळच्या किल्ल्यावर बावटा कोणता फडकतो आहे—काळा कीं जरिपटक्याचा—हें पाहण्याकरितां धांवूं लागले. भिंतीवर जाहिराती लावण्याची जेथें जागा असते तेथें राजा सुरेंद्रनाथ हे राजे झाल्याबद्दलचे जाहीरनामे लागले असतील म्हणून ते वाचण्याकरितां लोकांचे थवेच्या थवे जमा झाले. गिधाडांनीं गंगेंत फेंकून बाकी उरलेले फिरंगी आपल्या देशाकडे परत कधीं फिरणार म्हणून जे ते आपल्याशीं तर्क करूं लागले. राजा सुरेंद्रनाथ हा दिल्लीस जाऊन आपल्याला बादशहाचा किताब घेईल तो दरबार कधीं होणार, याची बातमी काढून यांत आपल्याला बोलावणें यावें म्हणून पुष्कळ जुने तोंडपुजे लोक पगडी फेरवून प्रयत्न करूं लागले! आणि आपल्या प्रॉमिसरी नोटांचे रोख रुपये बदलून नेण्याकरितां हजारों पेन्शनरांच्या झुंडीच्या झुंडी कानपट्या बांधून काठ्या टेंकीत, खोंकत आणि चांचपडत बँकांच्या रस्त्याकडे निघाल्यामुळें त्या त्या रस्त्यावरील वाटसरूंना आपली दिशा बदलून दुसऱ्या रस्त्यांनीं यावें लागलें.

अशी स्थिति इसवी सन १९०६ च्या सप्टेंबर महिन्याच्या १० तारखेच्या सूर्योदयापर्यंत चालली होती. परंतु सूर्य उगवला, सोमवारचा वार सुरू झाला आणि त्या दिवशीचा ‘टाइम्स’ बाहेर पडला त्याबरोबर “The Situation in India” (हिंदुस्थानची स्थिति) एकदम बदलली. जो सोनेरी बंगालच्या राज्यक्रांतिकारक गुप्त मंडळीचा नवीन शोधून काढलेला म्हणून जाहीरनामा होता, तो अखेरीस एक शिळाच खर्डा आहे असें ठरलें! ‘टाइम्स’ला असें वाटलेंच होतें! तरी पण घटकाभर मौज करण्या-

साठीं या जाहीरनाम्याच्या प्रसिद्धीनें जिकडे तिकडे इंग्लिश पत्रांनीं गडबड उडवून दिली ! हा जाहीरनामा नवा नाहीं ! आठनऊ महिन्यांचा शिळा आहे. हाच, अथवा बहुतेक हाच, जाहीरनामा 'लंडन टाइम्स'मध्यें मे महिन्यांत छापलेला होता. इतकेंच नव्हे तर, 'लंडन टाइम्स'चा अंक मुंबईच्या 'टाइम्स'च्या टेबलावरदेखील आहे ! तेव्हां फकीर, गिधाडें, १८५७ सालची ज्युबिली, पन्नास हजार रोख लोक आणि एक कोटि उधार लोक वगैरेबद्दलची क्षिति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं. अशा रीतीनें सैन्याचा आधार तुटल्यामुळें एकटा राजा काय करणार ? तरी पण त्याच्यावरही कांहीं तरी शस्त्र फेंकलेंच पाहिजे, एरवीं तो दबणार नाहीं म्हणून त्याच्यावर चिखलाचें अस्त्र सोडण्याची तजवीज करण्यांत आली आहे. अशा रीतीनें राजा आणि सैन्य यांचें काल्पनिक सामर्थ्य आपल्या कात्रीनें कापून टाकून ॲंग्लो-इंडियन पत्रकारांनीं फिरून हिंदुस्थानच्या राज्यलक्ष्मीचा ढांसळलेला दगड नीट बसविला आहे. आतां टाइम्सचें सर्वांना सांगणें आहे कीं, इतःपर कोणी भिण्याचें कारण नाहीं. हिंदुस्थानची हवा आतां स्वच्छ झाली आहे. ना. गोखले येत्या मेलनें हिंदुस्थानांत येणार आहेत, त्यांच्या वर मोठी भिस्त आहे. त्यांना बऱ्याच युक्त्यांनीं आधीं चढवून ठेवण्याचा प्रयत्न करण्यांत आलेला आहे व या जाळ्यांत ते बहुधा सांपडल्यावांचून राहणार नाहींत. तसेंच कॉंग्रेसमध्यें जमणारे सुशिक्षित लोक जरी जातिभेदासारखे क्षुल्लक भेद मानीत नाहींत. तरी नेमस्त आणि जहाल हा जातिभेद त्यांच्यांत आहे आणि आमच्यासारख्या कुशल ॲंग्लो-इंडियन कारागिरांनीं या मतभेदाच्या जातिभेदावर मेहनत करून कॉंग्रेसमध्येंही फूट पाडण्याची तजवीज करून ठेविली आहे. नेमस्त लोकांना बरेंच चिथविण्यांत आलें आहे, व घोड्यावर बसविण्याच्या बेतांत आणलें आहे. तुम्ही कायदेशीर चळवळीच्या मार्गानें हजारों वर्षें खुशाल चळवळ करा असा उपदेश करण्यांत आलेला आहे. जहाल पक्षाचीं मतें आपल्याला पसंत नाहींत असा नेमस्तांनीं एक ठराव पास करून घ्यावा म्हणजे आम्हा घाबरलेल्या साहेबलोकांचा तुमच्यावर विश्वास बसेल असें सांगून नेमस्त लोकांना हरभऱ्याच्या झाडांवर चढविलें आहे. आणि दुसरी एक युक्ति तर अशी योजिली आहे कीं, तिच्या योगानें सर्व चळवळ करणाऱ्या बाबूंचे हातपायच मोडून जातील ! यंदांच्या कॉंग्रेसची बैठक कलकत्त्याहून अजीबात उचलून ती नागपूरच्या

नेमस्त हवेंत आणून ठेवण्याबद्दल एक गुप्त मंडळी गुप्त रीतीनें खटपट करीत आहे. या सगळया युक्त्यांना बहुतेक यश येईलच. लोकमान्य टिळक यांना अध्यक्ष करण्याबद्दल बाबू बिपिनचंद्र पाल यांची जी खटपट चालली होती, ती अँग्लो-इंडियन लोकांच्या बगलेतील बिनविषारी स्वेदज नेमस्तांकडून बहुतेक हाणून पाडल्यासारखी केली आहे. दहा दहा वेळां होऊन गेलेल्या अध्यक्षांपैकीं मि. दादाभाई यांच्यासारख्यांना पुढें आणून नवीनांची वाट बिनबोभाट अडवून टाकल्यासारखी केली आहे. त्यामुळें त्या दिशेनेंही फारशी भीति नाहीं. तरीपण जहाल पक्ष मोटा उपद्व्यापी आहे. तो त्याच्यावर क्लृप्ति योजितो कीं काय हें पाहावयाचें आहे. अशा रीतीनें सर्व व्यवस्था नीट झालेली आहे. आतां कोणाही अँग्लो-इंडियनाला शंका बाळण्याला कारण नाहीं. १८५७ सालच्या बंडाची ज्युबिली होत नाहीं आणि फिरंगी लोकांना गंगेंत कोणीही टाकीत नाहीं. आतां सर्वांनीं स्वस्थ असावें व आहे त्या स्थितींत संतोष मानून सर्वांनीं बाबू सुरेंद्रनाथ यांना कर न देतां इंग्लिशांना द्यावेत !

अहो, प्रॉमिसरी नोटांचे पैसे मागण्याकरितां बँकेमध्यें जाणारे उतावीळ लोकहो, फिरा माघारे ! अजून इंग्रजांचें राज्य आहे आणि तें चालू ठेवण्याचा त्यांचा विचार आहे !



## एक कल्पित गोष्ट : : : १९

काळ : अग्रलेख, ता. १५-२-१९०७

बंगाल्यांत 'गोल्डन बेंगाल'ची गुप्त मंडळी उघडकीस आली त्या वेळीं हिंदुस्थानांतील इंग्लिशांचें खरोखरच धाबें दणाणून गेलें होतें. हिंदुस्थानांतील लोक आपल्या जुलमामुळें खरोखरच चिडले आहेत कीं काय, आपलें हृद्गत उघड रीतीनें बोलतां येत नाहीं म्हणून त्यांनीं खरोखरच अनेक ठिकाणीं गुप्त मंडळ्या काढल्या आहेत कीं काय, आणि गुप्त रीतीनें हत्यारें जमवून या सगळ्या गुप्त मंडळ्यांच्या मनांतून इंग्लिशांना खरोखरच हिंदुस्थानांतून हांकलून द्यावयाचें आहे कीं काय, अशा त्यांच्या मनांत अनेक शंका उत्पन्न होऊं लागल्या होत्या. आणि म्हणून कोण काय बोलतात, कोण काय करतात, हें जाणण्यासाठीं गुप्त हेरांचे तपास विशेष जारीने सुरू करण्यांत आले होते. हे गुप्त हेर दिवसा निरनिराळीं सोंगें घेऊन लोकांत मिसळत असत आणि रात्रीचीं लोकांचीं बोलणीं आडून ऐकत असत. असा क्रम बंगाल्यांत पुष्कळ दिवस चालू असतां एके वेळीं एका मोठ्या शहरांत एक फारच चमत्कारिक गोष्ट घडून आली.

ज्याप्रमाणें भित्र्या मनुष्याला प्रत्येक काळोखामध्यें भुतें दिसतात, त्याप्रमाणें संशयग्रस्त मनुष्याला पाहिजे त्या ठिकाणीं शंकास्थानें भासूं लागतात. तशी वर सांगितलेल्या गुप्त हेरांची स्थिति झालेली होती. हे गुप्त हेर एका शहरांत रात्री-च्या प्रहरीं कोण काय बोलतें हें ऐकण्याकरितां फिरत असतां बाजूला असलेल्या साधारणपणें एका पडक्या व ओसाड घरांत त्यांना कांहीं संशय येण्यासारखे शब्द ऐकूं आले. तेव्हां येथें कांहीं तरी बंडाचा बेत चालला असला पाहिजे

असा त्यांना संशय आला. म्हणून त्याची शहानिशा करण्याकरितां ते गुप्त हेर दुसऱ्या दिवशीं रात्रीं त्याच वेळेच्या सुमारास त्या घराजवळ येऊन बसले. तेव्हांही आदल्या दिवसाप्रमाणेंच 'स्वदेश', 'स्वराज्य', 'स्वतंत्रता', 'राज्यक्रांति' इत्यादि शब्द त्यांच्या कानावर आले. तेव्हां त्यांची पक्की खात्री झाली कीं, 'सोनेरी बंगाल'च्या गुप्त मंडळीपैकींच एखादी शाखा येथें असली पाहिजे. गुप्त हेरांच्यासारखी स्वदेशद्रोहाचीं आणि नीचपणाचीं कामें जे पत्करतात ते स्वदेशस्थितीच्या अज्ञानामुळें आणि पोट भरण्याच्या अशक्ततेमुळेंच पत्करतात. तेव्हां स्वाभाविकपणेंच असल्या नीच धंद्यांत आपण अधिक नीचपणा केला तर आपल्याला अधिक बक्षीस अगर बढती मिळेल असें त्यांना वाटत असतें. त्याप्रमाणें ज्या गुप्त हेरांना या गुप्त शाखेचा सुगावा लागला, त्यांना आपल्याला अकरावाच गुरु आला आहे असें वाटूं लागलें. आतां आपण हा गुप्त कट शोधून काढल्याची बातमी साहेबांना जाऊन सांगूं, ते आपल्यावर खूष होणार, आपण हिंदुस्थानचें कोट्यवधि रुपयांचें राज्य त्यांच्याकडे कायम राखलें याबद्दल आपण त्यांच्याकडून दहापाच रुपयांची तरी बढती मांडून घेणार, असें मनोराज्य करीत ते आपल्या पुढल्या उद्योगाला गेले. इतकी मोठी शिकार हातीं लागण्याची खात्री वाटूं लागल्यानंतर मग अर्थातच मध्यंतरीची वेळ अतिशय सावकास चालली आहे असें कोणाला वाटणार नाहीं ! 'सोनेरी बंगाल'च्या शाखेच्या अस्तित्वाची बातमी साहेबांपर्यंत जाऊन पोहोचली व त्याच दिवशीं म्हणजे ता. २८ रोजीं रात्रीं सदर ठिकाणीं जाऊन सदर शाखेंतील सर्व मंडळींना एकदम चारी वाटा बंद करून पकडण्याविषयीं गुप्त हुकूम सुटले. ज्यांनीं शाखा हुडकून काढली होती त्यांना तर सूर्य इतका सावकाश कां चालतो याबद्दल आश्चर्य वाटूं लागलें होतें. व ज्या वेळेला पोलिसांना एखादें काम त्वरित करावयाचें असेल त्या वेळीं सूर्याला चालण्याला एखादी मोटारगाडी वर पाठवून देतां येण्याची युक्ति निघणें शक्य आहे किंवा नाहीं याबद्दल ते विचार करूं लागले. परंतु अखेरीस एकदांचा तो कंटाळवाणा सूर्य अस्तास गेला. सात वाजले. आठाचा ठोका पडला. आठाच्या ठोक्याबरोबर तीनशें पोलिसचे शिपाई, पंधरा माउंटेड स्वार, दहा-बारा ऑफिसर वगैरे सर्व लढाईची तयारी सिद्ध झाली. एक मशीनगनही बरोबर मागून आणिली होती असें म्हणतात. व तयारींत असण्याबद्दल दोन फलटणींना हुकूम सुटल्याबद्दलचीही वदंता

होती. वर सांगितलेलें सर्व सैन्य बरोबर साडेआठ वाजतां मार्च करून निघालें. ही बातमी आधीं कोठेंही फुटूं नये म्हणून हें सैन्य रात्रीच्या काळोखांतून दुरून आडवाटेनें लपत छपत येऊन त्यानें त्या पडक्या घराकडे जाणारे सर्व रस्ते रोखले. जिकडे तिकडे नाकेबंदी झाली; आणि बाकीचें लष्कर कोठें वळचणीला, कोठें खळग्यांत, कोठें झाडाच्या पाठीमागें, कोठें भिंतीच्या आड असें छपून राहिलें व त्यांतील मुख्य मुख्य लोक त्या घरांत काय प्रकार चालतो हें पाहण्यासाठीं जास्त जवळ गेले. आदल्या दिवशीच्या गुप्त हेरांनीं जवळ उभें राहून ऐकण्याला कोणकोणत्या सोईवार जागा आहेत हें त्यांना दाखविलें, व सर्वजण भिंतीला कान लावून आंत काय काय चेत होतात हें लक्षपूर्वक ऐकत उभे राहिले. पहिल्या दोनतीन दिवसांप्रमाणें याही दिवशीं रात्रीचे सुमारें साडेनऊ वाजल्यानंतर घरांत हालचाल सुरू झाली. पहिले दोन दिवशीचे गुप्त हेर बऱ्याच दुरून ऐकत असत, त्यामुळें मधले मधले मात्र कांहीं शब्द ऐकूं येत असत. परंतु त्या दिवशीं जे अगदीं भिंतीला कान लावून ऐकत होते त्यांना साहजिकपणें सर्व संगतवार भाषण ऐकावयाला मिळालें. भिंतीच्या आंतून पुढें लिहिल्याप्रमाणें शब्द त्यांना ऐकूं येऊं लागले:—

" माझ्या देशबंधूंनो, आपल्या देशाची काय अवस्था झाली आहे हें तुम्ही पाहतच आहां. ही अवस्था तुम्ही किती दिवस सहन करीत बसणार? गुलामगिरीसारखा नरक नाहीं, आणि स्वतंत्रतेसारखा स्वर्ग नाहीं. आणि या स्वर्गाला जाण्याला स्वदेशभक्तीसारखी दुसरी भक्ति कोणतीही कामीं पडावयाची नाहीं. त्या स्वदेशभक्तीने तुमचीं सर्वांचीं अंतःकरणें प्रज्वलित झालेलीं असल्याचीं स्पष्ट चिन्हें तुमच्या चेहऱ्यावर दिसत आहेत. मग आतां उशीर कशाला पाहिजे? अजून गुलामगिरीचें दुःख पुरेसें झालें नाहीं काय? बैल जोखडाखालीं जुंपला तर तो देखील तेथून सुटण्याचा प्रयत्न करीत असतो. मग आपण तर मनुष्य आहों. आपल्यावर इतका भयंकर जुलूम होत आहे कीं, तसा जगांतील दुसऱ्या कोणत्याही लोकांवर होत नसेल. आपल्यांतील श्रीमंत भिकारी झाले आणि आपल्यांतील भिकारी किती तरी उपाशी मरून गेले. जिवंत माणसांपेक्षां मेलेल्या माणसांची संख्या जास्त होऊन गेली असेल. सर्व जग आपणांकडे पाहून आश्चर्य करतें कीं, यांना अजून गुलामगिरीची खंती कशी वाटत नाहीं! जगाचे बहुतेक भाग स्वतंत्रतेमध्यें नांदत असतां या

गुलामगिरीच्या जाचणुकीमध्यें आपणच काय म्हणून कुजत पडावें? ही गुलामगिरीची बिडी तुटण्याला मोठी कठीण आहे असें नाहीं. आजपर्यंत किती तरी स्वातंत्र्यप्रिय महात्म्यांनीं हिचे तुकडे तुकडे करून टाकलेले आहेत! त्या महात्म्यांच्या उच्च पदाला जाऊन पोंहोचण्याची ज्यांची इच्छा असेल त्यांनीं या वेळीं कंबर बांधली पाहिजे."

एक ऑफिसर आपल्या शेजारच्या ऑफिसराच्या कानाशीं लागून खालच्या स्वरांत म्हणतो, "हा तर स्पष्ट राजद्रोह आहे. अजून तुमची वाट पाहण्याची इच्छा आहे?" "थोडे थांबा. आणखी काय काय होतें तें पाहूं. म्हणजे सहजच यांच्या गुप्त मंडळीची सगळी हकीगत आपल्याला समजेल." असें म्हणून त्याला दुसऱ्या ऑफिसरनें थांबवून धरलें. इतक्यांत फिरून आंतून आणखी आवाज ऐकूं येऊं लागला:—

"मित्रहो, आतां वाट पाहत बसण्यांत अर्थ नाहीं. सर्वांचीं मनें तर बदललीं आहेत. परंतु सुरवात कोणीं करावी आणि कशी करावी, या प्रश्नाच्या बुचकळ्यांत सगळेजण पडले आहेत. अशा प्रसंगीं कोणीं तरी आरंभ हा केलाच पाहिजे. स्वतंत्रतेच्या बिकट किल्ल्यावर जाण्याला फक्त एकच वाट आहे. आणि ती लढाईची होय. ज्यांनीं राज्यक्रांतीनें स्वतंत्रता मिळवून देशा-मध्यें स्वराज्य स्थापन केलें ते याच वाटेनें गेले, आणि आपल्याला जर स्वतंत्रता पाहिजे असेल तर आपणही त्याच मार्गाचें अवलंबन केलें पाहिजे. आतां दुसऱ्याच्या जुलमाखालीं असतांना आपल्याला राजरोसपणें दारूगोळा आणि हत्यारें जमवून कधीही मोठी लढाई करतां यावयाची नाहीं. याकरितां निर-निराळ्या ठिकाणीं लहान लहान पण अनेक लढाया आपण निर्माण केल्या पाहिजेत. एखाद्या घराला जशी चोहोंकडून आग लागते तशी स्थिति झाली पाहिजे. पण याला प्रारंभ कोण करणार? तो आपणच कां करूं नये? आपल्या शत्रूंचे अन्याय अतिशय झाले आहेत. लोक त्यांच्याबद्दल अतिशय नाराज झालेले आहेत. आणि त्यांची सद्दी निःसंशय सरलेली आहे. परमेश्वराची कृपा आजकाल आपल्याकडे फिरली आहे. आकाशांतील ग्रह हल्लीं आपल्या देशाला अनुकूल आहेत. आणि आपल्या स्वतंत्रतेचा वृक्ष फलोन्मुख होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. मग अशा वेळीं आपण कां सुरवात करूं नये? आपल्या-पाशीं आतां येथें एक हजार निवडक लोक तयार आहेत—"

" एक हजार निवडक लोक !" एक ऑफिसर म्हणाला. " आणि आपल्या-पाशीं तर येथें फक्त तीनशें साडेतीनशेंच माणसें आहेत. मग कसें होणार ? "

फिरून आंतून शब्द येऊं लागले:— " आणि या भुयारामध्यें आपल्याला तीन महिने पुरेल इतकी अन्नसामग्री आणि दारूगोळा भरलेला आहे. एवढ्या सामग्रीवर आपल्याला किती तरी गोष्टी करतां येतील ! याच्यापेक्षा जास्त सामग्री नको. एकदां लढाई सुरू झाली म्हणजे आज जें शत्रूच्या ताब्यांत आहे तें सगळें आपलेंच. प्रारंभाची तयारी असली आणि पुढें यश येत गेलें म्हणजे कोठेंही अडावयाचें नाहीं. याकरतां आपण आपला हा गुप्त कट आतां उघडकीस आणून आपल्या जन्मभूमीच्या पायांतील साखळदंडाचे दुवे तोडण्याच्या उद्योगाला लागूं या. दुःखानें, दारिद्र्यानें आणि जुलमानें मरणाऱ्या लोकांना जमिनीमध्यें जागा नाहींशी झाली आहे. सूर्याला आपल्या देशांतील गुलामगिरीच्या दुर्गंधीवर प्रकाशण्याचीही लाज वाटूं लागली आहे आणि या गुलाम देशावरून वाहत जाणाऱ्या वाऱ्यालाही आपल्याकडे न येण्याविषयीं स्वतंत्र देशांनीं बंदी केली आहे. अशा अपमानाच्या आणि गुलामगिरीच्या दुःखदायक स्थितीमध्यें राहण्यापेक्षां मरण आलें तरी हरकत नाहीं. आपण मरूं किंवा स्वतंत्र तरी होऊं ! चला ! बघतां काय ? म्हणा स्वदेशासाठीं आणि स्वतंत्रतेसाठीं हर हर महादेव ! "

इतक्यांत प्रथम एक बारीक शिटी वाजली आणि नंतर लगेच बिगुल झालें. घोड्यांच्या टापा ऐकूं येऊं लागल्या. बऱ्याच माणसांची चाहूल सुरू झाली. त्या घराचा दरवाजा एकदम उघडला, आणि—

" पकडा ! पकडा ! कोठें आहेत ते ? " असें म्हणत बरेच ऑफिसर आंत घुसले व त्यांच्या मागून इतरही शिपाई लोक आंत आले. " कोठें गेले ! इतक्यांत इतके लोक कोठें गेले ? कोठें आहेत ते कटवाले ? त्यांना शोधून काढा. नाकेबंदी कायम ठेवा. कटांतील एकही मनुष्य आपल्या या छाप्यांतून सुटून जातां कामा नये." असा त्या घरांत जिकडे तिकडे एकच गलका उडून गेला. परंतु आश्चर्याची गोष्ट ही कीं, इतक्या हजार कटवाल्यांपैकीं कोणीहि या बहादुराच्या हातीं लागेना. ऑफिसर लोकांनीं पहिल्यानें दरवाजा उघडला त्या वेळीं त्यांना तेथें फक्त एक मनुष्य आढळला. त्याला त्यांनीं ताबडतोब कैद केलें व त्याला आपल्या ऑफिसच्या मुख्य ठिकाणीं

तावडतोब पाठवून देण्यांत आलें. व कच्च्या तुरुंगाचे दरवाजे उघडे ठेवा, व जितक्या खोल्या मोकळ्या करतां येतील तितक्या करा; कारण, हजार लोक राहिले पाहिजेत, असे निरोपहि धाडण्यांत आले. तसेंच गुप्त कट पकडल्याच्या ताराही जिकडे तिकडे धाडण्यांत आल्या. इकडे निरोपाप्रमाणें तुरुंगांत तावड-तोब सगळी व्यवस्था झाली. एकेका खोलींत वीस वीस कोंडून सगळे राहावे अशा बेतानें सुमारें पन्नास कोठड्या रातोरात खालीं करण्यांत आल्या; आणि गेटवाले, वॉर्डर वगैरे सगळे लोक नवीन कटवाले हजार कैदी केव्हां येतात म्हणून तुरुंगाचे दरवाजे उघडे टाकून वाट पाहत बसले !

परंतु बराच वेळ झाला तरी पहिल्या एका कैद्याशिवाय दुसरे कोणीच येईनात. पकडण्याकरतां जे ऑफिसर गेले होते त्यांच्याकडून आपल्या कामांत कांहीं कसूर होत होती असें म्हणावें तर तसेंही नाहीं. ते आपल्याकडून त्या घरांत अगदीं शिकस्त करीत होते. त्यांनीं कटवाल्यांकरतां त्या घराचे कोने कोपरे , माळे, फडताळें, पेट्या आणि कोनाडेसुद्धां शोधले. पण त्यांचा कोठेंच पत्ता लागेना. भिंतींत दडून बसले असतील म्हणून अखेरीस त्यांनीं त्या घराच्या भिंतीही पाडल्या. तरी पण भिंतींतही ते कटवाले नव्हते ! तेव्हां ते आपल्या हातावर तुरी देऊन कोठें तरी निघून गेले असें समजून ते सर्व अधिकारी निराश झाले. तरीपण निदान त्या कटवाल्यांनीं जमविलेला दारूगोळा आणि हत्यारें तरी जप्त करून न्यावीत असा निश्चय करून अखेरीस तिकडे त्यांनीं आपलें लक्ष वळवलें. पण तें सामान तरी कोठें आहे ? तेंही त्यांना कोठें दिसेना. तेव्हां तेथें अशिक्षित आणि मूर्ख शिपाई होते त्यांना वाटूं लागलें कीं, ही कांहींतरी भूतचेष्टा असली पाहिजे; व या कल्पनेनें ते त्या घरांत उभे राहण्यालाही भिऊं लागले. परंतु त्या ऑफिसर लोकांत एक बऱ्याच फितीच्या तुकड्यांचा ऑफिसर होता. व त्याची धूर्तपणाबद्दल फार प्रख्याति होती. त्यानें असा तर्क काढला कीं, या घराच्या जमिनीच्या खालीं अतिशय मोठें तळघर असलें पाहिजे आणि त्यांत हे सगळे लोक दडून बसले असलें पाहिजेत, आणि त्याच तळघरांत दारूगोळा व हत्यारें ठेवण्याचीही योजना केलेली असली पाहिजे. ही कल्पना निघतांक्षणींच जे ते तळघराचें तोंड शोधूं लागले, पण तेंही कोठें सांपडेना. तेव्हां ज्यांची ही कल्पना होती त्यांनीं असा हुकूम केला कीं, तळघर लागेपर्यंत ही जमीन खोदा. त्याप्रमाणें खोदण्याचें

काम सुरू झालें. एक हात, दोन हात, चार हात, आठ हात, पंधरा हात खोल सगळें घर खणून झाले. पाणीसुद्धां लागलें, पण भुयार लागलें नाही. तेव्हां तर ही खास भूतचेष्टा आहे असें सगळ्यानांच वाटूं लागलें. जे ऑफिसर धूर्तपणासाठीं प्रख्यात होते त्यांनीं आणखीही डोकें खाजवून पाहिलें; पण अक्कल कांहींही काम करीना. शेवटीं त्यांनीं असे उद्गार काढले कीं, हे गुप्त कट करणारे लोक मोठे वस्ताद असतात. आपल्या चातुर्यानें आपण त्यांची गुप्त कारस्थानें हुडकून काढूं असें म्हटलें तर तीं आपल्याला कधींही काढतां याव-याचीं नाहींत. त्यांनीं आपण होऊन तीं सांगण्याची मेहेरबानी केली तर मग हुडकून काढण्यांत आपलें चातुर्य ! सबब जो एक कैदी आपण पकडून पाठवला आहे त्यालाच हें सगळें काय कोडें आहे तें आपण विचारलें पाहिजे. ही कल्पना सर्वांना पसंत पडून तें सगळें सैन्य तो कैदी ठेविला होता तेथें आलें व त्यातील कांही थोडेसे प्रमुख लोक त्याच्याजवळ गेले. तों तो कैदी संतापानें अगदीं लाल होऊन गेलेला होता व त्या अधिकाऱ्यांना पाहिल्याबरोबर त्यानें त्यांना शिव्यांची लाखोली मोजण्यात सुरुवात केली. तो म्हणाला, "तुम्हीं मांडले तरी आहे काय ? लोकांवर तुम्ही इतका जुलूम करतां तो काय म्हणून ? आम्ही आमच्या घरांत देखील आम्हांला वाटेल तें करूं नये कीं काय ?"

"अरे गाढवा !" एक ऑफिसर त्याला एक ठोसा लगावून मोठ्यानें ओरडला. "गुप्त कट आणि बंडें करतोस नाहीं ? हाच तुझा धंदा आहे कीं काय ? थांब तुला दाखवतों कसें काय आहे तें !"

"पण ते तुझे एक हजार साथीदार कोठे आहेत !" दुसऱ्या एका ऑफि-सरनें मध्येंच विचारलें. "आणि तो तुझा तीन महिने पुरणारा दारूगोळा तूं कोठें ठेविला आहेस ? आम्हीं तुझ्या घराच्या सगळ्या भिंती पाडून पाहिल्या आणि जमिनी खणून पाहिल्या. पण त्याचा कोठें पत्ता लागत नाहीं."

"काय ?" तो कैदी रागानें चवताळून म्हणाला. "तुम्हीं माझ्या घराच्या भिंती पाडिल्या आणि जमिनी खणल्या त्या काय म्हणून ? थांबा, हें सगळें नुकसान तुम्हांला भरून द्यावें लागेल, आणि विनाकारण कैद करून माझी अब्रू घेतल्याबद्दलही तुम्हांला नुकसानी भरून द्यावयाला लावीन तरच मी खरा होईन."

" तुला विनाकारण कैद केलें ? तूं लोक जमवून त्यांना लढाईला उत्तेजन देत होतास आणि तरी—"

" केव्हां ? कोण ? मी साथीदार जमवून लढाईला उत्तेजन देत होतों ? "

" चूप बैस ! मुकाट्यानें कबूल होतोस किंवा तुला चौदावें रत्न पाहिजे आहे ? तूं आपल्या कटांतील साथीदारांना बंड करण्याविषयीं उत्तेजन देत असतांना आम्ही सगळ्यांनीं प्रत्यक्ष ऐकिलें आहे. "

" केव्हां ? कोठें ? "

" आतां, तुझ्या भिंतीच्या आड उभे राहून आम्ही सगळे ऐकत होतों."

हे शब्द ऐकून त्याला अतिशय हसूं लोटलें, तें कांहीं केल्या आवरेना. ऑफिसर लोकांना वाटूं लागलें कीं, हा हसून आपली थट्टाच करीत आहे. आणि त्यामुळें ते जास्त चिडले. आणि " आतां तरी कबूल होतोस कां नाहीं ?" असें म्हणून त्याला छळूं लागले. तेव्हां एकदांची हसण्याची उकळी कशीचशी थांबवून तो म्हणाला : " मूर्खांनो, कबूल काय होऊं आणि सांगूं काय ? मी एक विद्यार्थी आहें. आम्हीं कांहीं विद्यार्थ्यांनीं मिळून येत्या सुट्टींत अनेक पाश्चिमात्य वीररसप्रधान नाटकांच्या आधारानें एक खेळ करण्याचें योजिलें आहे. आणि माझें घर हल्लीं रिकामें असल्यामुळें आम्ही तेथेंच कधीं कधीं तालमी करीत असतों. त्यांतील एका पात्राचें काम माझ्याकडे आहे. त्या पात्राचें भाषण मी अलीकडे पाठ करीत असतों. आतां मला तें बहुतेक पाठ झालें आहे. तें मी आपल्याशीं म्हणून पाहत असतांना बहुतकरून तुम्हीं ऐकलें असावें. वाहवा रे गुप्त कट पकडणारे ! मोठे बहाद्दर आहां बुवा ! " हें त्या बिचाऱ्याचें उत्तर त्या संशयग्रस्तांपैकीं कोणालाही खरें वाटलें नाहीं. व आपला गुप्त कट आणि आपले साथीदार यांना छपवण्यासाठीं यानें ही कांहीं तरी शक्कल काढली आहे असें त्यांना वाटलें. व अशी लबाडी लढविणारा हा मोठा बिलंदर असला पाहिजे असें वाटून ते त्याला कटाविषयीं खोदून खोदून विचारूं लागले. तेव्हां फिरून एकदां हसण्याची उकळी आवरून तो म्हणाला, " तुमची खात्री करण्याला माझ्या खिशामध्यें दुसरेंही एक साधन आहे. परंतु तुमची आतां चांगलीच फजिती उडविली पाहिजे. तेव्हां तुम्ही मला आतां मॅजिस्ट्रेटकडे घेऊन चला. म्हणजे तेथें भरकोर्टांत हजारों लोकांसमक्ष तुमची चांगली फट्फजिती करण्याला ठीक सांपडेल. असें म्हणून त्यानें आपल्या

खिशाचें तोंड घट्ट दाबून धरलें. तुझ्यापाशीं काय पुरावा आहे तो आम्हांला पांहूं दे, असें म्हणून ते त्याच्याशीं हिसकाहिसक करूं लागले. पण तो आपला खिशावरील हात सोडीना. तेव्हां एकानें आपल्या खिशांतील हळूच कात्री घेऊन त्याचा खिसा कातरला. त्यांत एक कागद सांपडला. या कागदावर बहुतकरून कटवाल्या लोकांच्या सह्या असाव्या आणि तसें असेल तर आपलें मोठेंच काम झालें असें म्हणून अतिशय उत्सुकतेनें सगळेजण तो कागद उलगडून पाहूं लागले. कागद उघडला आणि सर्वजण तो वाचूं लागले तेव्हां, त्यांच्या चेहऱ्यांची जी कांहीं अवस्था झाली तिचें यथार्थ निदर्शन करून देण्याला फोटोग्राफच पाहिजे होता. " माझ्या देशबंधूंनो, आपल्या देशाची काय अवस्था झाली आहे—" इत्यादि जे शब्द त्यानें उच्चारले होते ते तसेच्या तसेच त्या कागदावर लिहिलेले होते. ते पाहिल्याबरोबर त्यांच्या हातांतील कागद गळला. कंबरेला लटकणाऱ्या तरवारींच्या खणखणाटांत ते मट्‌कन खालीं बसले; आणि खजिल होऊन त्यांनीं आपल्या माना खालीं वांकविल्या. कांहीं वेळ सर्व स्तब्ध राहिले. फक्त तो एकटा कैदी मात्र खद-खदा हंसत होता. कांहीं वेळानें ती सर्व मंडळी उठली व 'या मूर्खाला सोडून द्या' असें त्यांनीं सांगितलें. हें ऐकून तो म्हणाला, " मी या तुरुंगांतून बिलकुल बाहेर जाणार नाहीं. मी येथेंच बसणार. मी असा बाहेर जातों कीं काय ?—"

इतक्यांत त्याला गाडी आणून घरीं पोंहोचविण्याविषयीं हुकूम झाला. त्यावर तो म्हणाला: " मला गाडी बसावयाला दिलीत, तरी देखील मी घरीं जाणार नाहीं. माझें घर तुम्हीं ठेविलें आहे कोठें ? माझ्या घराची आणि अब्रूची नुकसानी भरून घेतल्यावांचून आणि तुमच्या या कृत्याबद्दल चार लोकांत तुमची फट्‌फजिती केल्यावांचून मी मुकाट्यानें या तुरुंगांतून कधींही बाहेर जाणार नाहीं." एखाद्याला निरर्थक तुरुंगांत घालण्यालादेखील जितके कधीं श्रम पडले नसतील, तितके याला तुरुंगांतून बाहेर घालविण्याला त्या वेळीं पडले ! त्याच्या हातीं पायीं पडून व त्याच्या झालेल्या नुकसानीची गुप्त-पणानें भरपाई करून देण्याची व्यवस्था करून त्याला मोठ्या मिनतवारीनें गाडींत घालून बाहेर पोंहोचतें करण्यांत आलें, आणि नंतर साऱ्या रात्रभर थकले भागलेले ते सर्व इसम आपापल्या घरीं गेले.

पण अजून एक काम राहिलें होतें. सगळ्या मोठमोठ्या वर्तमानपत्रांकडे एक गुप्त कट पकडल्याबद्दल तारा पाठविण्यांत आलेल्या होत्या आणि छापखान्यांतून त्या तारांचे टाईप जुळले जात होते. थोडा वेळ जाता तर त्या वेडगळपणाच्या तारा सगळ्या जगभर प्रसिद्ध झाल्या असल्या व मग 'गोल्डन बंगाल्च्या' गुप्त कटाप्रमाणें अगर नाशिकच्या वंदे मातरम्मधील गुप्त छाप्याप्रमाणें आणखी एक अनिष्ट प्रसंग आला असता. याकरतां पहिल्या तारा चुकीच्या आहेत, त्या मेहेरबानी करून छापूं नयेत अशा उलट तारा ताबडतोब स्वारांच्या हातीं देऊन रवाना करण्यांत आल्या.

ही सगळी निरवानिरव होऊन जिकडे तिकडे स्वस्थता होईपर्यंत चांगलें फटफटीत उजाडलें. नित्यक्रमाप्रमाणें गस्त घालणारे शिपाई आपापल्या अमलदारांपुढें सकाळीं हजर झाले, आणि शहरांत चोरांनीं कोठें कोणतेंहि घरबीर कांहीं फोडलें नाहीं अशी सगळी आलबेल देऊन वांकड्या तळहातानें सलाम करून चालते झाले !

---

# नेपोलियन बोनापार्ट आणि पोप पायस धि सेव्हन्थ : : : २०

काळ : अग्रलेख, ता. १-३-१९०७

● धंदेवाईक वकील क्रांतीचा पुढारी होऊं शकत नाही.

इंग्रजी भाषेंतील प्रख्यात लेखक कार्लाईल यानें ' हीरोज आणि हीरोवर्शिप ' या नांवाचें जें एक अत्युत्कृष्ट पुस्तक लिहिलें आहे त्यांत त्यानें असा एक सिद्धान्त प्रतिपादिला आहे कीं, जे मोठे पुरुष असतात ते जरी सकृद्दर्शनीं एकमेकांपासून अगदीं भिन्न दिसले, तरी त्या सगळ्यांमधील मोठेपणाची बीजभूत अशी जी बुद्धि ती एकच असते. भगवद्गीतेमध्येंसुद्धां हेंच तत्त्व निराळ्या शब्दांनीं प्रतिपादिलें आहे. ' यद् यद् विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा । तत्तदेवावगच्छ त्वं ममतेजोंऽशसंभवम् ॥ ' हें जें तत्त्व भगवंतांनीं सांगितलें आहे, त्यांतील मथितार्थ हाच आहे कीं, निरनिराळ्या विभूति जरी दिसल्या तरी त्या सगळ्यांचें बीज एकच आहे. आणि तें बीज कोणतें तर भगवंताच्या तेजाचा अंश हें होय. अर्थात् कार्लाईलच्या प्रतिपादनांतील बुद्धि आणि भगवद्गीतेंतील भगवंताच्या तेजाचा अंश ही एकच होत. कारण, मनुष्याची बुद्धि म्हणजे तरी दुसरें काय असणार ? ईश्वरी तेजाचा जो अंश त्याच्या जड देहामध्यें सन्निविष्ट होतो तीच त्याची बुद्धि. ही बुद्धि किंवा हा ईश्वरी तेजाचा अंश ज्यांना अतिशय पुष्कळ प्रमाणांत उपलब्ध होतो ते विभूतिमान् होतात, श्रीमान् होतात, आणि ऊर्जित होतात. तेच जगामध्यें महापुरुष म्हणून लौकिकाला चढतात, आणि तेच वीरपुरुष ( heroes ) म्हणून

सर्व लोकांमध्यें वाखाणले जातात. या अनेक वीरपुरुषांमध्यें बीजभूत बुद्धि एकच असते. परंतु ती उपाधिभेदामुळें भिन्न रूपानें परिणाम पावते. ज्या बुद्धीला जी परिस्थिति मिळते ती बुद्धि त्या परिस्थितीप्रमाणें बनते. परंतु मुळांत हे सगळे वीरपुरुष एकच असतात. कार्लाईलनें वीरपुरुषांचे म्हणून जे कांहीं नमुने घेतलेले आहेत त्यांत शेक्सपिअर, महंमद, नेपोलियन, क्रॉम्वेल, नॉक्स वगैरे प्रमुख प्रमुख उदाहरणें आहेत. कार्लाईलच्या डोळ्यांपुढें वीरपुरुषांचीं जीं उदाहरणें होतीं त्यांतील ठळक ठळक अशीं उदाहरणें त्यानें आपल्या सिद्धांताच्या प्रतिपादनासाठीं निवडून घेतलीं आहेत. परंतु तीं उदाहरणें निवडतांना कार्लाईलनें शास्त्रीय वर्गीकरणाच्या दृष्टीनें तीं निवडलीं आहेत असें दिसत नाहीं. परंतु आपल्यामध्यें याचें पद्धतशीर वर्गीकरणही केलेलें आहे. सर्व जातींच्या वीरपुरुषांमध्यें वीररस हा सामान्य धर्म असतो. त्या वीररसाचें विवेचन करतांना आपल्यांतील जुन्या ग्रंथकारांनीं चार प्रकारचा वीररस सांगितला आहे; युद्धवीर, दयावीर, दानवीर आणि धर्मवीर. राम, रावण, कौरव, पांडव इत्यादि युद्धवीरांचीं उदाहरणें अनेक आहेत. जीमूतवाहन, शिबिराजा, हीं दयावीरांचीं उदाहरणें होत. बली, कर्ण वगैरे दानवीर होत. आणि राजा युधिष्ठिर हें धर्मवीराचें उदाहरण होय. हें जें आपल्यामध्यें शास्त्रीय वर्गीकरण रूढ झालेलें आहे त्याचीच बहुतेक उदाहरणें कार्लाइलच्या उपरिनिर्दिष्ट ग्रंथांत आलेलीं आहेत. नेपोलियन, क्रॉम्वेल हीं उदारणें युद्धवीर या वर्गाखालीं येतात. महंमद, नॉक्स वगैरे विभूतींचें कार्लाईलनें जें स्वरूप आपल्या ग्रंथांत दर्शविलें आहे त्यावरून पाहतां धर्मवीर व दयावीर या विभागांत तीं उदाहरणें येतात. कार्लाईलनें शेक्सपियरसारखे कवि देही वीरपुरुषांच्या वर्गांत घातले आहेत. त्यांना मात्र आपल्या इकडच्या वीररसाच्या वर्गीकरणांत जागा नाहीं. परंतु ही एक बाब खेरीज करून कार्लाईलनें सहजगत्या दिलेलीं उदाहरणें आणि आपल्यामध्यें बुद्धिपुरःसर केलेलें वर्गीकरण यांच्यामध्यें वास्तव्य करीत असलेलें विलक्षण प्रकारचें साम्य दृष्टोत्पत्तीस येतें. या साम्यावरूनही कार्लाईलच्या सिद्धांताप्रमाणें आम्हांला हेंच दाखवावयाचें आहे कीं, कोणत्याही प्रकारचा मोठा आणि वीरपुरुष असला, तो युद्धांत मोठा असला, दयेमध्यें अप्रतिम असला, दानामध्यें वर्णनीय असला, किंवा धर्मामध्यें प्रशंसनीय असला, तरी या सगळ्यांमध्यें जो मूळ

कारणीभूत वीररस असतो तो एकच असतो. आणि हेंच कार्लाईलचें तत्त्व होतें. तो म्हणत असे कीं, शेक्सिपअर आणि नेपोलियन या दोघांची व्यापक बुद्धि एकच. परमेश्वरानें त्या दोघांच्या अंतःकरणांत जो कांहीं आपल्या तेजाचा अंश घातला तो एकच होय. त्याच्या जोरावर एकानें दृश्यकाव्यें लिहिलीं आणि दुसऱ्यानें भयंकर लढाया केल्या. परंतु त्या दोघांचीही बुद्धि इतकी सर्वव्यापी होती कीं, शेक्सिपअरला तशी परिस्थिति प्राप्त झाली असती तर त्यानें नेपोलियनसारख्या लढाया मारल्या असत्या. आणि नेपोलियन जर फ्रेंच रेव्होल्यूशनपेक्षां भिन्न परिस्थितीमध्यें जन्म पावला असता, तर कदाचित् त्यानें शेक्सिपअरसारखीं उत्कृष्ट शोकपर्यवसायी नाटकें लिहिलीं असतीं. ईश्वरी तेजाच्या दृष्टीनें पाहिले असतां त्या तेजाला जरी सर्व गोष्टी शक्यच असल्या पाहिजेत, तरी नेपोलियनने शेक्सपिअरसारखीं काव्यें लिहिलीं असतीं वगैरे प्रकारचे उल्लेख सकृद्दर्शनीं थोडेसे चमत्कारिक वाटतात, व ते कार्लाईलनें सांगितले तरी मन एकदम त्यांना रुकार देत नाहीं. मानवी मनाचा हा धर्मच आहे कीं, प्रत्यक्ष अनुभवावांचून त्याचा संशय फिटावयाचा नाहीं. याकरतां त्याला प्रत्यक्ष उदाहरणच दिलें पाहिजे. म्हणून बादशहा नेपोलियन आणि रोमचा पोप सातवा पायस यांच्यामध्यें झालेला एक अपूर्व संवाद पुढें दिलेला आहे. तो वाचीत असतांना प्राणवायूची खळबळ आपल्या बरगड्यांतून मावेनाशी होऊन आपल्या बरगड्या फोडून तो बाहेर येतो कीं काय असा भास होतो. ते नेपोलियनच्या धीरोदात्त श्वासोच्छ्वासानें जणूं काय अभिमंत्रित केलेले शब्द आपल्या मनांत शिरले म्हणजे ते फ्रान्सच्या राज्यांतल्याप्रमाणे आपल्या मनोराज्याच्या हद्दींतही अनेक बंडें आणि राज्यक्रांत्या करण्याला सुरवात करतात. इतर सर्व वृत्ति पराङ्मुख होतात. सर्व अवयव स्तब्ध होतात. श्वासोच्छ्वासाचीही आठवण होत नाहीं. मन एकाग्र व तल्लीन होतें. आणि नेपोलियनच्या नांवाला जरी योग्यांच्या यादीमध्यें समाविष्ट होण्याचा सन्मान मिळालेला नाहीं, तरी त्याचे शब्द आपल्या मनाला सहजसमाधि लावून देतात. शेक्सपिअरचीं काव्यें तर उत्तमच आहेत; परंतु पुढें दिलेल्या उताऱ्यांत जो उत्तमपणा आहे तो सगळ्या शेक्सपिअरमध्यें तरी सांपडेल किंवा नाहीं याची शंकाच आहे. नेपोलियन हा कवि तर होताच, परंतु तो जरा निराळ्या प्रकारचा कवि होता. एका दृष्टीनें पाहिलें असतां त्याची कविता शेक्सपिअरच्या

कवितेपेक्षांही फार भव्य आणि उदात्त होती. तो उघड्या मैदानावर, मोकळ्या हवेंत, सूर्यचंद्रांच्या दिव्यांच्या उजेडांत आपलीं काव्यें लिहीत असे. तोफांच्या तोंडांतून त्याचीं काव्ये बाहेर पडत असत, आणि तीं समोर उभ्या असलेल्या लोकांच्या हृदयांवर जाऊन चिकत असत. शत्रूच्या रक्ताच्या तांबड्या शाईत आपल्या तरवारीची लेखणी बुडवून आपल्या रणमैदानाच्या विस्तीर्ण कागदावर तो आपलीं काव्ये लिहीत असे. त्याच्या कविता नेहमीं लष्करी बँडच्या आवाजाबरोबर गाइल्या जात असत. वॅग्रम वगैरेसारख्या लढाया हीं त्याचीं उत्तम काव्यें होत. नेपोलियननें आपलें काव्य रचण्याला सुरवात केली म्हणजे युरोपांतील राजे, राज्यें आणि सिंहासनेसुद्धां डोलूं लागत असत. त्याची कविता ऐकून लंडनपासून सेंटपीटर्सबर्गपर्यंत सर्व यूरोप खंड थक्क होऊन जात असे. त्याच्या कवितेंत शृंगार आणि हास्य हे दोन रस मुख्यत्वेकरून वर्ज्य असत; आणि वीर, रौद्र, भयानक, करुण आणि शांत हे रस प्रधान असत. नेपोलियनच्या कविता गाइल्या जात असत तेव्हां असंख्य घोड्यांच्या टापा ताल धरीत, आणि मेघासारख्या गर्जना करणाऱ्या तोफांचा आवाज मृदंगध्वनीची उणीव भासूं देत नसे. आणि अशा तालसुरावर सुरू झालेल्या पद्यांच्या मधुरपणामध्यें तल्लीन झालेलीं योद्धयांचीं असंख्य कबंधें आकाशामध्यें नाचूं लागत असत. अशा प्रकारची नेपोलियनची कविता होती, आणि असल्या कवितांचा नेपोलियन हा कर्ता होता. तरी पण ही कविताशक्ति फक्त त्याच्या मनगटामध्येंच वास्तव्य करीत नसून ती त्याच्या जिव्हाग्रींही वसत असे. आणि म्हणून तो जितका योद्धा होता, तितकाच तो कविही झाला असता; व ही गोष्ट पुढील उताऱ्यावरून चांगली लक्षांत येण्यासारखी आहे.

यापुढें दिलेल्या संभाषणाचा प्रसंग समजल्यावांचून त्यांतील गोडी समजणार नाहीं. म्हणून त्याची थोडी माहिती देणें अवश्य आहे. नेपोलियन हा आपल्या पराक्रमानें बादशहा आधींच झालेला होता, तरी पण मूर्ख लोकांना भपक्यानें फसविण्यासाठीं त्याच्या मनांतून पोप पायस याच्याकडून आपल्याला शास्त्रोक्त राज्याभिषेक व्हावा असें वाटत होतें. या हेतूस्तव यूरोप खंडांतील राज्याधिपति नेपोलियन आणि धर्माधिपति पायस या दोघांची पॅरिसमधील

एका राजवाड्यामध्यें मुलाखत होऊन नेपोलियननें आपलें मनोगत पोपला कळवून पुढें येणेंप्रमाणें बोलण्याला सुरवात केली:—

नेपोलियन म्हणाला, " मी तुम्हांला खात्रीपूर्वक सांगतों कीं, मी नास्तिक नाहीं. किंवा जे तर्कशास्त्रावर आणि मानसशास्त्रावर भिस्त ठेवून परमेश्वराचें अस्तित्व नाशाचीत करूं पाहतात त्यांच्याबद्दलहि मला फारसें प्रेम नाही. मागें काय झाले असेल तें असो, पण यापुढें मी नियमितपणानें देवळांत प्रार्थना करण्याकरतां जात जाईन —पोप महाराज, एका गोष्टीची मला फार आवश्यकता आहे. तुमच्या हातून मला यथाविधि राज्याभिषेक व्हावा अशी माझी इच्छा आहे. आणि तसे करण्याला तुम्ही नाखुषीनें कदाचित् कबूल व्हाल. पण तसें मला नको आहे. आपण या नेपोलियनच्या तडाक्यांत सांपडलों आहों, यांतून आपल्याला आणि आपल्या रोमन कॅथॉलिक धर्माला परमेश्वर कसा सोडवील तो सोडवो, अशा चिंतेत व्यग्र झाल्यासारखी तुमची चर्या दिसत आहे. पण वास्तविक अशी स्थिति नाहीं. तुम्ही कांहीं या ठिकाणीं माझे कैदी नाहीं. ईश्वरसाक्ष मी तुम्हाला सांगतो कीं, तुम्हांला पूर्ण मोकळीक आहे. तुम्ही मोकळे आहां. तुमच्या मनांत असेल तर तुम्हांला रोमलाही जातां येईल. तुमचा रस्ता खुला आहे. तुम्हांला कोणाचीही आडकाठी नाहीं. असें असूनही जर तुम्ही माझ्या राज्याभिषेकाला संमति देणार नाहीं, तर तुमच्यासारखे कृतघ्न कोणीही नाहीत असे म्हणण्याची मला पाळी येईल. फ्रान्सनें तुमच्यावर किती उपकार केले आहेत याचें तुम्हांला स्मरण नाही असें दिसते. मी इटलीमध्यें जे विजय मिळवले आणि मी तुमच्यासाठी जे शब्द खर्च केले, त्यांच्या योगानें तुम्हांला पोपची जागा मिळाली आहे. त्या वेळी ऑस्ट्रियानें तुम्हांला फार वाईट रीतीनें वागविले, आणि तें मला सहन होईना. ऑस्ट्रिया आपल्या मुलखांतून जाण्याला तुम्हांला वाटसुद्धां देईना, आणि म्हणून तुम्हांला जलमार्गानें रोमला जाणें भाग पडले. ही तुमची स्थिति पाहून त्या वेळीं मला जें वाईट वाटलें तें मी कॅथॉलिक धर्माचा एक अनुयायी म्हणून वाईट वाटलें. तुमच्या धर्मशास्त्राचा अभ्यास करण्याला मला कांहीं फारशी फुरसद मिळाली नाहीं हे खरं; तरी पण धर्मामध्यें एक प्रकारचें सामर्थ्य आहे असा माझा पक्का विश्वास आहे. धर्मामध्यें एक प्रकारची विलक्षण चैतन्यशक्ति आहे. त्या धर्मावर व्हॉल्टेअरनें हल्ले केलेले आहेत. पण मला व्हॉल्टेअर आवडत नाहीं!

आणि मी लवकरच त्याचा बंदोबस्त करण्याच्या विचारांत आहें. माझ्या म्हणण्याला जर तुम्हीं संमति दिली, तर हें पक्कें लक्षांत ठेवा कीं, त्या कृत्या-बद्दल पश्चात्ताप पावण्याचा तुम्हांला कधीही प्रसंग येणार नाहीं. हळूहळू तुमच्या फायद्याच्या पुष्कळ गोष्टी घडून येतील.—आणखी मी एक असें म्हणतों कीं, तुम्ही रोमची राजधानी सोडून पॅरिसमध्येंच कायमचे येऊन राहिलां तर त्यांत काय अडचण आहे ? मला तर कांहीं हरकत दिसत नाहीं. तुमच्या पसंतीस येत असेल तर ट्यूलरीजमधील माझें राजवाडे मी आपल्या हवालीं करण्याला अगदीं तयार आहे. तुम्हांला जी जी पाहिजे ती ती सोय तेथे तयार आहे. माझ्याबद्दल म्हणाल तर मी तेथें फारसा कधींच राहत नाहीं. शिवाय आजकाल पॅरिस हीच जगाची खरी राजधानी आहे. सारांश, मी आपल्यासाठीं काय वाटेल ते करण्याला तयार आहें. लोकांचा माझ्याबद्दल जो ग्रह झाला आहे, त्याच्यापेक्षां मी फार निराळा आहें, असें आपल्याला आढळून येईल. आपण दोघेही पॅरिसमध्ये राहिल्यावर युद्ध आणि राजकारण यांची दगदग तुम्ही माझ्याकडे सोंपवा, आणि धर्माच्या खात्याची व्यवस्था तुम्ही आपल्याकडे घ्या, ती व्यवस्था तुम्ही वाटेल तशी ठेवा, मी त्यांत चिल-कुल हात घालणार नाहीं. मी तुमचा शिपाई होईन, आणि तुम्ही माझे धनी व्हा. अशी व्यवस्था झाली तर मोठें नामी होणार नाहीं काय ? कान्स्टन्टाईन आणि शार्लमेन यांच्याप्रमाणें आपण आपल्या दरबारांतील कामाची वांटणी करूं म्हणजे झालें. मी फक्त दरबार उघडीन आणि बंद करीन. बाकीची सर्व व्यवस्था तुमच्याकडे असूं द्या. असें केल्यानें सर्व जगाच्या किल्ल्या तुमच्या हातांत राहतील. मी फक्त एक आपली तरवार मात्र आपलेजवळ ठेवीन; आणि ती स्वपराक्रमानें जयशाली झाली म्हणजे आपल्या आशीर्वादाकरतां ती मी प्रत्येक विजयानंतर आपल्या चरणकमलापाशीं सादर करीत जाईन."

त्या दिवाणखान्यांत पायस आणि नेपोलियन हे फक्त दोघेच होते, आणि नेपोलियनचा स्वभाव पायसला पूर्णपणे माहीत होता. नेपोलियनची धर्मावर खरी श्रद्धा नसून फक्त राज्याभिषेकासाठीं तो हीं लाडीगोडीचीं भाषणें वरवर बोलत आहे हे पोप पायस जाणून होता. आणि म्हणून तो कांहीं एक न बोलतां मुकाट्यानें त्याचे म्हणणें ऐकून घेत होता. एवढा वेळपर्यंत तो अगदीं स्तब्ध बसला होता. पण नेपोलियनचे वरील शब्द ऐकल्यानंतर आपली दृष्टि

थोडी वर उचलून आणि किंचित् श्वास टाकून पोप म्हणाला, "वा! अगदीं हुबेहूब एखाद्या आनंदपर्यवसायी नाटकांतील पात्राची नक्कल!"

एखाद्या चित्त्याला गोळी लागून तो उसळावा त्याप्रमाणें हे शब्द ऐकून नेपोलियन आपल्या खुर्चीवरून एकदम उठला आणि दांतओठ चावीत आणि हातपाय आपटीत तो इकडे तिकडे फिरूं लागला. त्या वेळी तो सर्व दिवाणखाना थरथर कापूं लागला. भयंकर वादळाच्या पूर्वी जशी स्थिति होते तशी तेथे दिसूं लागली, आणि अखेरीस तोफेचा गोळा एकदम फुटला.

"नाटकांतील पात्र!" नेपोलियन म्हणाला, "एखाद्या आनंदपर्यवसायी नाटकांतील मी पात्र काय? ठीक आहे. मी तुम्हांला अशीं आनंदपर्यवसायी नाटकें करून दाखवीन, कीं तीं पाहून तुम्ही सगळे बायकांसारखे रडूंच लागाल. मी नाटकी काय? होय–मी खरोखरच नाटकी आहें. पण मी कसलीं नाटकें करतों? सगळें जग ही माझी रंगभूमि आहे, आणि त्या रंगभूमीवरील नाटकांचा मी कर्ता आणि सूत्रधार आहें. आणि त्या नाटकांत साऱ्या जगांतील लोक, राजे आणि तुमच्यासारखे पोप ह्यांना मी कळसूत्री बाहुल्यांप्रमाणें खेळवीत असतों. आणि ज्या कळसूत्रानें मी हीं सगळी पोपांची आणि राजांची बाहुलीं नाचवितों तें कळसूत्र कोणतें म्हणून तुम्ही म्हणाल तर माझी वचक हें होय. आणि या नाटकांत मी काम करीत असतां माझ्यासंबंधानें टाळ्या वाजविण्याची किंवा हुशहुश् करण्याची तुमची योग्यता नाहीं.—पोपसाहेब, जर तुम्हांला पोप करण्याची माझी मर्जी लागली नसती, तर तुम्ही आज कोणी तरी एक यःकश्चित् मनुष्य होऊन पडला असतां. फार कशाला? मी जेव्हां तुमच्यापुढें साष्टांग नमस्कार घालतों, त्या वेळेला मी जो गंभीरपणाचा आविर्भाव आणतों तो जर मीं आज आणला नाहीं, तर सगळ्या फ्रान्समधील लोक उद्यां तुमची टर उडवून टाकतील, आणि तुमच्या डोकीवरील या मुकुटाचाही अपमान करण्याला कोणी कमी करणार नाहींत.—मी तुम्हांला आपल्या बोटावर नाचवीत आहें. मी तुम्हांला बाहुल्याप्रमाणें आज दक्षिणेंत नेतों तर फिरून उद्यां उत्तरेकडे यावयास लावतों. तुमच्यांत कांही मोठेपणा आहे असें लोकांना भासावें, म्हणून तुम्हांला हा मोठेपणा देण्याचा माझा प्रयत्न आहे. तुमची ही धर्माची गादी आहे, आणि त्या गादीचें वर्चस्व वाढवून त्याचा फायदा आपल्याला घेण्याला सांपडावा म्हणून मी तुम्हांला हा मोठेपणा देत

आहे. पण तुमच्या अंगांत हें समजण्याइतकी आणि त्याप्रमाणें वागण्याइतकी अक्कलच नाहीं आणि ती कोठून असणार? तुम्हांला दुसऱ्यांनीं सगळ्या गोष्टी उघडून सांगितल्या पाहिजेत. प्रत्येक गोष्ट दुसऱ्यांनीं तुमच्या अगदीं नाकापुढें धरली पाहिजे, तेव्हां तुम्ही ती पाहण्यासाठीं डोळे उघडणार. तुम्हांला खरोखरच असें वाटतें काय कीं, तुमच्यावांचून लोकांचे चालावयाचेंच नाहीं? पण तुम्ही हें पक्कें लक्षात ठेवा कीं, असल्या आढ्यतेचा माझ्यावर बिलकुल परिणाम होणार नाही. आणि मी असल्या स्वभावाला बिलकुल जुमानणार नाहीं. तुमचीं हीं धर्माच्या ढोंगाचीं वस्त्रें मी आपल्या पायांतील बुटानें फाडून त्यांच्या चिंध्या चिंध्या करून टाकीन."

"टाकशील खरेच!" पोप म्हणाला, "तुला शोकपर्यवसायी नाटकेंही करतां येणार नाहींत असे नाहीं!" हें ऐकल्याबरोबर नेपोलियनच्या अंगचा संताप झाला. आणि एखाद्या तीराप्रमाणें तो त्या पोपच्या अंगावर धांवून गेला व आतां हा त्याला मारतो असें वाटलें. परंतु इतक्यांत नेपोलियनची चित्तवृत्ति बदलली. तो मध्येंच स्तब्ध उभा राहिला. शांतपणाच्या विचारांचा त्याच्या मनावर फिरून अमल सुरू झाला. त्याचें डोकें ताळ्यावर आलें आणि नंतर त्याच्या एकंदर चर्येमध्ये पुष्कळ फरक दिसूं लागला. रागाच्या जागीं खिन्नता उत्पन्न झाली. त्याचा आवाज उद्विग्न आणि खोल असा झाला. अशा स्थितींत कांहीं वेळ गेल्यानंतर नेपोलियनने पुढील उद्‌गार काढले: "मी किती तरी दुःखी प्राणी आहे! पोपने म्हटले तें कांहीं खोटें नाहीं! शोकपर्यवसायी किंवा आनंदपर्यवसायी, कसलें तरी पण हें सारें नाटकच चाललें आहे! आणि मी खरोखरच नाटकी आहें. हा जो मीं सेनापतीचा आणि बादशहाचा पोषाख आजपर्यंत घातला आहे आणि पुढेही घालावा लागणार आहे, त्या पोषाखापलीकडे यांत काय आहे! या कामांत श्रम किती आहेत, पण अर्थ पाहिला तर कांहीं एक नाहीं! महत्त्वाकांक्षेच्या तावडींत सांपडलेला आणि आपली तसबीर काढून घेण्यासाठीं एखाद्या चित्रकारापुढें बसलेला, या दोघांची अवस्था सारखीच असते. तो चित्रकार सांगेल तसें बसावें लागतें त्यानें बाजूला वळावयाला सांगितलें तर बाजूला वळावें लागतें, आणि त्याला समोरून पाहावयाचें असलें तर त्याच्याकडे समोर चेहरा करून बसावें लागतें! त्याप्रमाणेंच सगळ्या मूर्ख लोकांच्या वेडगळपणाच्या कल्पना काय आहेत

त्या सर्व समजून घेऊन त्यांना आवडेल त्याप्रमाणें महत्त्वाकांक्षी मनुष्याला वागावें लागतें. यांना आशा आणि भीति यांच्या दरम्यान नेहमीं खेळत ठेवा, निरनिराळ्या तारखा घालून आणि निरनिराळे जाहीरनामे काढून यांना थक्क करा, मी दूरदूरचे अमुक मुलूख जिंकले आणि अमुक राजांना पादाक्रांत केले असल्या भपक्यांनीं यांना भुरळ पाडा, या सगळ्यांना आपल्या ताब्यांत आणा, इतके सगळे उपद्व्याप करावे आणि अखेरीस या सगळ्यांचें पुढें काय करावयाचें हें समजूं नये!—केवढी ही दुःखाची गोष्ट!—पण मी काय करूं? मी एक क्षणभर रिकामा बसलों तर मला कसेंसेंच होतें. नेहमीं कांहीं उलथापालथ करीत असावें असें मला वाटतें. मला स्वस्थ बसवत नाहीं; आणि दुसरे लोक स्वस्थ बसलेले माझ्याच्यानें पाहवत नाहींत. कांहीं तरी उलथापालथी नेहमी चालल्या पाहिजेत असें मला वाटतें!—पण या सगळ्यांचा शेवट काय! आणि या कशाकरितां? हे मला कांहीं एक कळत नाहीं. पोप महाराज, मी तुमच्याशीं आपलें अंतःकरण उघडें करून या वेळीं बोलत आहे. जगांतील छप्पन्न बादशहांना कसें पकडावें याच्याबद्दलचीं कारस्थानें आज माझ्या डोक्यांत तयार आहेत. प्रत्येक सकाळीं मी एक कारस्थान रचतों आणि रात्रीं दुसऱ्या कारस्थानाची तयारी करतों. माझी कल्पनाशक्ति फार अचाट आहे. पण इतके बेत जरी माझ्या डोक्यांत घोळत आहेत, तरी त्यांपैकीं एकदोघांची तरी अमलबजावणी करीपर्यंत हें माझें शरीर आणि हा माझा आत्मा एकत्र कायम टिकतील किंवा नाहीं याची शंका आहे! कारण, हा मानवी आयुष्याचा दिवा फार वेळ जळत नाहीं. पण माझ्या डोक्यांतील सगळीं राजकारस्थानें सिद्धीस गेलीं म्हणजे तरी हें जग त्या योगानें जास्त सुखी होईल, असें माझ्यानें कधीं सांगवणार नाहीं. मात्र तें जास्त तेजस्वी दिसेल आणि जिकडे तिकडे एकछत्री अबाधित साम्राज्य नांदेल. मी कांहीं तत्त्ववेत्ता नाहीं. किंवा तत्त्ववेत्त्यांचे जे कांहीं सिद्धान्त आहेत तेही मला फारसे समजत नाहींत. पण मला एवढें समजतें कीं, मनुष्याचें आयुष्य फार थोडें आहे; आणि म्हणून त्यानें तें स्वस्थ बसून फुकट कधींही दवडतां कामा नये. माझ्या मनांत कल्पना आल्याबरोबर मी ती अमलांत आणून टाकतों; मग लोक त्याबद्दल मी या जगांतून गेल्यावर आपले वाटतील तसे तर्क चालवोत. मला माहीत आहे कीं, मी विजयी

झालों तर माझी ते स्तुतिच करतील आणि मला अपयश आलें तर सगळे माझा धिक्कार करतील. मी कोणत्या हेतूनें कोणती गोष्ट केली याबद्दलची कोडीं मी मेल्यावर लोक सावकाश उकलीत बसूं द्या. मी जिवंत आहें तोंपर्यंत माझ्या निंदकांचीं तोंडें मी दाबून टाकीन. मग पुढें काय व्हावयाचें असेल तें होवो. पुढचें कोणी पाहिलें आहे? या जगांत जय मिळविणें हे माझें काम आहे आणि तें कसें करावें हे मला पक्कें समजतें. मी होमरसारखाच कवि आहें आणि मी आपलें ईलिअड प्रत्येक दिवशी रणांगणावर कृतीनें रचून दाखवीत असतो." हें भाषण करीत असतां नेपोलियनची चित्तवृत्ति क्षणो-क्षणीं बदलत होती आणि अनेक विचारतरंग त्याच्या अंतःकरणावर उठत होते. अशा स्थितींत तो पुढें म्हणाला, "या जगांत मनुष्य ज्या स्थितींत जन्मास येईल त्यावर सगळें अवलंबून असतें. जे गरिबींत आणि अज्ञानदशेंत जन्मास येतात ते नेहमीं जिवावर उदार होऊन पाहिजे ते करण्याला तयार असतात. अशी ज्यांची गरिबीची स्थिति असते ते आपापल्या मनाच्या कला-प्रमाणें आत्महत्या करण्याला तयार होतात, किंवा महत्कृत्यें करण्याला पुढें सरसावतात. परंतु माझ्याप्रमाणें जेव्हां पाहिजे तें कृत्य करण्याचें धैर्य त्यांच्या अंगामध्यें असतें तेव्हां ते वाटेल ती गोष्ट करूं शकतात. आणि त्याबद्दल त्यांना कोणी काय म्हणून दोष द्यावा? त्यांचा जसा स्वभाव असेल त्याप्रमाणें त्यांच्या हातून कृत्यें झालींच पाहिजेत. जो मनुष्य या जगांत जन्मास आला त्यानें आपल्या स्वभावाप्रमाणें कसें तरी जिवंत राहिलेंच पाहिजे, आणि आपल्या बेताची जागा आपल्याकरितां शोधून काढलीच पाहिजे. तशीच मींही एखाद्या तोफेच्या गोळ्याप्रमाणें येथें शिरून आपल्या-करितां जागा शोधून काढली आहे. त्या माझ्या वाटेत जे कोणी आड आले त्यांच्याबद्दल मला फार वाईट वाटतें!— पण काय करणार? या जगांत कांहीं लोक थोड्यानें संतुष्ट होतात आणि कांहींना किती मिळालें तरी त्यांची भूक तृप्त होतच नाहीं, त्याला काय करावयाचें? ज्याला जशी भूक असेल तसें तो खातो. पण माझ्या महत्त्वाकांक्षेची भूक इतकी कांहीं जबर आहे कीं, तिला कांहींच पुरेसें पडत नाहीं. पोपमहाराज, तुम्हीच पाहा नशिबाचे खेळ कसे आहेत ते! मी टूलॉन येथें होतों त्या वेळीं मी पायमोज्याची एक जोडी विकत घेईन म्हटलें तरीदेखील माझ्यापाशीं पैसे नव्हते; आणि माझ्या-

पाठीमागें आई, भाऊ, बहिणी यांचें केवढें तरी मोठें कुटुंब पोसावयाचें होतें. पण त्या सगळ्यांची आतां ठीक व्यवस्था लागली आहे. कोणी राजे झाले आहेत, कोणी राण्या झाल्या आहेत, असेही आज दिवस आले आहेत. मी इतक्या वैभवाला चढलों आहें तरी अशा स्थितींतही मला कोणी एकानें म्हटलें कीं, माझ्या तरवारीशिवाय या जगांत माझ्यापाशीं दुसरें कांहीं नाहीं!—पण ज्यानें असें म्हटलें त्याचें म्हणणें फारसें चुकीचें होतें असें नाहीं. हे बादशाही झगे, हा बादशाही मुकुट, यांत काय आहे! नाटकांतील नट आपल्याला जे सोंग घ्यावयाचें असेल त्याचा जसा पोषाख घालतो तसा हा माझा निवळ पोषाख आहे. ती बादशाही वस्त्रें आणि तो बादशाही मुकुट मी क्षणभर आपल्या डोक्यावर घालीन एवढेंच काय तें! एक क्षणभरानें मी ते सर्व पोषाख उतरून ठेवीन. मग मी फिरून आपला नेहमींचा साधा शिपायाचा पोषाख घालीन, आणि आपल्या घोड्यावर स्वार होईन. मला नेहमीं घोड्यावर बसावें असेंच वाटतें. साऱ्या जन्मभर घोड्यावर बसून स्वाऱ्या करीत राहावें असेंच माझ्या मनाला वाटतें. मी या दरबारी खुर्च्यांवर बसलों तर मी त्यांवरून पडेन कीं काय असें मला वाटतें. असल्या प्रकारच्या आयुष्यक्रमामध्यें हेवा करण्यासारखें काय आहे!—पोपमहाराज, मी तुम्हांला सांगतों कीं, या जगामध्यें दोन प्रकारचे लोक असतात; ज्यांच्यापाशीं कांहीं आहे तो एक वर्ग, आणि ज्यांच्यापाशीं कांहीं नसून नवीन मिळविण्याबद्दल जे सदोदित प्रयत्न करीत असतात तो दुसरा वर्ग. यांपैकीं पहिल्या वर्गांतील लोक स्वस्थ झोंपा घेत पडतात; परंतु दुसऱ्या वर्गांतील माणसें सदोदित जागीं राहून प्रयत्न करीत असतात. हें उत्कृष्ट तत्त्व मला लहानपणींच समजल्यामुळें या जगांत मी सगळ्यांच्या पुढें जाईन, यांत बिलकुल शंका नाहीं. वयाच्या चाळिसाव्या वर्षी सुरवात करून ज्यांनीं नांवलौकिक मिळविला अशीं फक्त दोनच उदाहरणें आहेत; एक क्रॉमवेलचें, आणि दुसरें रूसोचें. पण त्याचें काय? क्रॉमवेलला जर कोणी एखादें शेत दिलें असतें तर क्रॉमवेलनें सेनापतीचें काम केलें नसतें; आणि रूसोला जर कोणी सालिना बाराशेंची तैनात आणि त्याचें प्रियपात्र दिलें असतें तर रूसोनेंही आपलें सोशल कॉन्ट्रॅक्ट लिहिलें नसतें. या जगांत कोणी घरें बांधतात; कोणी नवीन रंग शोधून काढतात; कोणी चित्र काढणारे असतात; आणि कोणी सुंदर शब्दरचना करणारे

असतात. पण मी—मी युद्धांचा कर्ता आहें. लढाया करणें हा माझा धंदाच होय. माझ्या वयाला अजून पस्तीसही वर्षें पुरीं झालीं नाहींत. इतक्या अवधींत मीं आजपर्यंत अठरा लढाया मारल्या. लोक त्याला अठरा विजय असें म्हणतात. मीं इतके श्रम केल्यानंतर माझ्या ह्या कामगिरीबद्दल मला कांहीं तरी मुशाहिरा मिळावा हें उचित नाहीं काय? आणि इतक्या कर्तबगारीबद्दल एक यःकश्चित् बादशाही सिंहासन हे फारसें मोठें बक्षीस होईल असेंही नाहीं. शिवाय मी सिंहासनावर बसलों म्हणजे पुढे मग स्वस्थच बसेन असेंही नाहीं. मी अजूनही किती तरी लढाया जिंकीन! मी जगीं नवीन, उपरी आणि लोकांनीं निवडलेला असा असलों, तरी पुढले राजे, महाराजे, आणि बादशहा आपल्या वंशावळीचे धागे माझ्याशीं आणून जोडतील. मी नवीन असलों म्हणून काय झालें! पोपमहाराज, तुम्हीही माझ्यासारखेच नवीन होतां आणि हजारों लोकांच्या गर्दीत तुम्ही कोण हे थोड्या दिवसांपूर्वी कोणाला माहीतसुद्धां पडत नव्हतें. त्या एकंदर गर्दीतून तुम्ही निवडले जाऊन पोप झालां. पण पूर्वी तुम्ही काय होतां? आणि असें आहे, तर मग तुमच्यांत आणि माझ्यांत काय फरक आहे! आपण दोघेही सारखेच आहों. आणि त्या दृष्टीनें आपण एकमेकांनीं एकमेकांच्या हातांत हात घालण्याला काय हरकत आहे?" असें म्हणून नेपोलियननें आपला हात पोप पायस याच्यापुढे केला. नेपोलियनचे वरील सर्व उद्गार ऐकून पोपचें अंतःकरण खरोखरच द्रवलें होतें. त्याच्या डोळ्यांतून एक अश्रुबिंदु बाहेर आला, आणि त्यानें नेपोलियनशीं शेकहॅन्ड करण्याकरितां आपला हात पुढें केला. पोपच्या डोळ्यांतून बाहेर आलेला अश्रुबिंदु पाहून आपला राज्याभिषेकाचा हेतु खात्रीनें सफळ होणार हे नेपोलियननें ताडलें आणि त्याला गालांतल्या गालांत थोडेसें समाधानाचें हंसूं आलें. आणि इतकें होऊन पोप आणि नेपोलियन यांच्यामधील ही मुलाखत संपली.

अशा प्रकारचे उदात्त उद्गार वाचून आणि अशा प्रकारच्या महत्त्वाकांक्षेचें भव्य आणि विस्तीर्ण चित्र पाहून मनाची फार विलक्षण स्थिति होते. नेपोलियन आपल्याबरोबर आपल्या मनांना कोठें तरी एखाद्या उच्च शिखरावर घेऊन जातो; आणि तेथें आपण क्षणभर तद्रूप बनतो. त्या अवधींत आपण सर्व कांहीं विसरून जातों, आणि आपल्या डोळ्यांपुढे फक्त एकच महत्त्वाकांक्षेचें विराट् स्वरूप दिसत असतें. परंतु कांहीं वेळानें हळूहळू आपली समाधि

उतरते. नेपोलियननें नेऊन बसविलेल्या उच्च पर्वतशिखरावरून आपण खालीं खालीं येऊं लागतों. मग आपल्या जवळच्या वस्तु आपल्याला दिसू लागतात; व आपल्या रोजच्या संसारांतील दुःखाचे विलाप आपल्या कानांना ऐकू येऊं लागतात. आणि आपला देश गुलामगिरीमध्यें आहे याची अंतःकरणाला होरपळून सोडणारी आठवण फिरून होऊं लागते. ती गुलामगिरी जर आपल्या देशांतून नाहींशी व्हावयाला पाहिजे असेल, तर असला महत्त्वाकांक्षी महापुरुष आपल्या देशाला मिळाला पाहिजे, असें प्रत्येक अंतःकरणाला वाटूं लागतें, आणि प्रत्येक तरुण मनुष्य आपल्या मनगटाकडे पाहून मी आपल्या देशाचा नेपोलियन होईन काय असा क्षणभर आपल्या मनाशींच प्रश्न विचारतो वकील या महत्त्वाकांक्षेच्या भव्य मूर्तीकडे प्रथम थोड्याशा लालसेनें पाहतों, परंतु कांहीं वेळानें मान हालवून 'आपण आपल्या पक्षकारांकरतांच आहों' असें म्हणून आपलें ब्रीफ पुढें वाचूं लागतो, आणि इतर उदात्त व कट्टे देशभक्त प्राणी आपल्या सालिना पन्नास रुपयांच्या अवाढव्य उत्पन्नांतून दरसाल चार आणे राष्ट्रोन्नतीच्या कार्याला देण्याची आपल्या जिवाकडेही न पाहतां उदारपणानें घनघोर भीष्मप्रतिज्ञा करून आपल्या पाठीवर हात थोपटून घेतात!

## मिशनरी बावा आणि त्याचा लुच्चेगिरीचा कावा : : : २१

काळ : अग्रलेख, ता. ८-३-१९०७

● धर्माच्या ढोंगाखाली राजकारणाचा कावा चालू असतो. तो ओळखतां आला असता तर हल्लीच्या राजकारणांतील ढोंगेही उपस्थित झाली नसतीं.

" लोक म्हणती बावा बावा ।
न कळे गुलामाचा कावा ॥ "

मिशनरी लोकांना नांवें ठेविलीं म्हणजे कित्येकांना फार राग येत असतो, व तीं गरीब भोळीं, देवाच्या भजनीं लागलेलीं व परोपकारासाठीं देह झिझविणारी माणसें आहेत, त्यांच्यावर काय भलभलते आळ घ्यावे, असें मोठ्या कळकळीनें म्हणून कित्येक लोक त्यांच्या बाजूचें संरक्षण करीत असतात. परंतु ही मोठी चूक आहे. हे मिशनरी लोक इतर ठिकाणीं जाऊन तेथील रहिवाशांचें दोन बाजूंनीं नुकसान करीत असतात. एक त्यांचा धर्म तर हे राजरोसच बुडवितात; पण आंतून त्यांचें राज्य बुडविण्यासाठींही या मिशनरी लोकांचे चोरून प्रयत्न चाल-लेले असतात. अशी ही दुहेरी तरवार जेव्हां एखाद्या देशाच्या पोटांत शिरते तेव्हां त्याच्या धार्मिक आणि राजकीय अशा दोन्हीही बाजू छिन्नविच्छिन्न होऊन गेल्या तर त्यांत मोठेसें आश्चर्य आहे असें नाहीं. असले हे जे प्रतिष्ठित घरांत शिरतात, ते एखाद्या सामान्य चोरापेक्षां आपले हजारों पटींनीं जास्त

नुकसान करीत असतांही त्यांच्याविरुद्ध एक ब्र काढण्याचीसुद्धां उलट आप-ल्यालाच चोरी असते. या संभावितांच्याविरुद्ध पुराव्याशिवाय बोलण्याची सोय नाहीं. हे युरोपियन मिशनरी म्हणजे बाह्यात्कारी धर्मासाठीं आलेले दिसतात, परंतु आंतून त्यांचा कावा अगदीं निराळा असतो. हे आपल्या राजाचे गुप्त हेर असतात, आणि त्यांचे राजकीय हेतु साधून देण्याला हे फार कुशलतेनें साधनी-भूत होत असतात. हे गुप्त हेर असतील असा कोणाला संशयही येत नाहीं, आणि त्यामुळे गुप्त बातम्या काढून त्या आपल्या सरकारला कळविण्याचें आपलें काम त्यांना अगदीं शांतपणानें आणि बिनधास्त रीतीनें करतां येतें. रशियानें एशिया खंडांतील थोडाथोडका मुलूख आपल्या गुलामगिरींत आणला आहे असें नाहीं. ही गोष्ट त्याला कशी करतां आली, हा एक मोठा प्रश्न आहे. परंतु असे लेख आढळतात कीं, या कामीं रशियानें आपल्या मिशनरी लोकांचा पुष्कळ उपयोग केला. रशियन मिशनरी पायघोळ झगे घालून आणि आपले लांच लांच केस मोकळे सोडून एशिया खंडांतील रानटी लोकांमध्यें येऊन मिसळावयाचे ! आणि आपल्या पूजाअर्चेच्या डामडौलानें त्या भोळ्या लोकांना थक्क करून सोडून त्यांना बाह्यात्कारी बायबलचा उपदेश कराव-याचे ! असा ह्या मिशनरी लोकांचा क्रम नेहमीं चाललेला असावयाचा. पण एशिया खंडाच्या कोणत्याही दूरदूर भागांतून ते गेलेले असले तरी सेंटपीटर्स-बर्ग शहराशीं मात्र यांचा नेहमीं पत्रव्यवहार चालू असावयाचा. पण हीं पत्रें ते कोणाला धाडीत असतात ? सेंटपीटर्सबर्गमधील आपल्या बायकांमुलांना ते तीं पत्रें लिहीत असतील असें कोणाला वाटेल; परंतु तसें मुळींच नाहीं. बरें, त्या पत्रांत ते लिहीत तरी काय असतील ? आम्ही अमुक ठिकाणीं अमुक लोक स्वधर्मभ्रष्ट केले, अशी आपल्या बाटविण्याच्या कामाची बहुधा त्यांत हकीकत दिलेली असेल, असा कोणी तर्क करील; पण हा तर्कही अगदीं चुकीचा आहे. असल्या हकीकती त्यांत मुळींच नसतात. देवाच्या ढोंगाखालीं दरवडेखोरांच्या टेहळणीचें त्यांनीं जें काम केलेलें असतें त्याचे गुप्त रिपोर्ट त्या पत्रांतून रशि-यन बादशहाला कळविले जात असतात ! ते जेथें जातात तेथील नकाशे तयार करून ते पाठवितात ! त्या प्रांतांत तटबंदीचीं गांवें आणि शहरें कोण-कोणतीं आहेत, तेथील लोक कोणत्या स्वभावाचे आहेत, ते जातीचे लढवय्ये आहेत किंवा शांतताप्रिय आहेत, त्या मुलखांत इतर युरोपियन देशांपैकीं

कोणत्या एखाद्या देशांतील कोणी लोक येऊन राहिले आहेत कीं काय, व असल्यास ते किती आहेत, त्यांचें तेथील नेटिव लोकांशीं दळणवळण कितपत वाढलें आहे, आणि तेथील सरकारपाशीं त्यांचे वजन किती आहे, वगैरे राजकारणांत उपयोगी पडणाऱ्या असंख्य बारीकसारीक गोष्टींबद्दल तपास काढून त्याची हकीकत लोकांना येशूख्रिस्ताकडे नेण्याकरितां आलेले हे मिशनरी लोक चोरून आपल्या राजाकडे पाठवीत असतात! चीन, मँचुरिया, मध्यएशिया वगैरे ठिकाणचे भोळे आणि अडाणी लोक, त्यांना या युरोपियन मिशनरी बुवांचा कावा काय समजणार? यांच्या झग्यांच्याखाली त्यांच्या मुलखांचे चोरून काढलेले नकाशे छपवलेले असतात ते त्या अडाणी लोकाना कसे समजणार? आपल्या किल्ल्याची आणि तटबंदीची लांबी, रुंदी आणि उंची मोजून घेऊन त्यावरून तयार केलेली चित्रे या मिशनऱ्यानीं आपल्या खिशांतून दडवलेलीं त्या बिचाऱ्यांना काय कळणार? मिशनरी लोक क्रॉस पुढें करून येतात, पण या क्रॉसच्यामागें तरवार छपविलेली आहे हे त्या सृष्टीच्या बाल्यावस्थेंत राहणाऱ्या लोकांना समजत नाहीं. बायबलाच्या बुका-च्या आड जमीन मोजण्याचीं यंत्रे, दुर्बिणी, कंपास वगैरे जीं अनेक साधनें हे मिशनरी लोक झांकून ठेवतात तीं तेथील रानटी लोकांच्या लक्षांत येण्याचा कांहींच संभव नसतो. आणि त्यामुळें या मिशनरी गुप्त हेरांना आपलें बदमाषपणाचें काम फारच चांगल्या रीतीने करतां येतें. मिशनरी लोकांनीं अशा रीतीनें पुढें जाऊन असली जरूर ती माहिती पाठविली म्हणजे पुढील सर्व व्यवस्था झारसाहेब करतात. रशियाचें सैन्य जाऊन तो प्रांत काबीज करतें; आणि रशियाचे लोक जाऊन तेथें वसाहती करतात! मिशनरी लोकांनी गुप्तपणानें पाठविलेल्या बातम्यांवरून सायबेरियामध्यें लोखंडी रस्ता बांधण्यात आला आहे. हे रशियाचे मिशनरी गुप्त हेर एकदां खुद्द लासा शहरापर्यंतही आलेले होते आणि म्हणूनच इंग्लिशांना तिबेटवर स्वारी करणें भाग पडलें, असें ज्यानें हें मिशनऱ्याचें व्यंग बाहेर काढलें आहे त्याचें म्हणणें आहे.

वाचकांनीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, ही जी वर दिलेली हकीकत आहे ती इंग्रजी मिशनऱ्याची नाहीं. ती रशियन मिशनऱ्यांची आहे. आपल्या इकडचे लोक अज्ञानी आहेत. त्यांना मिशनरी वाईट म्हटलें म्हणजे सगळेच मिशनरी वाईट वाटावयाचे! रशियन मिशनरी वाईट असतात, पण इंग्लिश

मिशनरी चांगले असतात. ते असलीं कृतघ्नपणाचीं, बदमाषपणाचीं आणि फसवणुकीचीं, धर्मविरुद्ध कृत्यें करणार नाहीत, इतका भेद सामान्य लोकांच्या कोठून लक्षांत येणार? इंग्रजी मिशनरी म्हणजे काय आणि रशियन मिशनरी म्हणजे काय, इतका भूगोलाचा सूक्ष्मभेद अडाणी लोकांना कळणार तरी कोठून? इंग्लिश मिशनऱ्यांनींही असलीं कामें केलीं नसतील असे नाहीं. पण जोपर्यंत त्यांच्या गुप्त पोलिसच्या कामाबद्दलचा उल्लेख कोठे आढळला नाहीं, तोपर्यंत पुराव्यावांचून तसें कधीही म्हणतां यावयाचें नाहीं. रशियन मिशनऱ्यांची ही कावेबाज कृति कळण्याच्या पूर्वी ते तरी धर्मप्रसाराच्या नांवाखालीं गरीब लोकांचे असेच गळे कापीत असतील म्हणून कोणाला वाटलें होतें? पण मिशनऱ्यांच्या हातून राजकीय माहिती मिळवावयाची ही एक युरोपियन युक्ति आहे. आणि ती कदाचित् इंग्लिश लोकही आपल्या मिशनऱ्यांकडून उपयोगांत आणवीत नसतील कशावरून? रशियांतील मिशनरी असा विश्वासघात करीत असतात तेव्हां हिंदुस्थानांतील मिशनऱ्यांवर आपण विश्वास ठेवावयाचा किंवा नाहीं या प्रश्नाचा आपण विचार केला पाहिजे. मात्र त्यांच्याविरुद्ध उघड पुरावा कांहीं एक नाहीं! हिंदुस्थानांतील मिशनऱ्यांनींही कदाचित् पूर्वी येथील लोकांना एखाद्या किल्ल्याच्या सावलीखालीं उभें राहून शुभवर्तमान सांगत असतांना त्या किल्ल्याची लांबीरुंदी टिपून घेतली असेल, आणि त्याचा प्लॅन चोरून तयार करून तो विलायतेस पाठवून दिला असेल. पण तसें म्हणण्याला आपल्यापाशीं पुरावा काय आहे? आणि पुराव्यावांचून एक अक्षरही बोलणें चांगलें नाहीं!

परंतु धर्माच्या ढोंगाचा राजकीय कामाकडे उपयोग करण्याची कल्पना इंग्लिशांना माहीतच नाहीं असें मात्र नाहीं. धर्माच्या पांघरुणाखालीं त्यांनीं आपले किती तरी कपटहेतु झांकून नेलेले असले पाहिजेत. रुडिअर्ड किप्लिंग हा अँग्लो-इंडियन लोकांच्या गळ्यांतील ताईत झालेला असा एक अर्वाचीन लेखक आहे. यानें अनेक कादंबऱ्या लिहिलेल्या आहेत. नेटिवांना महाप्रयासानेंही समजणार नाहींत अशा हिंदुस्थानांतील राजरहस्यांतील अनेक गुप्त गोष्टी इंग्लिश लोकांना सहज समजतात. तशी मि. रुडिअर्ड किप्लिंग यांना संधि असल्यामुळें तिचा फायदा घेत असतांना त्यांना आपल्या ज्या "सीक्रेट सर्व्हिस" मधील गुप्त गोष्टी कळल्या, त्या निरनिराळ्या प्रसंगांच्या काल्पनिक

पांघरुणाखालीं झांकून त्यांनीं आपल्या 'किम' या नांवाच्या कादंबरीमध्यें सर्व लोकांच्या उघडकीस आणून दिल्या आहेत. त्या कादंबरींतील कथानक खरें असो किंवा खोटें असो, परंतु त्यांतील गुप्त बातम्या काढण्याच्या कल्पना मात्र इंग्लिशांच्या आहेत, एवढी गोष्ट निर्विवाद आहे. त्यावरून पाहतां इंग्लिश लोक-ही धर्माच्या ढोंगाचा राजकारणाकडे उपयोग करण्याला मागेपुढें पाहत नाहींत असेंच दिसून येतें. मि. रुडिअर्ड किप्लिंग यांचे गुप्त हेर नेटिव साधूंचीं सोंगें घेतात आणि बरेच कार्यभाग साधितात. शत्रूच्या किल्ल्याचा परिघ मोजावयाचा असला तर रशियन मिशनरी कदाचित् सांखळदंड घेऊन मोजीत असेल. पण इंग्रजी गुप्त हेर फार वस्ताद ! ते असलीं दृश्यमान होणारीं साधनें कांहींच जवळ बाळगीत नाहींत. एकसारखीं बरोबर सारख्या अंतरावर पावलें टाकीत चालण्याची त्यांनीं संवय केलेली असते. त्यामुळें अमुक पावलें झालीं म्हणजे अमुक जमीन झाली असें त्यांना ताबडतोब ताडतां येतें. शिवाय हे गुप्त हेर साधु आपल्या पावलांनीं जमीन मोजीत असतां फार आंकडे झाले तर ते लक्षांत राहणार नाहींत म्हणून ते आंकडे मोजण्याकरितां ते आपल्या हातांतील स्मरणीच्या मण्यांचा उपयोग करीत असतात. पावलें मोजीत बसावयाला नको. एक माळ झाली कीं एकशें आठ पावलें झालीं ! तसेंच किप्लिंगचीं हीं पात्रें आपल्याजवळ नेहमीं निरनिराळ्या प्रकारचे तीन-तीन, चार-चार पोषाख बाळगतात. एकच मनुष्य एकदां साहेब होतो, तर फिरून एखादे वेळीं तो नेटिवाच्या पोषाखात दिसतो. आगगाडीच्या एका स्टेशनावर तो परदेशी शिपाई म्हणून डब्यांत बसला तर दुसऱ्या स्टेशनावर एक बैरागीच खालीं उतरतो ! गुप्त मजकुराचीं पत्रें जोड्याच्या टाचेखालच्या दुमडलेल्या कातड्याखालीं छपवून नेलीं जातात किंवा एखादें रानचें फळ फोडून त्याच्या कवचीच्या आंत पत्र घालून फिरून तें फळ पूर्वीं होतें तसें डकवून एक करून अनेक फळांत मिसळून रवाना करण्यांत येतें ! भाषा बदलून वापरण्यांत येतात. घोडे विकणारे लोक हे बातमी काढण्याचीं आणि पोहोचविण्याचीं कामें करतात ! गुप्त हेरांना नांवें नसून त्यांना जे ठराविक नंबर दिलेले असतात त्यांवरून किप्लिंगसाहेब आपल्या पात्रांचे व्यवहार चालवितात. किप्लिंगसाहेबांनीं गुप्त हेरांनीं एकमेकांना ओळखण्याचा जो प्रकार उघडकीस आणला आहे तो येणेंप्रमाणें आहे :—दोघांचें भाषण सुरू

झाले असतां भाषणाचा ओघ एका ठराविक, उदाहरणार्थ जेवणाच्या, विषया-कडे आणावयाचा, आणि त्यांतील कोठल्या तरी जेवणाच्या पदार्थांचें नांव काढून ते कांहीं ठराविक रीतीनें लांच हेल काढीत किंवा दुसऱ्या कांहीं तरी प्रकारानें उच्चारावयाचें. आणि ती खूण पटली तर हा आपल्यापैकींच आहे असें ओळखावयाचें. किप्लिंगचीं पात्रें अशाच रीतीनें एकमेकांना ओळखतात. मि. रुडिअर्ड किप्लिंग यांच्या लिहिण्यावरून धार्मिक साधूंच्या सोंगाचा तर गुप्त बातम्या काढण्याकडे उपयोग केला जातोच; परंतु सरकारचीं दुसरींही अशीं कित्येक खातीं आहेत कीं, त्यांचें बाह्य स्वरूप कांहींही असलें तरी वास्तविक त्यांचा उद्देश शत्रूकडील ठिकाणें, किल्ले, नद्या, डोंगर, रीतरिवाज, लोकस्थिति, वगैरेसंबंधाची माहिती काढण्याचाच असतो. सरहद्दीच्या डोंग-राळ मुलखांतून एथ्नॉलॉजिकल सर्व्हे, जिऑग्रॉफिकल रिसर्च, ट्रिग्नामेट्रिकल सर्व्हे, वगैरे जीं अनेक सोंगें फिरत असतात, तीं केवळ दिसतात तशीं नसून त्यांच्यांत भावी राजकारस्थानांचें पुष्कळ बीज असतें, असें किप्लिंगसाहेबां-च्या माहितीवरून म्हणावें लागतें. किप्लिंगसाहेबांनीं एका प्रसंगाचें वर्णन करतांना असें सांगितलें आहे कीं, रशियाच्या जिऑग्रॉफिकल सर्व्हेपैकीं दोन ऑफिसर शिकारीकरितां हिंदुस्थानांत आले होते व ते शिकारीच्या निमित्तानें सगळीकडे फिरून निरनिराळ्या किल्ल्यांचे फोटो आणि प्लॅन काढून घेत असत. हे गुप्त हेर आहेत असें कळल्याबरोबर हिंदुस्थान सरकारनें त्यांच्या-वर आपले गुप्त हेर योजिले. त्यांनीं त्यांना गांठून हिमालयांत शिकारीला नेलें आणि तेथें कांहीं तरी कुरापत काढून एकानें त्यांना डोंगरावरून खालीं ढकलून दिलें, आणि फिरून "तुम्ही पडलां कीं काय, तुम्हांला फार लागलें कीं काय," म्हणून त्यांच्या समाचाराला गेला; आणि दुसऱ्यानें इकडे त्यांचें सामान पळवून त्यांनीं दहा महिने फिरून जमा केलेले गुप्त नकाशे व इतर सर्व कागदपत्र पळवून सरकारच्या एजंटापाशीं नेऊन दिले. ही जशी रशियाची जिऑग्रॉफिकल सर्व्हे, तशीच ती हिंदुस्थान सरकारचीही असली पाहिजे! किप्लिंगसाहेबांची कादंबरी ही जरी कपोलकल्पित असली, तरी त्यांतील गुप्त हेरांच्या युक्त्यांना इंग्रजी सीक्रेट सर्व्हिसच्या खात्यामध्यें कांहींच आधार नसेल, अशी कल्पना करणें अशक्य आहे. या किप्लिंगसाहेबांच्या हकीकतीवरून धर्माच्या पांघरुणाचा, साधूंच्या सोंगांचा, आणि स्मरणीच्या

मण्यांचा देखील राजकारणांत इंग्लिश लोक किती उपयोग करतात हे वाचकांच्या लक्षांत येईल. आणि जे स्मरणीचे मणीदेखील सोडीत नाहीत ते मिशनऱ्यांसारख्या उपयुक्त लोकांना सोडतील हे संभवत नाही. हल्लीं मिशनऱ्यांच्याही विरुद्ध इकडील पुष्कळ लोक खवळलेले आहेत. परंतु पूर्वी लोकांना त्यांचें हे कपट माहीत नव्हते तेव्हां कदाचित् त्यांनीं हीं येथील गुप्त हेरांची कामें रशियांतील मिशनऱ्यांप्रमाणे बजाविलीं असतील. परंतु तसा कोठें उघड उल्लेख नाहीं. आणि पुराव्याशिवाय असल्या गोष्टी बोलण्यातही कांहीं फायदा नाही. सबब फक्त रशियांतीलच मिशनरी आपल्या सरकारची गुप्त हेरांची कामें करतात एवढेंच सांगून हा लेख पुरा करणे भाग आहे.

---

# हिंदुस्थानाकरितां एक भाषा पाहिजे : : २२

काळ : अग्रलेख, ता. ४-१-१९०७

● पण ही भाषा म्हणजे उर्दू लिपींतली धेडगुजरी हिंदी नव्हे; तर पारिभाषिक रीतीनें वक्ता व श्रोता या दोघांना उमजेल अशी अंतःकरणाची भाषा.

सगळ्या हिंदुस्थानाकरतां एक भाषा पाहिजे ही ओरड आजकालची नाहीं. पुष्कळ दिवसांपासून लोकांना या गोष्टीची उणीव भासत आहे; व एकभाषाप्रचारासंबंधानें कित्येक लोकांचे प्रयत्नही सुरू झाले आहेत. परंतु त्या प्रयत्नांना जसें यश यावें तसें अद्यापि आलेलें नाही, हे यंदांच्या राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षांच्या भाषणावर आपल्या नेटिव लोकांनीं केलेल्या नानाविध प्रकारच्या टीकेवरून विचारी मनुष्याच्या तेव्हांच लक्षांत येईल. यंदाच्या अध्यक्षांच्या भाषणाचा उल्लेख केल्यानंतर " हिंदुस्थानाकरतां एक भाषा पाहिजे " असें म्हणण्यांत आमचा काय अर्थ आहे हे बहुतेक वाचकांच्या लक्षांत आलेच असेल. हिंदुस्थानांत उर्दू, पर्शियन, सिंधी, हिंदी, बंगाली, मराठी, गुजराती, कानडी, तेलगू, मल्याळी, वगैरे अनेक भाषा लोक बोलतात आणि त्यामुळें त्यांचा भावार्थ एकमेकांना कळत नाहीं, तो कळण्याकरतां हिंदीसारखी कोठली तरी एक सामान्य भाषा सगळ्या हिंदुस्थानाकरतां पाहिजे आहे, हा सामान्य आणि उघडा अर्थ आहे. तसली हिंदीसारखी एक भाषा तर सगळ्या हिंदुस्थानाला पाहिजेच आहे. परंतु प्रस्तुत प्रसंगीं त्या अर्थाची येथें आकांक्षा

नाहीं. हिंदीसारखी एक भाषा असावी असा अर्थबोध होण्याकरतां प्रस्तुतचा मथळा लिहिलेला नाहीं. त्याचा अर्थ निराळा आहे. त्याच्या स्पष्टीकरणाकडे आपण क्षणभर वळूं.

यंदाच्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष मि. दादाभाई नौरोजी यांच्या भाषणासंबंधानें पाहिजे त्यानें पाहिजे तसे उद्गार काढलेले आहेत. ॲंग्लो-इंडियन लोकांचें त्यांच्यासंबंधानें काय वाटेल ते मत असो; ते पाहण्याचा तूर्त प्रसंग नाहीं. परंतु त्यांनीं मि. दादाभाई यांच्या भाषणाला नांवें ठेविलीं म्हणून त्यांच्या भाषणाबद्दल त्यांच्या देशबांधवांमध्ये इतका मतभेद उत्पन्न व्हावा ही खरोखर मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे. इतकेंच नव्हे, तर आपल्या देशबांधवांची भाषा आपल्याला बरोबर समजूं नये ही फक्त आश्चर्याचीच गोष्ट नसून अतिशय दुःखाचीही गोष्ट आहे. आपल्याला एकमेकांची भाषा समजणें जरूर आहे. एक काय म्हणतो त्याचा भावार्थ जर दुसऱ्यानें लक्षांत घेतला नाहीं तर आपण सगळ्या देशाचें जें एक सामान्य असें हित ते साधण्याला कसे समर्थ होणार? मि. दादाभाई इंग्रजींत बोलले; आणि इंग्रजांच्या कृपेनें हिंदुस्थानांतील पुष्कळ लोकांना इंग्रजी चांगलें समजूं लागलें आहे, परंतु शब्दांचे अर्थ जरी कळूं लागले असले तरी भावार्थ कळूं लागले नाहींत असें म्हणावें लागतें. पंतोजींनीं आणि शाळामास्तरांनीं शिकविलेले अर्थ समजतात हे निर्विवाद आहे. परंतु मुत्सद्दीपणाला जो अर्थ समजावयाला पाहिजे तो समजलेला दिसत नाहीं. इंग्रजी भाषेचें व्याकरण आणि कोश यांच्या साहाय्यानें जितका शब्दार्थ समजणें शक्य आहे तितका तो समजतो यांत शंका नाहीं. पण हल्लींच्या इंग्रजी परिस्थितीनें जो अर्थ समजला पाहिजे तो अर्थ कोणाच्याही ध्यानांत आलेला दिसत नाहीं. आणि त्यामुळें मि. दादाभाई हे इंग्रजी भाषेत बोलत नसून कोठल्या तरी एखाद्या अश्रुतपूर्व भाषेमध्यें भाषण करीत आहेत कीं काय, असा भास होतो. बॅबिलोनमधील लोक एक उंच बुरूज बांधून स्वर्गाच्या जवळ जवळ चालले होते, त्या वेळीं देवानें एकाची भाषा दुसऱ्याला समजूं नये अशी युक्ति केली आणि त्या भाषाभेदामुळे त्या एकहेतूसाठीं प्रवृत्त झालेल्या लोकांमध्ये अतिशय घोंटाळा माजून त्यांचा आत्मोन्नतीचा प्रयत्न व्यर्थ गेला. हिंदुस्थान हें तूर्त तशा प्रकारचें बॅबिलोन होण्याची फार भीति आहे. आपण सर्व स्वराज्या-

च्या आणि स्वतंत्रतेच्या स्वर्गाला जाऊन पोंहोचण्याकरितां एकत्र होऊन काँग्रेसचा बुरुज उच्च उभारीत आहों, असें पाहून आपले देव जे इंग्रज लोक ते युक्तीनें आपल्यामध्यें भाषाभेद उत्पन्न करीत आहेत, आणि त्यामुळें आपले अध्यक्ष काय म्हणतात, हें आपल्याला कळत नाहीं, आणि आपण काय म्हणतों हें आपल्या अध्यक्षांना समजत नाहीं. अशा प्रकारचा या हिंदुस्थानच्या बॅबिलोनमध्यें सर्वत्र घोटाळा माजून राहिला आहे. आणि त्यामुळें आपलेही आत्मोन्नतीचे इष्ट हेतु निष्फळ होण्याचा संभव आहे. याकरतां आपल्या देवांनीं आपल्यामध्यें हा भाषाभेद घुसडून देण्याची जी युक्ति केली आहे तिच्याविरुद्ध आपणही कांहीं तरी युक्ति योजिली पाहिजे.

हिंदुस्थानाला स्वराज्य असूं नये, तो देश स्वतंत्र होऊं नये, त्यानें नेहमीं दुसऱ्याच्या जुलमांत आणि गुलामगिरींतच राहावें, असें वाटण्याइतका अधम हिंदुस्थानांत कोण असूं शकणार आहे ? आपला देश बंधमुक्त व्हावा, त्याला स्वातंत्र्य मिळावें, आणि त्याची राज्यव्यवस्था फक्त येथील लोकांच्याच हातांत असावी, असें प्रत्येकाला मनामधून वाटत असलें पाहिजे तरी पण उघड रीतीनें हें प्रतिपादन करण्याला फारच थोडे लोक धजतात. आणि असें कां होतें असा जर कोणी प्रश्न विचारील, तर या प्रश्नाचें उत्तर त्याला इंग्लिश लोकांच्या कायद्यांमध्यें सांपडूं शकेल. अमुक अमुक गोष्टी बोलल्या गेल्या तर तो राजद्रोह होतो असें जें इंग्लिशांनीं येथें ठरविलेलें आहे तीच त्यांची युक्ति; आणि त्या युक्तीमुळेंच आत्मोन्नतीच्या गगनचुंबित बुरुजावर उंच चढूं इच्छिणाऱ्या आपणांमध्यें भाषाभेद उत्पन्न झाला आहे. म्हणजे आपण भिन्न भिन्न भाषा बोलूं लागलों आहों असें नव्हे, तर जी मनाची खरी आणि सरळ भाषा ती आपणा हिंदुस्थांतील लोकांना बोलतां येईनाशी झाली आहे. आणि त्या मनाच्या भाषेहून भिन्न अशी भलतीच भाषा आपण बोलूं लागलों आहों. जें मनाला पाहिजे असतें तें वाचेला बोलतां येत नाहीं, आणि वाचा जें बोलत असते तें मनाला नको असतें, अशी प्रस्तुतची स्थिति असल्यामुळें साहजिकपणेंच मन आणि वाचा यांच्यामध्यें हल्लीं फार वितुष्ट पडलें आहे. मन सांगत असतें, अमुक बोल; वाचा तें बोलत नाहीं. वाचा म्हणत असते, तूं आपल्या सहजस्फूर्तीनें मला गोंधळून सोडूं नको; जिवंत मन प्रेतवत् पडूं शकत नाहीं. अशी स्थिति झालेली आहे. आणि यामुळें अर्थातच तोंडच्या भाषेमध्यें फरक

पडला आहे. मनांत फरक नाहीं. वाचेंत काय तो फरक आहे. मनें एक आहेत; आणि वाचा फक्त कामापुरत्या आणि त्या त्या वेळेच्या आवश्यकतेनुरूप केवळ बाह्यात्कारी भिन्न झालेल्या आहेत. ही परिस्थिति प्रथमतः सगळ्यांनीं ओळखली पाहिजे व कबूल केली पाहिजे.

इंग्रजांनीं आपल्या एका लहानशा युक्तीनें आपल्यामध्यें हा भाषाभेद कसा उत्पन्न केला आहे हें येथपर्यंत दर्शविलें. त्यावर आपण काय युक्ति योजिली पाहिजे, याचा प्रत्येकानें विचार करणें जरूर आहे. राजकीय महत्त्वाकांक्षेसबंधानें आपण कसे बोलावें याबद्दलची भाषा इंग्लिशांनी आपल्याला ठरवून दिली आहे, त्याप्रमाणें बहुधा बऱ्याच लोकांना बोलणें भाग पडत आहे. ही परिस्थिति लक्षांत आल्याबरोबर एक मोठा फायदा आपल्याला होतो, आणि तो हा कीं, ही बनावट भाषा आहे, ही खोटी भाषा आहे, ही जिव्हेच्या टोंकाची भाषा आहे, अंतःकरणाच्या मुळाची भाषा नव्हे, असें आपणाला समजतें; आणि इतकें समजलें तर हल्लींच्या काळची राजकीय भाषा समजण्याच्या बाबतींत थोडें समजलें असें नाहीं. हें ज्याला समजलें त्याला इंग्रजी युक्तीनें निर्माण केलेला भाषाभेद नाहींसा झाला आणि जिव्हेच्या या मिथ्या भाषेच्या पलीकडे अंतःकरणाची खरी भाषा काय आहे, हें पाहण्याकडे तो आपलें लक्ष पोहोंचवूं लागतो. आणि तो अशा अंतर्दृष्टीनें पाहूं लागला म्हणजे याच्या अंतःकरणाला दुसऱ्याचें अंतःकरण स्पष्ट दिसूं लागतें. ही अंतर्दृष्टि जर वक्ता आणि श्रोता यांच्या दरम्यान वायरलेस टेलिग्राफीप्रमाणें जागृत होऊन खेळत असली, तर तोंड कांहींही वाक्यें उच्चारीत असलें आणि कान कांहींही शब्द ऐकत असले, तरी अंतःकरण अंतःकरणाला ओळखतें. इतकी जेथें व्यवहारचतुरता उत्पन्न झालेली आहे, तेथें अंतर्यामीची खूण एकमेकांना सहज पटते. परंतु हें जेथें नाहीं, तेथें मात्र सर्वच घोंटाळा माजून राहतो. तेथें एक काय म्हणतो तें दुसऱ्याला समजत नाहीं आणि दुसऱ्याला काय हवें असतें तें तिसरा सांगूं शकत नाहीं. भाषाभेदांचा पूर्ण प्रभाव अशा ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येतो. म्हणून असे घोटाळे न होण्याकरितां आपण हिंदुस्थानांतील लोकांनीं आपल्याला जरूर पाहिजे तो व्यवहार अडूं नये म्हणून कांहीं तरी एक भाषा ठरवून घेतली पाहिजे. कुत्र्याला कुत्रा म्हटल्यानें जर एखाद्याला राग येत असेल तर तेवढ्यापुरती आपली भाषा बदलून त्या कुत्र्याला राजा म्हणून म्हटलें म्हणून आपलें काय खर्च होतें?

मात्र राजा म्हटलें म्हणजे त्याचा अर्थ कुत्रा असा समजावयाचा इतकें सगळ्यांनीं लक्षांत ठेवलें म्हणजे झालें! आपला अभिप्राय इतरांना न कळतां फक्त विवक्षित लोकांनाच कळावा अशासाठीं करपल्लवी, नेत्रपल्लवी, वगैरे भाषा योजिण्याचा आपल्यामध्ये जसा पूर्वीचा प्रघात आहे, तशीच प्रस्तुतच्या परिस्थित्यनुरूप कांहीं तरी ठराविक सांकेतिक भाषा बोलण्याला आणि समजण्याला आपण सुरवात केली पाहिजे. जेव्हां एखादा कुशल वक्ता बोलत असतो, तो तोंडानें एक भाषा बोलत असतो, त्याचे हात दुसरीच भाषा बोलत असतात, त्याचे डोळे तिसरीच गोष्ट ध्वनित करीत असतात, आणि तिघांहूनही भिन्न अशी निराळीच खरी गोष्ट त्याच्या अंतःकरणांतून परिस्फुटता पावत असते. पूर्वीच्यासारखे धोपटमार्गी राजे जेव्हां राज्य करीत असत, तेव्हां बोलण्याचालण्याचेही धोपटमार्ग पुरे पडत होते. परिस्थित्यनुरूप फेरफार केल्यावांचून गत्यंतर नाहीं. जेथे खरें बोलण्याची बंदी असेल, तेथे बाह्यात्कारी खोटेंच बोललें पाहिजे. परंतु ते समजणारांनीं मात्र यथाश्रुतच समजून उपयोगी नाहीं.

आणि मि. दादाभाई नौरोजी यांच्या भाषणासंबंधानें जो पुष्कळ मतभेद आणि गैरसमज झालेला आहे, तो याच गोष्टीमुळें झालेला आहे. हल्लींच्या काळांत जें बोलावयाचें असतें तें बोलावयाचें नाहीं, आणि जें बोलावयाचें नसतें तेवढें मात्र बोलावयाचें अशी परिस्थिति असतांना ती श्रोत्यांनीं लक्षांत न घेतल्यामुळें मि. दादाभाई यांच्या भाषणासंबंधानें अनेक विपर्यास चालले आहेत. मि. दादाभाई यांनीं असें बोलावयाला पाहिजे होतें, आणि तसें बोलावयाला पाहिजे होतें, असे उपदेश सुधारकासारख्या पत्रांनीदेखील करावयाला सुरवात केली आहे. जणूं काय मि. दादाभाईंना स्वतःची××× कांहीं नसून सगळी त्यांनीं असल्या लोकांपासूनच शिकावयाला पाहिजे आहे! मि. दादाभाई हे पुष्कळ स्पष्टवक्ते आहेत आणि इंग्लंडांत तर त्यांनी येथल्यापेक्षां पुष्कळ पटींनीं जास्त स्पष्टवक्तेपणा प्रदर्शित केलेला आहे. परंतु इंग्लंडांतील स्थिति आणि हिंदुस्थानांतील स्थिति यांच्यांत पुष्कळ फरक आहे. हिंदुस्थानासंबंधानें इंग्लंडांत जें बोलतां येईल तें सगळें हिंदुस्थानांत बोलतां यावयाचें नाहीं. इंग्लंडांत हिंदुस्थानासंबंधानें एखाद्यानें अतिशय मोठा शंखध्वनि केला तरी तें अरण्यरुदनाप्रमाणें निरुपद्रवी असल्यामुळें हिंदुस्थान

सरकार तिकडे लक्ष देत नाहीं, आणि ब्रिटिश सरकारला तर तिकडे लक्ष देण्याचे काही कारणच नाही. परंतु तीच क्रांतिकारक मते जर एखादे दादाभाई तितक्याच स्पष्टपणानें हिंदुस्थानांतील लोकांना समक्षासमक्ष शिकवू लागतील, तर अजून थोडेंबहुत तगी प्रबळ राहिलेलें हिंदुस्थान सरकार ते स्वस्थपणानें कसे ऐकून घेईल? याकरिता परिस्थितीनें शब्दांमध्ये फरक अवश्य पडला पाहिजे. अंतःकरण मात्र जें इंग्लंडांत होतें तेंच हिंदुस्थानांत असणार, उलट जास्त तीव्र आणि संतप्त झालेलें असणार, हे सांगावयाला नकोच. पण हा परिस्थितीचा फरक लक्षांत कोण घेतो? श्रोत्यांनीं आपल्या मनाला थोडासा त्रास देऊन वक्त्याचा गर्भितार्थ ग्रहण करून एकमेकांना एकमेकांनीं ओळखावे व दोघांचेंही जे एकच इष्ट कार्य आहे तें घडवून आणावें, हा मार्गच हल्लीं मुळीं अस्तित्वांत नाहीं. हल्लीं सर्व हिंदुस्थान म्हणजे एक वक्तृत्वसमारंभाचें थिएटर बनून गेलेलें आहे. आणि हिंदुस्थानचे सर्व लोक, मग ते कॉंग्रेस-मंडपांत बसलेले असोत किंवा आपल्या घरकुलांत बसलेले असोत, हे आपल्याला या वक्तृत्वसमारंभांतील परीक्षक समजूं लागलेले आहेत. अशा स्थितींत कॉंग्रेसचा अध्यक्ष हा देखील त्या वक्तृत्वसमारंभांतील एक उमेदवार म्हणूनच त्यांच्यापुढे येतो. आणि या परीक्षकांच्या मनाची अशी भावना असल्यामुळे तो उमेदवार असें बोलला आणि तसें बोलला नाहीं असले वेडगळपणाचे आक्षेप साहजिकपणेंच उद्भवूं लागतात. तो बोलणारा आणि आपण ऐकणारे असे सगळेजण एकाच जात्याखालीं भरडले जात आहों, तेव्हां त्याच्या प्रतिकारार्थ तो युक्तीनें जी युक्ति सुचवीत आहे, ती समजून घेऊन त्याप्रमाणे आपण सर्वांनी वागावें ही जी वास्तविक बुद्धि वक्ता आणि श्रोता यांच्यामध्यें प्रस्तुतच्या आपत्कालीं असावयाला पाहिजे, ती तर मुळीं कोठेंच दिसत नाहीं. प्रत्येक शाळेतील मुलगा उठतो आणि म्हणतो कीं, दादाभाईंनीं असें असें सांगितलें नाहीं! जणूं काय दादाभाईंनीं फक्त बोलण्याचेंच काय ते काम राष्ट्रापुढें आहे, राष्ट्रानें कांहीं करण्याचें काम त्याच्यापुढे नाहींच! राष्ट्र जर तितकी कृति करण्याला तयार होईल, तर दादाभाईंचें नुसते सांगण्याला काय खर्च होते? फक्त बहिष्कारच काय, त्याच्यापेक्षां शतपटीनें जास्त क्रांतिकारक तत्त्वे उपदेशिण्याला दादाभाई तयार होतील. आणि दादाभाई नाहीं झाले तर त्यांच्या जागीं दुसरे कोणी तयार होतील.

परमेश्वराजवळील सांठा अक्षय्य आहे. परंतु जोंपर्यंत नुसती वक्तृत्वसमारंभांतील परीक्षाच चालली आहे, तोंपर्यंत मात्र कांहीं एक व्हावयाचें नाहीं.

शिवाय कांग्रेसचा अध्यक्ष म्हणजे कोणी सामान्य वक्ता नव्हे. तो सगळ्या राष्ट्राचा एक मुख्य प्रतिनिधि होय. आणि त्याचे विचार म्हणजे सगळ्या राष्ट्राचे विचार होत. तेव्हां अर्थातच राष्ट्राच्या प्रगतीवर ह्याचे विचार अवलंबून असणार. शिवाय हिंदुस्थानासारख्या स्थितींत त्याच्या भाषणांतील फाजील अणूरेणूवरसुद्धां सरकारचा डोळा असणार. अशा स्थितींत लोकांना जर विशेष प्रगतीचे विचार त्या वक्त्याच्या मनांतून सांगावयाचे असले, तर ते त्यानें कसे सुचवावे? तुम्ही अमुक अमुक गोष्टी करा असे तो उघडपणे सांगेल? सरकार आणि सरकारचे हेर दांपैकटीनें डोळ्यांत तेल घालून टपून बसलेले असतां तोंडानें एक बोलून मनानें खरे ते सर्वांना समजून घ्यावें, हाच काय तो एक उपाय होय. परंतु अशा वेळीं त्या अध्यक्षांना अमुक अमुक गोष्टी स्पष्ट सांगितल्या नाहींत म्हणून त्यांना दोष देणें म्हणजे अप्रत्यक्ष रीतीनें सरकारच्या हेरांचेच काम करण्यासारखें आहे कारण, अशा निंदेनें आणि आक्षेपानें दुसऱ्या टोकाकडे ढकलीत ढकलीत नेऊन सरकारनें पसरलेल्या जबड्यांत आयतेंच त्यांना कोंबण्यापेक्षां अशा कृत्याचा दुसरा परिणाम काय व्हावयाचा आहे? यांत मुत्सद्दीपणा कांहीं एक नाहीं. असल्या परिमाणानें आपला मोठासा अर्थ न साधतां सरकारच्या पक्षाला मात्र जय मिळाल्यासारखें होतें. अशा रीतीनें विनाकारण आपले राष्ट्रीय नुकसान करून घेण्यांत कांहीं मोठेसें तात्पर्य आहे असें नाहीं. आपल्या राष्ट्राला काय प्राप्त झालें पाहिजे हा आपल्या-पुढें प्रश्न आहे. दादाभाईसारख्या एखाद्या व्यक्तीनें उघड उघड काय बोलावें हा आपल्या राष्ट्रापुढें प्रश्न नाहीं. तेव्हां सरकारच्या डोळ्यांत जोंपर्यंत तेल घातलेलें आहे आणि सरकारच्या निर्बंधांचा उघड रीतीनें निषेध करण्याची जोंपर्यंत राष्ट्रामध्यें ताकद आलेली नाहीं, तोंपर्यंत वक्ता आणि श्रोते यांना कांहीं तरी सांकेतिक युक्त्या करून एकमेकांची भाषा समजली पाहिजे. खुद्द इंग्लिश लोक जेव्हां पहिल्यानें हिंदुस्थानांत आले आणि जेव्हां ते येथें कुमकुवत होते, तेव्हां ते देखील अशाच युक्त्या करीत होते. दिल्लीच्या बादशहांना किंवा पुण्याच्या पेशव्यांना ते कायदेशीर हुकूम सोडीत नव्हते म्हणून या सर्व गोष्टी लक्षांत बाळगून सांप्रतच्या स्थितींत आपण एकमेकां.

मनोगत कळण्याला एक निराळीच परिभाषा तयार केली पाहिजे; आणि त्या परिभाषेनेंच सर्व भाषणांचे अर्थ आपण लाविले पाहिजेत.

आणि तशा दृष्टीनें पाहिलें असता मि. दादाभाई यांच्या भाषणामध्येंही पुष्कळ अर्थ आहे. आजपर्यंत कोणी सांगितली नाहीं अशी स्वराज्याची कल्पना त्यांनीं आपल्या देशबांधवांच्या डोळ्यांपुढे ठेविली आहे. पण त्या गोष्टीचें महत्त्व लक्षांत न घेऊन कित्येकांनी त्यांच्यावर टीकेचा भडिमार चालविला आहे. अर्ज करणे म्हणजे भिक्षांदेहि नव्हे, असें भाषणांत कोणी कोठें एक वाक्य घुसडून दिलें असल्यामुळें कित्येकांचे गाठोडें बुडालें आहे! पण त्यांच्या भाषणांत दुसरींही वाक्यें आहेत. सरकारविरुद्ध बंड करून उठावें इतकी माशी अर्ज करून करून निराशा झाली आहे, असेंही त्यांनी म्हटलें आहे. उत्तानार्थाचीं भाषणे असतात, ती समजण्याला सोपीं असतात. परंतु जे उथळ लोक नाहींत ते आपले खरे विचार खोल ठेवीत असतात व सरकारच्या डोळ्यांतील तेलासाठीं ते तसे ठेवावेही लागतात. ते नीट समजून घेतले पाहिजेत. ते कसे समजावेत, आणि त्यात त्यांचा खरा हेतु काय आहे हें कसें जाणावें, याचें ज्ञान करून देणारें एक शास्त्रच असतें. त्या शास्त्राच्या पद्धतीनेंच त्यांची भाषा आपण समजून घेतली पाहिजे. लोकांनी स्वतः कांही करावयाचें नाहीं आणि अमुक अध्यक्ष असें बोलला आणि तमुक तसें बोलला नाहीं असल्या वायफळ टीका मात्र करावयाच्या, यांत कांहीं अर्थ नाहीं. एकाच उपनिषदांत "सदेव सोम्येदमग्र आसीत्" आणि "असदेवेदमग्र आसीत्" अशीं दोन अगदीं परस्परविरुद्ध विधानें आलेलीं आहेत; पण म्हणून ज्यांना वेदांतामध्यें अद्वैताची राज्यक्रांति करावयाची होती ते शंकराचार्य उपनिषत्कारांनी "असदेवेदमग्र आसीत्" असें वाक्य का लिहिलें म्हणून रडत बसले नाहींत. अनेक परस्परविरुद्ध वाक्यें जरी आलीं तरी कोणतीं वाक्यें कोणत्या हेतूने ग्रथित केलीं गेलेलीं आहेत याच्याबद्दल समालोचना झाली पाहिजे. त्या हेतूंत प्रधान हेतु कोणता आणि गौण हेतु कोणता याचा विचार झाला पाहिजे. आपल्या सेनापतीचा रोख कोठें खरोखर हल्ला करण्याचा आहे आणि प्रतिपक्षाची नजर चुकवण्याकरितां कोणत्या बाजूवर हल्ला करण्याचा नुसता पोकळ आव घातला जात आहे, या गोष्टी समजल्या पाहिजेत. हे ज्याच्या योगानें समजतें त्या शास्त्राला आपल्यामध्यें मीमांसाशास्त्र

असे म्हणतात. ते मीमांसाशास्त्र यज्ञप्रचार बंद पडल्यापासून आपल्यांत हल्लीं कमी झालें आहे. परंतु हल्लींच्या इंग्रजी कायद्याच्या अमलाखालीं आपलें मनोगत उघड सभेत शब्दांनी एकमेकांना कळविण्याचा प्रसंग येतो, तेव्हां आपण त्या मीमांसाशास्त्राचा उपयोग करण्याला जरूर शिकलें पाहिजे; आणि याचाच अर्थ आपली एक भाषा असली पाहिजे हा होय. म्हणजे मीमांसाशास्त्राच्या अनुरोधनानें हल्लींची भाषा समजण्याची पद्धत पाहिजे. एरवीं आपले प्रयत्न शक्य आणि यशस्वी होणार नाहीत. ही पद्धत आपण उपयोगांत आणली तर आपल्या राष्ट्रीय हितासंबधानें हजारों लोकांच्या सभेतही आपल्याला एकान्त करतां येईल.

मि. दादाभाई यांनीं स्वराज्याची कल्पना चांगली सांगितली. परंतु त्यांनीं स्वराज्य मिळविण्याला अर्जाचा उपाय सांगितला तो अगदीं गैर आहे, असा एक आक्षेप आहे. हे दादाभाईंना कळत नाहीं काय? एखाद्या पोराला जें समजतें, तें त्यांना समजत नाहीं, इतके ते मूर्ख आहेत काय? अर्थात् नाहींत. मग असें असून ते असें कां बोलतात? त्याला कांहीं तरी कारण असलें पाहिजे. दोन खऱ्या गोष्टी एकदम बोलण्याचे हे दिवस नाहींत. तुम्ही स्वराज्य मिळवा आणि तें बंड करून मिळवा, असें दादाभाई सांगतील? कधीं सांगणार नाहींत. स्वराज्य मिळवा एवढी एक खरी गोष्ट सांगितली तर पुढें तें स्वराज्य अर्ज करून मिळवा असेंच सांगण्याचे हे दिवस आहेत. कोणी आपल्या हातीं नारळ दिला तर त्याच्यावरील करवंटी खाण्याकरितां नसून त्याच्यांतील खोबऱ्याच्या संरक्षणाकरितां ती आहे हें समजण्याचें काम लोकांचें आहे. कायदेशीर रीतीनें आपल्याला जितकें बोलतां येईल तितकेंच बोललें पाहिजे; त्याच्यापेक्षां जास्त समजण्याला हरकत नसली, तरी बोलण्याला हरकत आहे. हीच गोष्ट लक्षांत घेऊन मि. दादाभाई यांनीं अर्जाच्या कागदांत गुंडाळून स्वराज्याची मिठाई आपल्या देशबांधवांच्या हातीं दिली आहे. या सगळ्या व्यावहारिक युक्त्यांपैकीं कांहीं कांहीं खुद्द इंग्लिशांच्याही समजण्यांत आलेल्या आहेत, व ते असें ओरडत आहेत कीं, मि. दादाभाई यांनीं आजपर्यंतची नेमस्त काँग्रेस अगदीं जहाल करून सोडली. तरी पण आम्ही त्यांना नेमस्त म्हणून शिव्या देत आहोंच? या कृतघ्नपणाला काय म्हणावें! एखादा मनुष्य नेमस्त असला तरी त्याला जहाल जहाल म्हणून जहाल पक्षांत ओढावें; पण तो हाडाचा

जहाल असूनही त्याला "तूं नेमस्त आहेस, तूं आम्हांला नकोस," असे म्हणून आम्हांतून ढकलून देणें, या आत्मघातकी मुत्सद्दीपणाला अगर मूर्खपणाला काय म्हणावें? कॉंग्रेसचे पुढारी कॉंग्रेसमध्ये नेमस्त बोलतात, आणि आमस्टरडॅम येथे जाऊन सोशियालिस्ट लोकांच्या कॉन्फरन्समध्ये अतिशय जहाल कृत्ये करितात, असे टाइम्सचे आक्षेप आहेत, आणि अशा मनुष्याला आम्ही आपल्यांतूनच नेमस्त म्हणून बाहेर ढकलतो, याला काय म्हणावें! या सगळ्याचा अर्थ एकच आहे, आणि तो हा की, आपल्याला अजून राजकीय व्यवहारांतील मीमांसाशास्त्र माहीत नाहीं, आणि त्या शास्त्राच्या नियमाप्रमाणें बलाबलाचा विचार करून सर्व वाक्याचा समन्वय आपल्याला मुख्य हेतूकडे करितां येत नाहीं. अमुक शब्दाचा अमुक अर्थ समजावयाचा, अमुक शब्द उच्चारिले असले तरी ते उच्चारिले नाहीत असें समजावयाचें, अमुक शब्द अमक्याच्या समाधानासाठीं आहेत आणि अमुक शब्द आपल्या स्वतःच्या अंतःकरणाकरितां आहेत, इकडे लक्ष ठेवावयाचें, वगैरे पारिभाषिक रीतीनें वक्ता आणि श्रोता यांच्याकरितां सर्व हिंदुस्थानांत एक भाषा झाली पाहिजे. आणि तशा दृष्टीनें मि. दादाभाई यांच्या भाषणाकडे पाहिलें तर प्रत्येकाची अशी खात्री होईल कीं, मि. दादाभाई हे जहालांतील जहाल आहेत आणि त्यांनी कॉंग्रेसच्या अध्यक्षांचें स्थान आपल्या विचारांनीं मंडित केल्यामुळें जहाल पक्षाचा यंदा जसा विजय आला आहे तसा तो अजूनपर्यंत कधींही झालेला नाहीं. त्या जहाल पक्षाचे पुढारी मि. दादाभाई यांनीं उत्थापित केलेल्या स्वराज्याचा सदोदित जयजयकार होवो, असें इच्छून आम्ही हा लेख पुरा करितों.

---

# इंग्लिश लोक खरें कधींपासून बोलूं लागणार ? २३

काळ : अग्रलेख, ता. १६-११-१९०६

● आमचे हक्क आम्ही त्यांचे हातून हिसकावून घेऊ-तेव्हांपासून.

हल्लीं नोव्हेंबरचा महिना चालू आहे. आणखी सुमारें दीड महिन्यानें कलकत्यास कॉंग्रेसची बैठक भरलेली असेल. कॉंग्रेसचे दिवस इतके जवळ आले आहेत, तरी अद्यापि कॉंग्रेसच्या तयारीला जशी सुरवात व्हायला पाहिजे तशी झालेली दिसत नाहीं. या वेळीं कॉंग्रेसकडे वास्तविक नेटिव लोकांचें विशेष लक्ष जावयाला पाहिजे आहे. परंतु ते तर अजून स्वस्थ आहेत. परंतु अँग्लो-इंडियन लोक मात्र अगदीं कंबरा बांधून तयार झाले आहेत ! आजपर्यंत एकवीस वेळा हिंदुस्थानांत कॉंग्रेस भरली आणि उठली. परंतु तिच्याकडे इंग्लिशांचें यंदांच्या इतकें लक्ष कधींच गेलें नाहीं. परंतु यंदांच्या सालीं कॉंग्रेस काय करते, कॉंग्रेसमध्यें काय ठरतें, कॉंग्रेसचे सभासद काय कृत्यें करतात, आणि तीवर अध्यक्ष कोण होतात, इकडे इंग्लिश लोकांचें अतिशय लक्ष लागलेलें दिसत आहे. बॉंबे टाइम्स, पायोनियर, इंग्लिशमन, लंडन टाइम्स, हीं सगळीं इंग्रजी पत्रें त्यांच्या लिहिण्यावरून अगदीं अस्वस्थ झालेलीं दिसत आहेत. परंतु यांना इतकें घाबरून जाण्याचें काय कारण आहे कोण जाणे ! हिंदुस्थानांतील लोकांच्या मनांतील अस्वस्थतेपेक्षां इंग्लिशांचीच अस्वस्थता जास्त दिसत आहे. इंग्लिशांना इतक्यांत इतकी अस्वस्थता वाटण्याइतकें कॉंग्रेसमध्यें काय आहे ? कॉंग्रेसनें असें काय केलें आहे की, ज्यासाठीं इंग्लिशांनीं इतक्या लवकर झोपेंतून खडबडून जागें व्हावें ? ज्याला हिंदुस्थानांतील सर्व प्रमुख ठिकाणच्या नेटिव लोकांच्या अंतःस्थितीची आणि मनोवृत्तीची गुप्त परंतु खास माहिती आहे असा कोणीही मनुष्य हमी घेऊन

इंग्लिशांना खात्रीनें सांगूं शकेल की, आणखी पांच वर्षेपर्यंत त्यांनीं गडबडण्याचें यत्किंचितही कारण नाहीं ; आणि इतक्या मुदतीत अजून त्यांना किती तरी चैन भोगतां येईल ! अजून पुष्कळ रात्र आहे. इतक्या अपरात्रीं त्याना मध्येंच दचकून जागे होण्याचें प्रयोजन नाहीं. इंग्लिशाच्या मनातून येथे राहावयाचें असले, तर त्यांनीं आणखी कांहीं दिवस येथें खुशाल राहावें. इतक्यांतच त्यांना कोण मनाई करावयाला आलें आहे ? आणखी पांच वर्षेपर्यंत त्यांच्याबद्दलचा विमा उतरून देण्याला कोणत्याही विमा कंपनीला हरकत पडणार नाहीं. आणि शिवाय इंग्लिशांनीं घाबरावयाचेंच असेल तर त्यांनी कोणाच्या धास्तीनें घाबरावें हाही एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. कॉंग्रेसनें जरा जास्त टुरटुर करण्याचा आव घातल्याबरोबर मोठमोठ्या अँग्लो-इंडियन वर्तमानपत्रांनीं आपलें विढीजाद स्थैर्य, धैर्य आणि गांभीर्य सोडून आपल्या मनाचा तळ दाखवावा हे ठीक नाहीं. हिंदुस्थानची कॉंग्रेस म्हणून जरी म्हणण्याचा प्रघात आहे, तरी हिंदुस्थान म्हणजे कॉंग्रेस नव्हे. कॉंग्रेसशिवाय हिंदुस्थान निराळेंच आहे. या कॉंग्रेसमध्ये काय आहे ? आणि हिच्यामध्ये एखादा ठराव पास झाला काय आणि न झाला काय, त्याची काय मोठीशी किमत आहे ? कोणीही अध्यक्ष झाले आणि कोणत्याही पक्षाची सरशी झाली, तरी कॉंग्रेस ती कॉंग्रेसच राहणार ! तिनें एकवीस वर्षे काय केलें, यावरून ती बाविसाव्या वर्षी काय करील याचा अंदाज करणें फारसें कठीण नाहीं. असल्या कॉंग्रेसला काय भ्यावयाचें ! दुसरीकडे हिंदुस्थानच्या उन्नतीसाठीं केवढाले प्रयत्न चालले आहेत ! आणि लोक उद्योगधंद्याच्या वाढीसाठीं किती नवीन यंत्रें खरेदी करीत आहेत ! त्याच्यापेक्षां या कॉंग्रेसमध्ये जास्त भयंकर काय आहे ? आणि टिळक अध्यक्ष, जहाल पक्षाची सरशी आणि बहिष्काराचा ठराव, यांना जर इंग्लिश लोक इतके भितात, तर वर सांगितलेल्या दुसऱ्या बाजूनें लोक ज्या खटपटी करीत आहेत त्यांना मग ते किती भितील ! कॉंग्रेस म्हणजे नुसते शब्दजाल आहे. त्यांत कर्तृत्वाचा लेशही नाहीं. असल्या कॉंग्रेसबद्दल भय प्रदर्शित करून इंग्लिश लोकांनी तिला नसतें महत्त्व मात्र आणून दिलें आहे. इंग्लिश लोक आपल्याला मोठे मुत्सद्दी म्हणवितात आणि ते असल्या या कॉंग्रेसला देखील वचकतात, हें मोठें आश्चर्य आहे ! इंग्लिश मुत्सद्यांचा हा भित्रेपणा आणि मूर्खपणा पाहून पुष्कळ नेटिव लोकांना हंसूं

येतें. कारण, त्यांना कॉंग्रेसचें खरें सामर्थ्य काय आहे, हें चांगलें कळत आहे.

इंग्लिश लोक हिंदुस्थानांत आले आहेत हे येथील लोकांना पुष्कळ दिवस माहीत झालेले आहे. आतां त्यांना येथेंच राहावयाचे असेल तर जितके दिवस ढकलतील तितके दिवस त्यांनीं येथें राहावें. पण तें उद्दामपणानें बोलून दाखविण्यांत कांहीं अर्थ नव्हता. हिंदुस्थानांतील लोकांना सुधारण्याकरितां देवानें आम्हांला हिंदुस्थानावर पाठविलें आहे, आणि हिंदुस्थानांतील लोक आपले राज्य करण्याला पात्र झाले म्हणजे त्यांचे राज्य त्यांच्या हवालीं करून आम्ही विलायतेस जाऊं, असें बोलून आजपर्यंत जे अनेक इंग्लिश मुत्सद्दी नेटिव लोकांना फसवीत आले ते कांहीं मूर्ख होते, आणि आम्ही येथेंच राहण्याकरतां आलों आहों हा आपला अंतस्थ खरा हेतु रागाच्या आवेशामध्यें फट्कन् ओकून टाकणारे मुंबईच्या टाइम्सचे एडिटर त्यांच्यापेक्षां शहाणे झाले, असें मुळींच नाहीं. टाइम्सच्या या लिहिण्यानें उलट सगळी घाण मात्र झाली आहे. आजपर्यंतच्या प्रसिद्ध प्रसिद्ध मुत्सद्द्यांनीं अनेक वेळां खोटें बोलून आणि सहीशिक्क्यानिशीं सुद्धां धडधडीत खोटें लिहून देऊन शिताफीनें जी लबाडीची इमारत उभारली होती आणि जी भोळ्या लोकांच्या विश्वासाला पात्र झाली होती, ती टाइम्सच्या उतावीळपणानें आणि चिनमुत्सद्दीगिरीच्या मूर्खपणानें एका क्षणांत ढासळून पडली आहे. जेथें लोकांना फसवावयाचें आहे तेथें मैंदवृत्ति पुरी धारण केली पाहिजे, आणि नेटिवांनीं स्वराज्यासाठीं कितीही तयारी केली तरी तुम्ही पात्र झालां म्हणजे तुमचें राज्य तुम्हांला देऊं हें वाक्य कधीही सोडतां कामा नये. आम्ही येथें आलों आहों आणि आमचा येथें राहण्याचा इरादा आहे, असें स्पष्ट बोलण्यांत अर्थ नाहीं. या स्पष्टोक्तीनें अंगावर येण्याची भीति आहे. नेटिव लोक अलीकडे फार निर्भीड होत चालले आहेत. त्यांनीं जर असें म्हटलें कीं, तुमचा विचार येथें राहण्याचा आहे, परंतु आमचा विचार तुम्हांला येथें ठेवण्याचा नाहीं, तर यावर इंग्लिशांपाशीं सयुक्तिक उत्तर काय आहे ? इंग्लिशांपाशीं दोन लक्ष सैन्य आहे आणि नेटिवांपाशीं आजमितीस एकही शिपाई चाकरीला ठेवलेला नाहीं, हे जरी खरें आहे, तरी आजपर्यंतच्या इंग्रजी मुत्सद्द्यांची भिस्त शिपायांच्या हातांतील बंदुकीपेक्षां स्वतःच्या डोक्यांतील लबाडीवरच जास्त होती; आणि नेटिव लोकांना मारण्यापेक्षां फसविण्यामध्यें ते जास्त भूषण मानीत असत.

मारण्यांत कांहीं महत्त्व नाहीं. पशूही एकमेकांना मारतात. मनुष्यानें पशूपेक्षां अधिक कांहीं तरी केलें पाहिजे. देवानें मनुष्याला बुद्धि दिली आहे ती कशाला? त्या बुद्धीनें मनुष्यानें मनुष्याला फसविलें नाहीं आणि पशूप्रमाणें तो त्याला मारीतच सुटला, तर देवानें एवढी जी देणगी दिली तिचें चीज काय झालें? असे सगळे विचार मनांत आणून पूर्वीच्या मुत्सद्द्यांनीं मारणें आणि फसविणें यांपैकी फसविणेंच जास्त पसंत केलें होतें. लढाईची वेळ आली तेव्हां इंग्लिशांनीं मारलेंही आहेच. पण त्यांनीं हिंदुस्थानांत जितक्या लोकांना मारलें आहे त्याच्यापेक्षां जास्त लोकांना फसविलें आहे. शिवाय फसविण्यांत फायदा असा आहे की, मारतां हें फक्त एकदांच येतें; परंतु मनुष्य जिवंत असला आणि ईश्वरी कृपेनें त्याच्या डोक्यांत त्याचा मूर्खपणा कायम असला म्हणजे त्याला वाटेल तितक्या वेळां फसवितां येतें. आणि शिवाय मारण्यापासून असा तोटा आहे कीं, तितके लोक आपल्यालाच कर देणारे कमी होतात. तसेंच धर्मग्रंथांतून मनुष्यानें मनुष्याला मारूं नये, अशी आज्ञा सांगितलेली आहे, फसवूं नये असा स्पष्ट उल्लेख नाहीं; तेव्हां धर्मशास्त्राच्या दृष्टीनेंही मारण्यापेक्षां फसविणेंच जास्त पुण्यकारक होय, असें पूर्वीच्या मुत्सद्द्यांचें मत ठरलेलें होतें. शिवाय होतां होईल तोंपर्यंत मारामारीवर प्रसंग येऊं द्यावयाचा नाहीं, असेंही एक त्यांचें धोरण होतें. कारण, मारामारीची वेळ आली तर तीस कोटी लोकांपुढें तीन लक्ष लोकांचा काय निभाव लागणार, ही अडचण त्यांच्या डोळ्यांपुढें रात्रंदिवस वास करीत होती. तेव्हां या सगळ्या साधकबाधक गोष्टींचा विचार करून मागील सर्व मुत्सद्द्यांनीं हें फसवण्याचेंच धोरण फायदेशीर म्हणून अंगीकृत केलेलें होतें. इतकी ज्या धोरणाची कुलपरंपरा फार दूरवर गेलेली आहे, तें धोरण टाइम्ससारख्यांनीं फटकन् झुगारून द्यावें आणि रागाच्या आवेशांत इंग्रजी राजनीतीचा मुख्य गोपनीय भाग सगळ्या हिंदुस्थानाला उघडा करून दाखवावा, ही मोठी लांच्छनास्पद गोष्ट आहे. हिंदुस्थानावरील इंग्रजी राज्य टिकविण्याची जबाबदारी कांहीं टाइम्सवर नाहीं. ती इंग्लंडांतील आणि कलकत्त्यांतील मुत्सद्द्यांवर आहे. त्यांची गुरुकिल्ली बिनजबाबदार माणसांनीं भररस्त्यावर आणून मांडावी, हें इंग्रजी शहाणपणाच्या धोरणाला शोभत नाहीं. प्रमुख ओघ फसवण्याच्या धोरणावर चाललेला असतां एखाद्यानेंच मध्यें खरें बोलून सगळ्या राजकीय धोरणाची घाण करून टाकावी, हें कांहीं नीट नाहीं.

टाइम्सच्या तोंडून ही खरी बातमी ऐकून नेटिवांची मनें किती बिघडलीं आहेत, याची इंग्लिशांना कल्पनाही करतां येणार नाहीं.

पण टाइम्सच्या तोंडूनसुद्धां एवढेंच काय तें एक खरें वाक्य चुकून बाहेर पडलें आहे, हें टाइम्सवर घसरतांना प्रत्येकानें लक्षांत बाळगलें पाहिजे. याखेरीज बाकीचीं टाइम्सचीं विधानें इंग्रजी नीतीला अनुसरूनच आहेत, हें त्या अँग्लो-इंडियन पत्राच्या तर्फेनें प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे. The Congress had a great opportunity when the Liberal party first entered office. A wise and moderate and well-organised series of representations might have accomplished much. असलीं वाक्यें त्या अतिशय प्रामाणिक, अतिशय सत्यशील, अतिशय न्यायी आणि अतिशय सरळ राजनीतीला अनुसरूनच नाहींत असें कोण म्हणेल? परंतु असलीं वाक्यें आतां लोकांना नको आहेत. यांचा लोकांना अगदीं वीट आला आहे. आणि म्हणूनच इंग्लिश लोक खरें कधीं बोलूं लागणार, असा प्रश्न विचारण्याची पाळी येऊं लागली आहे. शहाणपणाचे, नेमस्तपणाचे आणि सुव्यवस्थित असे जर एकापाठीमागून एक अर्ज लिबरल गव्हर्मेंटकडे पाठविले असते तर पुष्कळ काम झालें असतें, असली खोटी आशा इंग्लिश लोक किती दिवस दाखविणार? आजपर्यंत नेटिवांनीं अर्ज केले नाहींत? अर्ज करून इंग्लिश लोक भीक घालीत नाहींत असें जेव्हां आढळून आलें, तेव्हां आतां लोक दुसऱ्या मार्गाकडे वळत आहेत. हिंदुस्थानचें जर हित करावयाचें इंग्लिशाच्या मनांतून खरोखर होतें, तर मग त्याला लिबरल पक्षच कशाला पाहिजे होता? कॉन्झर्व्हेटिव्ह लोकांनीं हिंदुस्थानच्या लोकांचे अर्ज आणि काँग्रेसचे ठराव वाचून पाहिले असते, तर त्यांना पाप लागलें असतें कीं काय? आणि कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष अधिकारारूढ होण्याच्या आधीं लिबरल लोकांच्या हातांत हिंदुस्थानचें कल्याण करण्याचा अधिकार कधीं आलेलाच नव्हता कीं काय? आणि आतां लिबरल पक्ष अधिकारारूढ झाला असला म्हणून त्याच्यासंबंधानें आशा करण्याला तरी त्यानें काय जागा ठेविली आहे? तसेंच हल्लींच्या काँग्रेसमधील तंट्यांना आणि घोटाळ्यांना अनुसरून टाइम्सनें असें म्हटलें आहे कीं, ही सगळी व्यवस्था चांगल्या रीतीनें झाल्यावाचून काँग्रेसचे मागणें ऐकून घेण्याला इंग्लिश लोक कधींही तयार होणार नाहींत. बंगालच्या विभागणीचा तंटा यंदांचा

आहे. याच्यापूर्वी तो नव्हता. पण तेव्हां कधीं इंग्लिशांनीं कॉंग्रेसच्या मागण्या ऐकून घेतल्या आहेत ? सारांश, बंगालच्या विभागणीची चळवळ कॉंग्रेसच्या बखेड्यांतून निघाली म्हणजे मग इंग्लिश लोक कॉंग्रेसचें मागणें ऐकून घेण्याला तयार होतील, हें विधानदेखील मागील अनुभवावरून निव्वळ खोटें ठरतें. आणि म्हणूनच इंग्लिश लोक कधीं खरें बोलूं लागणार, असा प्रश्न विचारणें भाग पडतें.

बहिष्काराच्या प्रश्नासंबंधानें कॉंग्रेसमधील लोक काय करणार, ही एक टाइम्सला चिंता पडली आहे. आणि या प्रश्नाबद्दल काय तो निकाल केल्यावांचून कॉंग्रेसच्या मागण्यांना न्याय, सहानुभूति वगैरे कांहीं एक दिलें जाणार नाहीं, असें सर्व इंग्लिशांच्या वतीनें टाइम्सने नेटिवांना फर्मावून टाकलें आहे. यावरून कोणाला असें वाटण्याचा संभव आहे कीं, जोंपर्यंत कॉंग्रेसमध्यें हें बहिष्काराचें तत्त्व शिरूं पाहत नव्हते, तोंपर्यंत कॉंग्रेसच्या मागण्यांवर इंग्लिश लोकांकडून न्याय, सहानुभूति वगैरेची जणूं काय संततधारच धरण्यांत आलेली होती ! बहिष्काराची चळवळ नव्हती तेव्हां इंग्लिशांनीं काय न्याय दाखविला होता ? किंवा काय सहानुभूति दाखविली होती ? आणि जोंपर्यंत कॉंग्रेसच्या मागण्यांना खरा न्याय मिळत नाहीं, तोंपर्यंत यदाकदाचित् एखादे वेळीं नुसती कोरडी सहानुभूति मिळाली म्हणून ती काय चाटावयाची आहे ? पण ती नुसती बिन-खर्चाची सहानुभूति दाखविण्याइतकी सुद्धां इंग्लिशांना नेटिवांची मुर्वत नाहीं, मग न्याय देण्याची गोष्ट तर लांबच राहिली ! अशी स्थिति असल्यामुळेंच लोक बहिष्काराच्या भजनीं लागले आहेत. इंग्लिशांकडून न्याय, सहानुभूति वगैरे कांहींसुद्धां सलोख्यानें मिळत नाहीं, अशी सर्व लोकांची बालंबाल खात्री झाल्या-वरून लोक स्वतःच्या पायावर उभें राहण्याच्या प्रयत्नाला लागले आहेत. अशी वस्तुस्थिति असतां तुम्ही बहिष्काराचें तत्त्व सोडून देतां कीं नाहीं तें सांगा, म्हणजे तुम्हीं बहिष्कार सोडून दिल्यास आम्ही तुम्हांला न्याय, सहानुभूति वगैरे दाखवूं, असें प्रतिपादन करणें निव्वळ खोटेपणाचें आहे. आणि म्हणूनच इंग्लिश लोक खरें कधीं बोलूं लागणार, असा प्रश्न विचारणें भाग पडतें.

टाइम्सनें कॉंग्रेसमधील लोकांना खरें बोलण्याबद्दल बराच उपदेश केलेला आहे. तीं सगळीं तत्त्वें ध्यानांत बाळगून स्वतः इंग्लिश लोक आजपर्यंत खरें बोलत गेले असते तर आज हिंदुस्थानचें किती तरी हित झालें असतें. कॉंग्रेसमधील पुढाऱ्यांवर इंग्लिशांच्या वतीनें टाइम्सचा एक मोठा आरोप आहे,

तो असा कीं, ते मोठे लबाड आहेत ! जणूं काय दुसरे कोणी लबाड नाहींतच ! कॉंग्रेसवाल्यांची मुख्य लबाडी ही कीं, ते कॉंग्रेसचे वेळीं एक बोलतात, आणि ती वेळ निघून गेली म्हणजे त्याच्या अगदीं उलट बोलतात. जणूं काय दुसरे कोणी असें लबाडीचें वर्तन करीतच नाहींत ! कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांवर हा जो आरोप आलेला आहे तो अगदी निराधार आहे; कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांचें कॉंग्रेस-मधील आणि कॉंग्रेसच्या बाहेरील बोलणें म्हणजे कांहीं एखाद्या गुप्त एक्झिक्यु-टिव्ह कौन्सिलमधील किंवा कॅबिनेट कौन्सिलमधील बोलणे नव्हे. तें राजरोस-पणें चाललेले असत, आणि सरकारचे गुप्त हेर ते ऐकत असतात. असल्या भाषणांतून आंत एक आणि बाहेर एक असें असणें शक्य नाहीं. इंग्लिशांचें मात्र धोरण आंत एक आणि बाहेर एक अशा प्रकारचें आज कित्येक वर्षे अव्याहत चालू आहे. "मनस्येकं वचस्येकं" हें तत्त्व हिंदुस्थानांत इंग्लिशांनीं जितकें वापरलें आहे तितकें तें दुसऱ्या कोणींही वापरले नसेल, अशी नेटिव लोकांची खात्री होऊन चुकलेली आहे. इंग्लिश लोक कॉंग्रेसमधील पुढाऱ्यांवर हा आरोप करीत आहेत; पण हिंदुस्थानांतील सर्व लोकांची अशी समजूत आहे कीं, हा आरोप इंग्लिशांवरच अगदीं बरोबर लागू होत आहे. कॉंग्रेसमधील मि. दादाभाई नौरोजी हे लाहोरच्या कॉंग्रेसमध्यें अतिशय सौम्य विचार बोलले आणि नेदर-लंड्समधील सोशियालिस्ट लोकांच्या कॉंग्रेसमध्यें बंडाला उत्तेजन देण्यासारखे विचार त्यांनीं प्रगट केले, असें टाइम्सनें पहिलें उदाहरण दिलें आहे; व त्याच्या-खालीं मि. सुरेंद्रनाथ, गोखले वगैरे सटरफटर नेमस्तांच्या बारीकसारीक लबाड्यांचीं क्षुद्र उदाहरणें हुडकून काढून दिलीं आहेत. पण मि. गोखले यांनीं स्टेट सेक्रेटरीपाशीं नेमस्त भाषा बोलून ऑक्सफर्डच्या इंडियन विद्यार्थ्यांना जहाल उपदेश करण्याची लबाडी केली, असें क्षणभर मानलें, तरी ही एवढी मोठी लबाडी करून त्यांनीं काय केलें ? कोणाचें राज्य तर त्यांनी घशांत घालून घेतलें नाहीं ? मग त्या बिचाऱ्या लबाडीची किंमत ती काय ? पण नेटिव लोकांपाशीं इंग्लिशांच्या मात्र वर्तनाची याच्यापेक्षां शतपटीनें भयंकर अशीं उदाहरणें आहेत. एके ठिकाणी एक बोलावें आणि दुसरे ठिकाणीं दुसरें करावें, याबद्दलचीं इंग्लिशांचीं उदाहरणें इंग्लिशांना पाहिजे आहेत ? इंग्लिशांनीं बोलून त्याप्रमाणें केलें नाहीं, वचन एक दिलें आणि आचरण दुसरें केलें, व विश्वासाचें अभिवचन देऊन परिणामीं फसविलें, अशा प्रकारचीं

इंग्लिशांचीं उदाहरणें इंग्लिशांना पाहिजे आहेत ? अशीं उदाहरणें देणें म्हणजे हिंदुस्थानांतील इंग्लिशांचा इतिहास देत बसण्यासारखें आहे. क्लाइव्ह-साहेबांच्या खोट्या दस्तऐवजापासून तों कर्झनसाहेबांच्या तिबेटमधील थंड्या मिशनपर्यंत ऐतिहासिक उदाहरणे काढूं गेल्यास तीं किती तरी निघतील ! आणि शिवाय तीं अशा माणसांचीं निघतील कीं, ज्यांच्यापुढें गोखले, बानर्जी आणि दादाभाई यांच्यासारख्याना राजनिष्ठेनें नाकेंच घासावीं लागतील ! व्यापारी, एजंट, पोलिटिकल एजंट, सेनापति, गव्हर्नर्स वगैरेंनीं लिहिलेल्या गुप्त रिपोर्टांमधून याचीं किती उदाहरणें सांपडतील ! नेटिव राजांशीं केलेल्या आणि मोडलेल्या तहांच्या यादींवर जर कोणी स्वारी करील तर त्याला असल्या उदाहरणांची वाटेल तितकी लूट मिळेल. पण असलीं उदाहरणे वर्तमानपत्रांच्या रकान्यांत देत बसणें बरोबर नाहीं. वर्तमानपत्रांचे रकाने म्हणजे कांहीं इतिहासाचे भाग नव्हेत. सबब तीं असंख्य उदाहरणें देण्याच्या भरीस न पडतां फक्त एकच उदाहरण दिलें तरी कार्यभाग होण्यासारखा आहे. आणि तें उदाहरण म्हटलें म्हणजे १८५८ सालच्या जाहीरनाम्याचें होय. त्या जाहीरनाम्यांत म्हटल्याप्रमाणें इंग्लिश लोक वागले आहेत काय ? दादाभाई, बानर्जी, गोखले यांच्यासारख्यांनीं दुटप्पी वर्तन केलें ( वास्तविक केलें नाहींच ) असें क्षणभर मानलें तरी, त्या मानानें १८५८ सालच्या जाहीरनाम्यासंबंधींचें दुटप्पी वर्तन किती अक्षम्य आणि भयंकर आहे ! तो जाहीरनामा कोणी लिहिला होता ? तो कोणाच्या नांवानें लिहिला होता ? आणि त्याप्रमाणें वर्तन झालें काय ? एक सांगितलें आणि एक केलें असें त्यांत झालें नाहीं काय ? १८५८ सालांतील दोन दिवसांपुरतें तसें नेमस्त बोलून पुढील पन्नास वर्षें नेटिवांना जहाल रीतीनें वागविण्यांत आलें नाहीं काय ? या प्रश्नांवर इंग्लिशांपाशीं काय उत्तर आहे ? आणि हें वर्तन कोणाच्या जाहीरनाम्यासंबंधानें झालें ? परंतु इतःपर हे प्रश्न विचारीत बसण्यांत तात्पर्य नाहीं. कॉंग्रेसमधील नेमस्त पुढाऱ्यांबद्दलही इंग्लिशांच्या मनांत संशय आलेला असो किंवा नसो ; परंतु इंग्लिशांचे मात्र खावयाचे दांत एक असतात आणि दाखवावयाचे दुसरे असतात, अशी नेटिवांची खात्री होऊन चुकलेली आहे. कॉंग्रेसवाल्यांच्या दुटप्पी वर्तनाबद्दल टाइम्सचें असें म्हणणें आहे कीं, We are now perfectly familiar with the favourite method

of the Congress. नेटिव लोकांचेंही इंग्लिशांबद्दल असेंच म्हणणें आहे कीं, आम्हांलासुद्धां आतां इंग्लिशांच्या युक्त्या पूर्णपणें कळून चुकलेल्या आहेत! कॉंग्रेसमध्ये नेमस्त भाषा बोलून बाहेर जहाल विचार प्रसृत करण्याने आपल्या भाषणांत असंबद्धपणाचा दोष येतो, यांत कॉंग्रेसवाल्यांना कांहीच वाटत नाहीं असे टाइम्सचें म्हणणें आहे; पण सर्वांना सारख्या नोकऱ्या देऊं असें जाहीरनाम्यांत प्रसिद्ध करून सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा पार्लमेंटच्या ठरावालाही न जुमानता फक्त इंग्लंडमध्येंच घेणारांना आपल्यामध्यें असंबद्धतेचा दोष उत्पन्न होतो असें कधीं वाटलें होतें? कॉंग्रेसवाल्यांच्या असल्या युक्त्यांना फसण्याइतके इंग्लिश लोक मूर्ख नाहींत, असें टाइम्सचें म्हणणें आहे; पण सर्व नेटिव लोकांचेहि असेच म्हणणें आहे की, नेटिव लोकसुद्धां आतां इंग्लिशांच्या हातचलाखीनें फसण्याइतके मूर्ख उरलेले नाहींत. We are entitled to ask congressmen to be more consistent, हे जसे टाइम्सचें म्हणणें आहे, तसेंच नेटिव लोकांचेंही असें म्हणणें आहे कीं, १८५८. सालच्या जाहीरनाम्यांत जशी इंग्लिशांनीं वचने दिलीं आहेत त्याप्रमाणें त्यांनीं वागलें पाहिजे, असे त्यांना सांगण्याचा आम्हांलाही अधिकार आहे. The politicians of India seem to expect us to accept what they say during the three days of Congress and to ignore or conveniently disbelieve what they say and still more what they do during the rest of the year. The request is impossible हें जसें टाइम्सचें म्हणणे आहे, त्याचप्रमाणें लोकांचेंही असें म्हणणें आहे की, इंग्लिशांनीं १८५८ सालामध्ये जें म्हटलें असेल त्यावर मात्र नेटिवांनी विश्वास ठेवावा आणि त्यानंतर त्यांनीं हिंदुस्थानांत जें कांहीं म्हटलें असेल किंवा केलें असेल तिकडे दुर्लक्ष करावें अगर त्याजवर गैरविश्वास करावा, असें इंग्लंडचे मुत्सद्दी तरी कसें संभवनीय मानतात! आणि अशी जर त्यांची इच्छा असेल तर लोकांचेंही त्याला हेंच उत्तर आहे कीं, The request is impossible. वास्तविक इंग्लिश लोकांनीं किती दुटप्पी वर्तन केलेले आहे, याला गणित नाहीं; आणि १८५८ सालची मानलेली मॅग्नाचार्टा हें त्याचें ढळढळीत उदाहरण आहे, आणि म्हणून इंग्लिशांना तुम्ही कधींपासून खरें बोलूं लागणार, असा प्रश्न विचारण्याची आवश्यकता उत्पन्न होते.

टाइम्सनें दुसरें असें एक सांगितलें आहे कीं, यंदांच्या कॉंग्रेसची वेळ मोठी आणीबाणीची आहे. यंदांपासून पुढें दोन निरनिराळे रस्ते फुटणार आहेत. त्यांपैकीं, टाइम्सकार विचारतात, तुम्ही नेमस्त रस्त्यानें जाणार किंवा मि. बिपिनचंद्र यांनीं दाखवलेल्या रस्त्यानें जाणार? The English will yield none of the fruits of their rule in India till it is wrenched from their selfish grasp, म्हणजे इंग्लिशांच्या आपलपोटेपणाच्या मगरमिठीपासून हिसकावून घेतल्यावांचून हिंदुस्थानांतलि कोणतेही राजकीय फायदे इंग्लिश लोक नेटिवांना कधींही देणार नाहींत, याकरतां ते त्यांच्यापासून हिसकावून घेतले पाहिजेत असा बाबू बिपिनचंद्र यांनीं दाखविलेला मार्ग आहे. व याचसंबंधानें टाइम्सकारांचा नेटिव लोकांना तुम्ही हा मार्ग स्वीकारणार कीं काय म्हणून प्रश्न आहे. पण या प्रश्नाचें उत्तर देण्याच्या आधीं नेटिव लोकांचा इंग्लिशांना असा प्रश्न आहे कीं, तुमच्यापासून हिसकावून घेतल्यावांचून खरोखरच आम्हांला कांहीं एक न देण्याचा तुमचा विचार आहे कीं काय? या प्रश्नाचें इंग्लिशांकडून जसें उत्तर येईल त्याप्रमाणें नेटिवांकडून टाइम्सच्या प्रश्नाला उत्तर मिळेल. जशाच तसें! पण मेहेरबानीनें इंग्लिशांनीं खरें मात्र उत्तर दिलें पाहिजे!

हिसकावून घेतल्यावांचून कांहीं द्यावयाचें नाहीं असा जर इंग्लिशांचा निश्चयच असेल तर नेटिवांनाही इंग्लिशांपासून हिंदुस्थानांतील फायदे हिसकावून घेण्याचाच निश्चय करणें भाग आहे. परंतु इतक्या हातघाईवर गोष्टी येणार नाहींत, अशी आमची खात्री आहे. एका टाइम्सनें अद्वातद्वा लिहिलें तरी बाकीच्या इंग्लिशांचीं डोकीं जाग्यावर आहेत, आणि सर्व नेटिव लोक राजनिष्ठ आहेत. राजकीय धोरणामध्यें एखाद्या वेळीं कांहीं लबाड्या झाल्या असल्या तरी एकंदरींत इंग्लिशांची राजनीति पुष्कळ लोकांना अद्यापि सुखावह वाटत आहे व सर्व लोकांनीं सलोख्यानें कार्यभाग करून घेण्याची इच्छा आहे. आणि अशीच आपण सदोदित इच्छा बाळगली पाहिजे, म्हणजे, त्यापासून आपलें हित होणार आहे!

— समाप्त —

## य. गो. जोशी प्रकाशन, पुणें

# ❀ वाद-विवेचन-माला ❀

| | | | |
|---|---|---|---|
| १. | सुलभ समाजवाद | पां. वा. गाडगीळ | १-०-० |
| २. | फॅसीझम | पां. वा. गाडगीळ | १-०-० |
| ३. | साम्राज्यशाही | ना. गं. गोरे | १-०-० |
| ४. | अराज्यवाद | पां. वा. गाडगीळ | १-०-० |
| ५. | लोकशाही | आचार्य जावडेकर | १-८-० |
| ६. | मार्क्सचा भौतिकवाद | पां. वा. गाडगीळ | १-०-० |
| ७. | विश्वकुटुंबवाद | ना. गं. गोरे | १-८-० |
| ८. | ईश्वरवाद | आचार्य जावडेकर | १-८-० |
| ९. | गांधीवाद | आचार्य दांडेकर | १-८-० |
| १०. | राष्ट्रवाद | कोल्हटकर | २-०-० |
| ११. | जडवाद | तर्कतीर्थ जोशी | १-४-० |
| १२. | हिंदुत्ववाद | ज. स. करंदीकर | २-८-० |
| १३. | मार्क्सचा कॅपीटल सारग्रंथ | पां. वा. गाडगीळ | १०-०-० |

* या तेरा पुस्तकांत वाद-विवेचन-माला पूर्ण होते. *

—: सोल एजंट :—

**महाराष्ट्र ग्रंथ भांडार, गिरगांव, मुंबई**

ग्राहकांनीं व पुस्तकविक्रेत्यांनीं पुस्तकें महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई. यांजकडून परस्पर मागवावींत.

# शि. ल. करंदीकर यांचीं पुस्तकें—

| | | |
|---|---|---|
| | सावरकर चरित्र : कथन | [ दुसरी आवृत्ति छापत आहे ] |
| २ | टिळक-भारत ... ... ... | रु. ४ |
| ३ | पाकिस्तानचें संकट ... ... ... | रु. २ |
| ४ | जात्यावरच्या ओंव्या ... ... | रु. १॥ |
| ५ | मॅट्रिक मराठी गाईड ... ... | रु. २॥ |

[ १९४६–४८ ]

**—मिळण्याचें ठिकाण**

**आदर्श मुद्रणालय :** ३९.५।५ सदाशिव, पुणें २.

